# ग्लाडस्टन ह्यांचें चरित्र.

हें

अनेक इंग्लिश ग्रंथांच्या आधारानें

## विनायक कोंडदेव ओक

ह्यांनीं लिहिलें.



सत्कर्मयोगें वय घालवावें
सर्वांमुखीं मंगल बोलवावें.
रामदास.



आवृत्ति दुसरी.



मुंबईमध्यें
"निर्णयसागर" छापखान्याचे मालक तुकाराम जावजी
ह्यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

सन १९११.

किंमत १२ आणे.

# समर्पण.



पदवीधरमुकुटमणि, अगाध बुद्धिमत्ता, अप्रतिम सौजन्य, अतुल सहनशीलता, अनुपमेय स्वदेशहितेच्छा, आणखी, समर्थांच्या ह्मणण्याप्रमाणेंः—

सांकडीमध्यें वर्तों जाणे उपाधीमध्यें मिळों जाणे
अलिप्तपणें राखों जाणे आपणाशीं. १
आहे तरी सर्वां ठायीं पाहों जातां कोठेंचि नाहीं
जैसा अंतरात्मा ठायीं ठायीं गुप्त जाहला. २

अथवा, ज्ञानोबांच्या ह्मणण्याप्रमाणें—

व्यापक आणि उदास जैसें का आकाश.

असा ज्यांचा मोठा लौकिक सगळ्या हिंदुस्थानांत आज कितीएक वर्षें गाजून वृद्धि पावत आहे, त्या परमवंद्य महाराष्ट्रभू-भूषणीभूत महाशयांस, म्हणजे कै० **महादेव गोविंद रानडे** ह्यांस त्यांच्या सारख्याच महात्म्यांचें हें अल्प चरित्र, अत्यंत पूज्य बुद्धिपूर्वक एकनिष्ठपणें अर्पण केलें आहे.



# प्रस्तावना.

मीं आजपर्यंत पीटर धि ग्रेट, शिकंदर बादशाहा, आल्फ्रेड धि ग्रेट, ड्यूक आफ् वेलिंग्टन, इत्यादि कितीएक थोर पुरुषांचीं चरित्रें मराठींत इंग्लिश ग्रंथांच्या आधारानें लिहिलीं आहेत. तीं लिहितांना मला कांहीं विशेष वाटलें नाहीं. परंतु, ग्लाडस्टन ह्यांचें चरित्र लिहिण्याचें मनांत आणून, त्या संबंधाचे ग्रंथ वाचिले, आणि तें चरित्र लिहिण्यास आरंभ केला, तेव्हां मी अगदीं गोंधळल्यासारखा झालों. क्रम कोणता धरावा, हें मुळींच सुचेना. इंग्लिश ग्रंथकारांचें अनुकरण करावें, तर, ते ग्रंथ इंग्लिश लोकांकरितां—म्हणजे इंग्लंडांतला राज्यकारभार, इंग्लिश लोकांच्या समजुती, इंग्लिश राज्याची रचना, इंग्लिश प्रजेचे हक्क, इंग्लिश राजाचे अधिकार, इत्यादिकांची चांगली माहिती आहे, अशा लोकांकरितां लिहिलेले आहेत. तसें लिहिणें आमच्या मंडळीस कळावयाचें नाहीं, आणि पसंत पडावयाचें नाहीं; असें वाटल्यामुळें इंग्लिश ग्रंथकारांचा क्रम एकीकडे ठेवावा लागला. कालानुक्रम धरावा, तर त्यांच्या चरित्रास अनेक अंगें—आणि तीं सगळीं सारख्या महत्वाचीं—असल्यामुळें आणि त्यांची एकमेकांत गुरपटागुरपट असल्यामुळें, तें अतिशयित बिकट वाटलें. ह्मणून तें पतकरेना. आणखी मनांत तर मोठी इच्छा अशी कीं, ग्लाडस्टन हे गृहस्थ कोणत्या प्रकारचे होते, किती मोठे होते, त्यांनीं आपल्या देशाकरितां काय काय केलें, त्यांनीं "प्रपंच साधुनि परमार्थाचा लाहो" कसा साधिला, मनुष्य खरा ज्ञाता, खरा धर्मनिष्ठ आणि खरा स्वदेशहितकर्ता असला ह्मणजे त्याला एकट्याला केवढालीं कामें करितां येतात आणि तो कसा जनपूज्य होतो, हें आमच्या सगळ्या मंडळीस—त्यांतही आमच्या तरुण होतकरू मंडळीस—तपशीलवार नाहीं तर नाहीं पण स्थूल

मानानें तरी चांगलें कळावें–तें इतकें चांगलें कीं, त्यांच्या आंगच्या अनेक उत्तम गुणांतल्या एका तरी उत्तम गुणाचें–सगळें राहिलें, पण एका सहस्रांशाइतकें तरी–अनुकरण करण्याची प्रवृत्ति–सहस्र वाचकांमध्यें एकाचे ठायीं तरी उत्पन्न व्हावी–असें आपलें लिहिणें व्हावें. ह्मणून, ह्या चरित्राचें इंग्लिश स्वरूप सगळें एकीकडे ठेवून, आणि मन गोंधळांत पडायाचें अशा भानगडी एकीकडे सारून, आमच्या तरुण वाचकांच्या सरल अंतःकरणास सुलभपणें ह्या चरित्राचें अल्पस्वल्प तरी ज्ञान व्हावें, अशी योजना केली आहे. ती कशी केली आहे तें येथें सांगत नाहीं. कां कीं हातच्या कांकणाला आरसा नको आहे. त्यांत ह्या इच्छेच्या उत्कंठेच्या योगानें, पुनरुक्ति किंवा क्वचित् अतिशयोक्ति असे कांहीं प्रमाद झाले असल्यास, कृपाळू मर्मज्ञांनीं त्यांबद्दल क्षमा करावी.

चरित्रलेखनाचा हेतु जगदात्मा पूर्ण करो



# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.



ही लिहिण्याचा हेतु एवढाच कीं, ह्या पुस्तकाची थोडीशी हकीकत वाचकांस सादर करावयाची आहे.

ग्लाडस्टन साहेब वारल्यावर त्यांचें चरित्र लिहिण्याची इच्छा मला फार झाली. परंतु आलीकडे पाश्चात्यांचीं चरित्रें वाचण्याविषयींची आमच्या वाचकांची पराङ्मुखता, आणि मराठी पुस्तकांच्या खपाची वाईट स्थिति मनांत उभी राहून कांहीं वेळपर्यंत "दरिद्राणां मनोरथा:" असें झालें होतें. परंतु, ग्लाडस्टन पुण्य पुरुष, त्यांचें चरित्र मराठींत व्हावें असा ईश्वरी संकेत असल्याच्या योगानें, माझी इच्छा मीं प्रदर्शित केल्याबरोबर, पुस्तकें लवकर खपायाचीं नाहींत, द्रव्य-लाभ व्हावयाचा नाहीं, उलटी घस सोसावी लागायाची हें अगदीं स्पष्टपणें समजलें असतांही, हें चरित्र, चांगल्या प्रकारें छापून प्रसिद्ध करण्याविषयींचा आपला उत्साह माझे मित्र आणि आश्रयदाते रा. रा. **तुकाराम जावजी शेट** जे. पी. ह्यांनीं प्रगट केला, आणि त्याप्रमाणें तो, खर्चाकडे न पहातां सिद्धीस नेला, त्याचें हें फळ आहे. ह्याच्या पहिल्या आवृत्तीच्या दाहाशें प्रती खपण्यास आज सुमारें बारा वर्षें लागलीं. तरी, त्या खपल्या, हें आह्मी मोठें भाग्य समजतों. ह्या हजार प्रती, निदान, कमींतकमी, पांच हजार माणसांनीं तरी वाचिल्या असतील; आणि त्यांस ग्लाडस्टनांच्या अनेक अत्यंत ग्राह्य सद्गुणांचा सहवास झाला असेल. तो आपला गुण कधीं सोडणार नाहीं. कस्तूरीचा वास कधीं नाहींसा होत नाहीं. तो सन्निधच्या पदार्थांस अल्पस्वल्प तरी आपोआप लागतो. त्या न्यायानें, ह्या चरित्रनायकाच्या अनेक अमोल सद्गुणांचें जर कांहीं थोडें, सिंधूत बिंदु इतकें, आमच्या राष्ट्रांत कोठें कोना-कोंपऱ्यांत झालें असेल, तर त्याचें सगळें पुण्य रा. रा. तुकाराम शेटजींचें आहे. आणि असें पुण्य जोडण्यास त्यांची वृत्ति होणें ही त्यांच्या कैलासवासी वडिलांची पुण्याई आहे.

ग्लाडस्टनांसारख्या सत्पुरुषाची अल्पस्वल्प सेवा करण्याची, आणि त्यांच्या चरित्राच्या विचारांत कांहीं वेळ आनंदानें घालविण्याची ही उत्तम संधि मित्र रा. रा. तुकाराम शेट ह्यांनीं मला, आपल्या जुन्या वृद्ध मित्राला उत्साह-पूर्वक दिली, ह्याबद्दल मी त्यांचे फार फार उपकार मानितों.

**मुंबई.**<br>जूलै, १९११. } **वि. कों. ओक.**



# अनुक्रमणिका.

# चित्रांची अनुक्रमणिका.





**ह्या पुस्तकांत ग्लाडस्टनांचीं चित्रें चार आहेतः—**

१. प्रथमारंभीं घातलें आहे, तें अगदीं शेवटीं, इ० स० १८९८ त काढलेलें आहे.

२. दुसरें नव्वदाव्या पानाजवळचें आहे, तें इ० स० १८७८ त काढलेलें आहे.

३. तिसरें एकशेंतीनव्या पृष्ठाजवळ घातलें आहे, तें, त्यांचें स्वागत एडिनबरो शहरांत झालें, त्याचें आहे. एक माणूस कंदिलाच्या खांबावर चढून त्यांचें दर्शन घेत आहे.

४. चौथें एकशें अठराव्या पानाशीं आहे. त्यांत ते आणि त्यांची पत्नी हीं प्रदर्शित केलीं आहेत. हें १८९६ तलें आहे.

---

*



# ग्लाडस्टन ह्यांचें चरित्र.

## भाग पहिला.

### विषयाचें अभिनंदन.

प्रपंच साधुनि परमार्थाचा लाभ ज्यानें केला
तो नर भला भला.

**शिवदिनकेसरी.**

प्रपंचीं तें भाग्य परमार्थीं वैराग्य दोन्ही यथासांग दोहीकडे. १
दोहींकडे सांग होई तो समर्थ नाहींतरी व्यर्थ तारांबळी. २

**रामदास.**



आपण पृथ्वीवर जन्मास आलों आहों, ह्याचें कांहीं तरी चांगलें सार्थक्य व्हावें, असें प्रत्येक विचारशील मनुष्यास वाटत असतें. आणि तें सार्थक्य होण्यास मार्ग ह्मटले ह्मणजे दोन; प्रपंच आणि परमार्थ. परंतु, ह्या दोन मार्गांविषयीं ह्मटलें आहेः—

**प्रपंच परमार्थ संपादीन दोन्ही एकही निदानीं न घडे त्यासी. १**
**दोन्ही पेवांवरी ठेवूं जातां हात शेवटीं अपघात शरीराचा. २**
**तुका ह्मणे तया दोहींकडे धका शेवटीं तो नरकामाजी पडे. ३**

**तुकाराम.**

ह्मणजे, हे दोन मार्ग कोणा एका माणसाला साधतां यावयाचे नाहींत, असा ह्यांचा आशय दिसतो. परंतु, परमार्थ ह्मणजे काय आणि तो कशानें साधतो, हें पाहिलें ह्मणजे ह्या शंकेचें निवारण होतें. सामान्यत्वें, भक्तिमार्गामध्यें, परमार्थ ह्याचा अर्थ, पापापासून अगदीं अलिप्त राहून परमेश्वरभक्ति करणें, असा समजतात. तुकाराम महाराजांचेंच ह्मणणें आहेः—

**अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ त्याच्या गळां माळ असो नसो. १**
**आत्माअनुभवीं चोखाळिल्या वाटा त्याच्या माथां जटा असो नसो. २**
**परस्त्रीचे ठायीं जो का नपुंसक त्याच्या आंगा राख असो नसो. ३**
**परद्रव्या अंध निंदेशीं जो मुका तोच संत देखा तुका ह्मणे. ४**

आणि संत ह्मणजे परमार्थी पुरुष होत. असें जर आहे, आणि प्रपंचांत राहून, मनुष्यास जर हे गुण चांगल्या प्रकारें अंगीं वागवितां आले, तर त्या माणसानें प्रपंच साधून परमार्थ साधला, असें कां न ह्मणावें?

दुसरा एक विचार असा आहे कीं, परमार्थ ही संस्था जशी ईश्वरनिर्मित आहे, तशी प्रपंच ही संस्थाही ईश्वरनिर्मित आहे. ह्या दोन्ही संस्था मनुष्याकरितांच निर्माण केलेल्या आहेत. त्यांत, मनुष्याची उत्पत्ति आणि मनुष्याच्या जीवाचें संगोपन हीं प्रपंचांत होतात; तेव्हां प्रपंच आणि परमार्थ ह्या दोहोंपैकीं प्रपंचाची सत्ता माणसावर अधिक चालावी, हें साहजिक आणि न्याय्य आहे, आणि ती त्याप्रमाणें चालत आहे. आधीं प्रपंच आणि मग परमार्थ, असा क्रम दिसतो. शिवाय दुसरें एक असें आहे कीं, परमार्थसाधनाचे जे गुण वर सांगितले आहेत, ते प्रपंची माणसांस अंगीं धरितां येतात; परंतु, प्रापंचिकांचीं कामें परमार्थ्यांस करतां येत नाहींत. ह्मणजे प्रापंचिकांस प्रपंचांत राहून परमार्थ साधण्यासारखा आहे, परंतु, परमार्थ्यांस परमार्थमार्गांत राहून प्रपंच साधितां यावयाचा नाहीं. ह्या विचार धरूनच श्रीकृष्णांनीं अर्जुनास सांगितलें आहेः—

**कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः**
**लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि.**

ह्मणजे, "कर्मानेंच जनकादिकांना उत्तम स्थिति प्राप्त झाली. जनाला

चांगला मार्ग लागावा, एवढीच गोष्ट ध्यानांत ठेवून देखील तुला कर्म आचरणें योग्य आहे." येथें "कर्म आचरणें" ह्याचा अर्थ बहुतेक प्रपंच करणें असा घेतल्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं.

ह्यावरून असें झालें कीं, मनुष्य जर मनांत आणील, शास्त्र पाहील, तितका निश्चय करील, आणि आपला निश्चय तडीस नेण्याविषयीं परमेश्वराचें साह्य मागेल, तर त्याला प्रपंच करून परमार्थ साधितां येईल. आतां, अमक्या एका माणसानें प्रपंच साधून परमार्थही साधिला, असें कशावरून समजावयाचें—ह्याची खूण काय—असें जर कोणी विचारील, तर त्याचें उत्तर एवढेंच कीं, संसारविचार चांगला केला, त्यांत लोकांकडून चांगलें ह्मणवून घेतलें, आणि जन्मभर परमेश्वरास भिऊन सगळीं कामें केलीं—परमेश्वराकडे लक्ष ठेविलें—परमेश्वराची भक्ति केली—असें सर्वांच्या प्रत्ययास आलें, ह्मणजे त्यानें प्रपंच आणि परमार्थ हे दोन्ही साधिले, असें ह्मणावें. अशीं माणसें जगामध्यें फार थोडीं निपजतात. त्यांचें खरें मोल तीं जीवंत असतां कळत नसतें, तीं गत झाल्यावर त्यांचें पूर्ण स्वरूप जनांच्या ज्ञानदृष्टीपुढें उभें राहतें. आणि मग त्यांचें देव्हारें होतें. आणखी अशा माणसांच्या थोरवीचें बीज पाहूं लागलें ह्मणजे सगळें त्यांच्या धर्मशीलत्वांत असतें. जवळ द्रव्य असलें ह्मणजे पाहिजेत ते पदार्थ प्राप्त करून घेतां येतात, त्याप्रमाणें एक धर्मशीलत्व माणसाच्या आंगीं चांगलें पूर्णपणें बाणलेलें असलें ह्मणजे त्याजबरोबर सगळे सद्गुण त्याच्या ठायीं येतात. त्यांसाठीं वेगळा प्रयत्न करावा लागत नाहीं. किंबहुना, सगळ्या सद्गुणांचा समुच्चय हें धर्माचें अंग आहे कीं काय नकळे. अशीं माणसें मनुष्यजातीचीं भूषणें होत. तीं परमेश्वरांश होत. ह्मटलें आहेः—

**जे वर्ततात धर्मैं कर्मैं करितात ईश्वर स्मरुनी**
**अवतार ईश्वराचे ते नर इतरांस तारिती तरुनी.**

**गंगाधरपंत मोगरे.**

अशीं माणसें जगांत पाहिजेत आहेत. तीं तयार करूं ह्मटलें तर व्हावयाचीं नाहींत. तीं परमेश्वरी सूत्रानेंच उत्पन्न व्हावयाचीं. तीं इतर माणसांस

कित्त्यासारखीं उपयोगीं पडतात. त्यांच्या इतकीं चांगलीं जरी दुसरीं माणसें तयार झालीं नाहींत, तरी, त्यांच्या खालोखाल तयार होतात. निदान त्यांचें अनुकरण करण्याचा प्रयत्न पुष्कळ माणसें करतात. तें सगळें राष्ट्राच्या कल्याणास उपयोगीं पडतें. ह्मणून अशा माणसांचीं चरित्रें दृष्टीपुढें असणें हें सर्व माणसांस आणि त्यांतूनही तरुण होतकरू माणसांस फार लाभदायक होतें. तसें कांहीं, अल्पस्वल्प तरी आपल्या राष्ट्रांत व्हावें, ह्मणून हें ग्लाडस्टन ह्यांचें चरित्र येथें सादर करण्याचा प्रयत्न केला आहे. ह्यांनीं, सध्यांच्या काळीं, प्रपंच आणि परमार्थ हे दोन्ही साधून, इ० स० १८९८ त मे महिन्याच्या एकुणिसाव्या तारखेस, परलोकीं प्रयाण केलें. आतां, ह्यांनीं प्रपंच आणि परमार्थ हे दोन्ही साधले कशावरून, ह्याचीं थोडीं प्रमाणें सांगतों.

१. विद्या विपुल केली. द्रव्य विपुल मिळविलें. कुटुंबाच्या सर्व माणसांस विपुल संतोष दिला. लक्षावधि लोकांकडून विपुल चांगलें चांगलें ह्मणवून घेतलें. प्रत्यक्ष महाराणी सरकारांनीं त्यांस असें लिहिलें कीं "तुह्मीं आमच्या राज्याचीं पुष्कळ चांगलीं चांगलीं कामें केलीं आहेत, हे आमच्या देशावर मोठे उपकार झाले आहेत."

२. चार वेळ महाराणी सरकारांची मुख्य प्रधानकी केली, आणि त्या कारकीर्दींत निर्लोभत्वेंकरून स्वजनहित साधण्याचे प्रयत्न जितके करवले तितके केले. लोकांवरचें करांचें ओझें पुष्कळ कमी केलें, आणि लोकांत ज्ञानप्रसार पुष्कळ व्हावा अशा योजना केल्या. आणखी राष्ट्राचें उत्पन्न वाढविलें.

३. कधीं कोणास दुखविलें नाहीं. देववलें तितकें स्वजनांस आणि परजनांस सुखच दिलें. आणि अत्यंत एकनिष्ठापूर्वक स्वधर्माचरण केलें.

४. सगळीं कर्में स्वधर्मास स्मरून केलीं. धर्माचरण करण्यास लहानपणापासून मरतपर्यंत फार जपले. कधीं टळले नाहींत.

५. शेवटचा निरोप घेण्यास कोणी मित्र गेले, त्यांस ते ह्मणाले, आपण आतां इहलोकाविषयीं बोलूं नये, परलोकाविषयीं बोलावें. आणि शेवटच्या

दुखण्यांत बेशुद्धीमध्यें बोलत, ती देखील परमेश्वरप्रार्थना असे. इतकें त्यांचें अंतःकरण भक्तीनें भरलें होतें. आणखी अगदीं शेवटचा शब्द जो ते बोलले, तो, "आमेन" हा होता. हा ख्रिस्ती प्रार्थनेंत शेवटीं येत असतो. तेव्हां त्यांचें जीवित ही एक महाप्रार्थनाच होती ह्मणायची.

६. प्राणोत्क्रमणानंतर प्रेतदर्शनार्थ एका दिवसांत एक लाख सत्तर हजार माणसें आलीं होतीं, आणि तीन चार लाख लोक त्यांच्या स्मशानयात्रेस लोटले होते.

७. शेवटीं खांद देण्यास महाराणी सरकारचे ज्येष्ठ चिरंजीव नामदार प्रिन्स ऑफ् वेल्स, त्यांचे चिरंजीव नामदार ड्यूक ऑफ् यॉर्क, महाराणी-सरकारचे मुख्य प्रधान लार्ड सालसबरी, लार्ड रोजबरी, अशी अशी मोठी मंडळी लागली होती. ह्यांत लार्ड सालसबरी हे कन्सर्व्हेटिव ह्मणजे ग्लाड-स्टन ह्यांच्या विरुद्ध पक्षाचे अग्रगण्य होते, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

८. ते मरण पावल्यावर, त्यांच्या कुटुंबाच्या माणसांस महाराणी साहेब व्हिक्टोरिआ, नामदार प्रिन्स ऑफ् वेल्स, फ्रान्साच्या प्रजासत्ताक राज्याचे अध्यक्ष, अमेरिकेंतल्या स्वतंत्र संस्थानांचे अध्यक्ष, रशियाचे झार महाराज, इटालीचे राजे, ग्रीसचे राजे, ऑक्सफोर्ड युनिव्हर्सिटीसारख्या मोठमोठ्या संस्था, इत्यादिकांकडून, आणि इतर लहानमोठ्या सहस्रावधि लोकांकडून मोठ्या कळवळ्याचीं सहस्रावधि दुखवट्याचीं पत्रें आलीं.

अशा आणखी शेंकडों गोष्टी सांगतां येतील. त्यांवरून मोठ्या हट्टी वितंडवादी माणसास देखील असें कबूल करणें प्राप्त होईल कीं, ग्लाडस्टन ह्यांनीं प्रपंच आणि परमार्थ हे दोन्ही उत्तम प्रकारें साधले, ह्यांत कांहीं शंका नाहीं.

आणखी ह्या सगळ्या गोष्टींपेक्षां एका विशेष गोष्टीच्या योगानें हें चरित्र सध्यांच्या काळीं सगळ्या विद्याचारसंपन्न राष्ट्रांतल्या सगळ्या विचारी जनांस विशेष ग्राह्य वाटण्यासारखें आहे. ती गोष्ट ही कीं, ह्या एकुणिसाव्या शतकामध्यें उच्च प्रतीचें शिक्षण आणि धर्मश्रद्धा हीं कधीं एका ठिकाणीं नांदावयाचीं नाहींत—उच्च प्रतीचें शिक्षण झालें कीं तेथील धर्मश्रद्धा नाहींशी

व्हावयाचीच—झालीच पाहिजे, उत्तम विद्वान् मनुष्य नास्तिक किंवा निदान संशयमतवादी तरी झालाच पाहिजे—असा जो एक ग्रह लोकांत वाढत चालला होता—किंवा वाढत आहे—त्याचें उत्तम प्रकारचें खंडण ह्या चरित्रानें झालें आहे. ग्लाडस्टन ह्यांच्या ठायीं, अत्युच्च प्रतीचें शिक्षण आणि प्रेमळ धर्मश्रद्धा हीं, अगदीं सख्ख्या प्रेमवंत आणि ममताळू भावंडांप्रमाणें एकसारखीं साठ वर्षें नांदलीं, आणि तीं त्यांच्या स्वतःच्या आणि त्यांच्या देशाच्या उद्धारास पुष्कळ साधनभूत झालीं, असें प्रत्यक्ष अनुभवास आलें आहे. तें कोणाच्यानें खोडवणार नाहीं. हा लाभ अवर्णनीय आहे.

शिवाय, दुसऱ्या एका मोठ्या कोड्याचा उलगडा ह्या महापुरुषांच्या चरित्रांत झाला आहे. तें कोडें हें कीं, राजकारण ह्मटलें कीं त्यांत निरंतर सत्यास धरून चालतां यावयाचें नाहीं—त्यांत कधींना कधीं असत्याचा आश्रय करावाच लागतो—त्याशिवाय चालत नाहीं—असा पुष्कळांचा ग्रह आहे. फार काय सांगावें,

**एक प्रकट लोकीं बोलावें एक साधुकर्णींच सांगावें**
**एक मनींच गौप्य ठेवावें हें तूं बरवें जाणशी कीं.**

**श्रीधर.**

असें नारदांनीं धर्मराजास राजनीतींत सांगितलें आहे. तसेंच वामनांनीं ह्मटलें आहेः—

**केव्हां सत्य वदे वदे अनृतही केव्हां वदे गोडही**
**केव्हां अप्रियही दयाळुहि असे केव्हां करी घातही**
**जोडी अर्थहि जे यथेष्टसमयीं कीं वेंचही आदरी**
**ऐशी हे नृपरीति भासत असे वारांगनेचे परी.**

आणि त्याच्या आलीकडचें अगदीं नवें उदाहरण, जर्मनीच्या बादशाहांचे जगत्प्रसिद्ध मुख्य प्रधान प्रिन्स बिस्मार्क—ह्मणजे ज्यांनीं एकुणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धांत, सगळें युरोपखंड कांहीं कालपर्यंत आपल्या अर्ध्या वचनांत ठेविलें होतें—त्यांचें आहे. त्या प्रिन्स बिस्मार्कांनीं एके वेळीं

असें ह्मटलें कीं "आमचे विलियम बादशाहा हे सत्याची योग्यता सर्वांत मोठी समजत असतात. आणि मी देखील राजकारणांत सत्यास धरून चालण्याचा प्रयत्न करीत असतों. परंतु, कधीं कधीं असे प्रसंग येतात कीं, आह्मां दोघांलाही थोडेंबहुत सत्यच्युत व्हावें लागतें. तें बादशाहांस फार जड जातें. अशा प्रसंगीं त्यांचें तोंड अगदीं उतरून जातें. तें झालें कीं माझ्यानें त्यांच्याकडे पाहावत नाहीं. ह्मणून, चटकर मी आपलें तोंड फिरवून दुसरीकडे पाहूं लागतों." ह्मणजे सांगायाचें तात्पर्य एवढेंच कीं, सत्यच्युत थोडेंबहुत तरी झाल्यावांचून राज्यकारभार चालवितां येत नाहीं, असा ग्रह लोकांच्या मनांत दृढ भरलेला आहे. आणि तो इतका आंगवणीस पडला आहे कीं, राजकारणांत खोटें बोलणें हें कोणी पाप समजत नाहींत—एवढेंच केवळ नव्हे, तर बेमालूम खोटें बोलणें हें मोठें चातुर्य समजतात. परंतु, एवढ्या मोठ्या कारकीर्दींत आणि इतक्या प्रकारच्या मोठमोठ्या भानगडींच्या कामांत, ग्लाडस्टनांच्या वर्तनांत आणि भाषणांत कधीं एक लेशही विपर्यास आला नाहीं, तरी त्यांना पुष्कळांत पुष्कळ यश प्राप्त झालें. आणि यश आलें नाहीं त्यांत त्यांच्या आचरणाविषयीं सर्व लोकांत धन्यता तर वाटलीच वाटली. ह्मणजे, त्यांस, असत्यास स्पर्श न करितां इंग्लंडासारख्या महाराष्ट्राचा राज्यकारभार तेरा चौदा वर्षेंपर्यंत उत्तम प्रकारें चालवितां आला. **केसरी**कारांनीं ह्याविषयीं ह्मटलें आहेः—"ग्लाडस्टन साहेबांनीं राज्यकारभार चालवितांना शत्रूचा पाडाव करण्याकरितां असत्य व पापमय उपायांची योजना केली नाहीं, सत्याचरणास फांटा दिला नाहीं, आणि 'राज्य करणें ह्मणजे नरकप्राप्तीची तयारी करणें' ही ह्मण खोटी करून दाखविली. राज्यकारस्थानी पुरुषांनीं स्वदेशाचे हिताकरितां असत्य वर्तन करण्यास हरकत नाहीं, मुत्सद्यांना धर्माची भीति नाहीं, यमदंडांची परवा नाहीं, परमेश्वराचा त्यांना धाक नाहीं, सत्याची त्यांना चाड नाहीं, अशा प्रकारची दृढ समजूत ज्यांची झाली असेल, त्यांनीं ग्लाडस्टन साहेबांच्या चरित्राकडे पाहावें. ह्मणजे, राज्यकार्यधुरंधरांस वेड्यावांकड्या खोट्या मार्गानें जाण्याची जरूर नाहीं, राष्ट्र-

हित व धर्महित हीं भिन्न नाहींत, व नीच काम करून परराष्ट्रांना लुबाडून मिळविलेल्या संपत्तीपेक्षां प्रामाणिकपणाचें व धर्माचरणाचें वैभव अधिक देदीप्यमान व विशेष श्रेयस्कर आहे, असें त्यांना दिसून येईल." ह्या सगळ्याचें तात्पर्य एवढेंच कीं, ग्लाडस्टन हे धर्मशील होते. धर्मशील होते, ह्मणून सत्यशील होते; आणि सत्यशील होते ह्मणून त्यांस प्रपंच आणि परमार्थ हे दोन्ही पर्याय साधतां आले.

**सत्यें हा रवि तपतो सत्यें भूमिप्रविष्ठिता जाण**
**सत्यांत पुमर्थ सकळ सत्यचि जीवासि पवि तनुत्राण.**

**मोरोपंत.**

आणखी आमची समजूत अशी आहे कीं, राष्ट्राचा उद्धार होण्यास अशीं धर्मश्रद्धावान्, अशीं बुद्धिवान् आणि अशीं विद्वान् माणसें अत्यंत आवश्यक आहेत. अंधेरांत दीपावांचून प्रकाश पडावयाचा नाहीं. त्याप्रमाणें अशा माणसांवांचून राष्ट्राचा उद्धार व्हावयाचा नाहीं. ह्मणून, हें चरित्र, अगदीं थोडक्यांत, आमच्या होतकरू देशबंधूंस वाचायास यथामति तयार केलें आहे. ह्याचा उपयोग व्हावा. हें चरित्र आमच्या मंडळीनें वाचावें, त्याचा चांगला विचार करावा, आणि दृढ निश्चयानें, होववेल तितकें, होववेल तेव्हां, आणि होववेल तेथें, ग्लाडस्टनांसारखे होण्याचा प्रयत्न करावा, असें आह्मी परमेश्वरापाशीं मागतों. तें तो कृपा करून आह्मांस देईल, अशी आशा आहे.





# भाग दुसरा.



## मातापितरें, जन्म आणि विद्याभ्यास.

उपजला तरि तोचि मला गमे। कुल समुन्नति ज्यास्तव घे रमे.

**वामन.**

पिता गुरु पिता देवो पितृसेवे शरीर जावो,
ऐसा ज्याचा एकचि भावो तो एक धन्य सुपुत्र.

**मुक्तेश्वर.**



इंग्लंडाच्या उत्तरेस लिव्हरपूल ह्मणून एक बरेंच मोठें शहर आहे. तेथें पूर्वीं सर जान ग्लाडस्टन ह्या नांवाचे कोणी संभावित व्यापारी राहत असत. ते कांहीं दिवस पार्लमेंटाचे सभासद होते. ते आणि त्यांचें कुटुंब हीं चांगलीं सुशिक्षित होतीं आणि मोठीं धर्मशील होतीं. त्यांचें वर्तन फार नेमस्तपणाचें, टापटिपीचें आणि वजनदारीचें असे. त्यांस एकंदर साहा मुलें झालीं. चार मुलगे आणि दोन मुली. त्यांतल्या चौथ्या मुलाचें नांव विलियम एवर्ट ग्लाडस्टन असें ठेविलें होतें. हाच मुलगा प्रकृत चरित्राचा नायक होय. ह्याचें जन्म इ० स० १८०९ च्या दिसेंबर महिन्याच्या नवव्या तारखेस झालें.

सर जान ग्लाडस्टन हे, आपल्या मुलांच्या ऐहिक आणि पारलौकिक कल्याणाविषयीं अतिशयित दक्ष असत. ऐहिक कल्याणार्थ त्यांस ते स्वतः घरीं आणि शाळेंत चांगल्या शिक्षकांकडून विद्या पढवीत असत, आणि

पारलौकिक कल्याणार्थ आपले धर्मग्रंथ मोठ्या आस्थेनें आणि कळकळीनें त्यांस शिकवीत असत. विद्या हें जसें मनाचें पौष्टिक अन्न आहे, तसें धर्मज्ञान हें आत्म्याचें पौष्टिक अन्न आहे, असें ते समजत असत. आणि ह्मणून ही मानसिक आणि आत्मिक पुष्टि आपल्या मुलांस प्राप्त करून देण्याविषयीं त्यांस अतिशयित उत्कंठा असे.

सर जान ग्लाडस्टन हे आपल्या मुलांशीं मोठ्या प्रेमानें वागत असत. आणि त्यांस ते नानाप्रकारचे पदार्थ दाखवून, अनेक प्रकारच्या गोष्टी सांगून, आणि त्यांच्या प्रश्नांचीं उत्तरें त्यांस कळतील अशा समर्पक रीतीनें देऊन, त्यांस रंजवीत असत. तेणेंकरून त्यांच्या बुद्धीचा विकास चांगला झाला. त्यांस चांगल्या संवयी लागल्या, आणि त्यांचे ठायीं जिज्ञासा उत्पन्न झाली. हें काम फार नाजूक आहे. हें जसें घरीं आईबापांच्या हातून होतें, तसें शाळेंत गुरूंच्या हातून होत नाहीं. कां कीं, त्यांच्यामध्यें अंतर, आई आणि दाई ह्यांच्यामधल्या अंतराएवढें किंवा त्यापेक्षांही कदाचित् मोठें असतें.

सर जान ग्लाडस्टन हे नेहमीं आपल्या मुलांशीं कोटिक्रम लढवून वादविवाद करीत असत. ह्मणजे, कोणताही विषय निघाला ह्मणजे त्याविषयीं आपण बोलत, आणि आपल्या मुलांसही बोलायास लावीत. आणि त्यांत खरें काय तें ठरवीत. कोणीं कांहींतरी सांगावें, आणि तें बाकीच्यांनीं खरें मानून चालावें, असें कधीं होत नसे. प्रत्यक्ष पाहिलेल्या एका चांगल्या गृहस्थानें ह्याविषयीं असें लिहिलें आहे कीं, "अमका एक पदार्थ भाजून खावा कीं शिजवून खावा, ही अमकी एक खिडकी उघडी ठेवावी कीं बंद करावी, उद्यां आकाशांत अभ्रें येतील कीं नाहींत, अशा साधारण विषयांवर देखील त्यांच्यांत वादविवाद आणि कोट्यांवर कोट्या चालत असत. त्या सगळ्यांमध्यें एक मोठा चमत्कार असा दिसून येई कीं, त्यांतले एक देखील माणूस उगाच बाष्कळपणा करीत नसे. आपण जें

काय बोलतों, तें सप्रमाण पाहिजे, ह्याविषयीं तीं सगळीं फार जपत असत." अशा प्रकारें वादविवाद करण्यास लहानपणापासून शिकायास सांपडावें, हें माणसाचें खरोखर मोठें सुदैव होय.

ह्याप्रमाणें घरीं आणि घराजवळच्या एका शाळेंत विलियम ग्लाडस्टन ह्यांचा आरंभींचा विद्याभ्यास झाल्यावर, ते अकरा वर्षांचे असतां, त्यांच्या आईबापांनीं त्यांस इटन येथील नामांकित शाळेंत घातलें. ही शाळा बरीच प्राचीन आहे. हिची स्थापना प्रथमारंभीं इ० स० १४४० ह्या वर्षीं राजा साहावा हेनरी हा अगदीं तरुण मुलगा असतां, त्यानें आपल्या खासगींतल्या पैशांतून, अगदीं गरीबांच्या मुलांच्या सोईकरितां केली. तिचें महत्व वाढत वाढत सध्यां पुष्कळ वाढलें आहे. ह्या शाळेसारखी इंग्लंडांत दुसरी शाळा नाहीं, असें कांहीं लोक समजतात. स्वतः ग्लाडस्टन देखील असें ह्मणत असत. परंतु, हा नुसता लौकिक आहे. ह्या शाळेंत मुख्यत्वेंकरून ल्याटिन आणि ग्रीक ह्या भाषांचा अभ्यास फार चालतो. इतर विषयांकडे तितकें लक्ष नसतें. शिवाय त्या शाळेची दुसरी एक आख्या अशी आहे कीं, अगदीं वरच्या दोन इयत्तांतल्या मुलांच्या आज्ञा खालच्या सगळ्या इयत्तांतल्या मुलांनीं चाकरांप्रमाणें पाळिल्या पाहिजेत. हा मोठा जुलूम आहे. आणखी मनापासून आपण होऊन अभ्यास करणारे जे विद्यार्थी असतात, त्यांचा अभ्यास येथें फार चांगला होतो; पण जे विद्यार्थी टंगळमंगळ करणारे असतात, त्यांस स्वेच्छेनुरूप वागण्यास पुष्कळ सवड असते, आणि त्यांचा अभ्यास तशाच बेताचा होतो. कोणत्याही शाळेंत ह्मटलें तरी हें असें असतेंच. त्या शाळेंत दहा वर्षांच्या आंत विद्यार्थी घेत नाहींत, आणि अठरा वर्षांहून अधिक वयाच्या विद्यार्थ्यास राहूं देत नाहींत. आजपर्यंत जे कोणी नामांकित पुरुष ग्रेटब्रिटनांत होऊन गेले, त्यांतले बहुतेक ह्या शाळेंत शिकून तयार झालेले आहेत. ग्रे, शेले, ड्यूक ऑफ् वेलिंगटन, पिट, फाक्स, लार्ड नार्थ, सर

जान लबाक, ही सगळी मंडळी तेथलीच होय. लार्ड क्यानिंग, हिंदुस्थानाचे पहिले व्हाइसराय, ग्लाडस्टनांचे एक सहाध्यायीच होते. ह्या शाळेचा खर्च भागण्यास वीस लाख रुपयांचें स्वतंत्र वार्षिक उत्पन्न करून ठेविलेलें आहे. ह्या शाळेंत जसें ज्ञानशिक्षण मिळतें तसें धर्मशिक्षणही मिळतें.



लार्ड क्यानिंग.

ह्या इटनच्या शाळेंत विलियम ग्लाडस्टन हे जाऊं लागले तेव्हां ते अवघे अकरा वर्षांचे होते. तरी, त्यांस गृहशिक्षण फार चांगलें मिळालें होतें, त्याच्या योगानें ज्ञानसंपादन आणि धर्मनिष्ठा ह्यांच्या संबंधाची योग्यता त्यांस फार मोठी आली होती. ते लहानपणीं फार देखणे—हजार पांचशें मुलांत सुंदर—असे असून, प्रकृतीनें अगदीं निरोगी होते. त्यांची मुद्रा फार गोड आणि तेजस्वी दिसे. ते आपल्या अभ्यासाच्या विषयांत नेहमीं इतर विद्यार्थ्यांपेक्षां फार चांगले तयार असत. आणखी, हे चांगले धर्मश्रद्धावान् असल्याच्या योगानें ह्यांचें वर्तन अत्यंत शुद्ध, नम्रतेचें आणि परोपकाराचें असे. तेणेंकरून ह्यांचें वजन इतर विद्यार्थ्यांवर फार पडे. त्यांवर त्यांचा मोठा दरारा असे. आणि ते त्यांस मनापासून मोठा मान देत असत. बिशप हामिल्टन् हे एक त्यांचे सहाध्यायी होते. त्यांनीं, पुढे

कितीएक वर्षांनीं एका ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं "इटनच्या शाळेंत मी अगदीं आळशी मुलगा होतों. तेथें मला ग्लाडस्टन ह्यांचा सहवास सुदैवानें मिळाला, ह्मणूनच मी बचावलों. नाहींतर मला कुसंगति लागून माझा सर्वस्वीं नाश झाला असता." ह्या शाळेंतल्या वेळास साठ वर्षें लोटल्यावर त्यांच्या एका दुसऱ्या सहाध्यायानें असें ह्मटलें कीं, "एका मेजवानीच्या वेळीं ग्लाडस्टन ह्यांनीं मद्यप्राशन करण्याचें साफ कसें नाकारिलें तें मला चांगलें आठवत आहे." हे ग्लाडस्टन जसे मोठे विद्याभ्यासी आणि मोठे नीतिमान् होते, तसे पहिल्यापासून मोठे दयाळ होते. इटन येथें एका जत्रेच्या प्रसंगीं डुकरांच्या शेंपट्या कापून त्यांस उगाच त्रासविण्याचा क्रूर परिपाठ बहुत वर्षांपासून पडला होता. ती गोष्ट चांगली नव्हे, सुशिक्षितांस शोभत नाहीं, असा त्यांनीं इतर मंडळीचा फार निषेध केला. त्यावरून कांहीं विद्यार्थ्यांनीं ह्यांची बरीच टवाळी केली. पण तीस ह्यांनीं जुमानिलें नाहीं. आणि शेवटीं त्या लोकांस आपलें ह्मणणें कबूल करायास लाविलें. तशीच तेथें दुसरी एक वाईट रीति फार दिवसांपासून चालत आली होती. ती ही कीं, विद्यार्थी अगदीं वरच्या वर्गांत चढले, ह्मणजे त्यांनीं एक जेवणावळ करावी. आणि त्या प्रसंगीं हास्यरसोत्पादक अशा कांहीं नव्या कविता रचून गाऊन दाखवाव्या. त्यांत चावटपणा आणि अश्लीलत्व मनस्वी असे. तें ग्लाडस्टन ह्यांस अत्यंत तिरस्कार्य वाटून, त्या वहिवाटीप्रमाणें त्यांनीं ज्या कविता रचिल्या, त्यांत त्या परिपाठाचें वर्णन करून, त्याचा अगदीं निषेध केला, आणि त्याप्रमाणेंच त्यांत त्या डुकरांच्या संबंधाच्या क्रूरपणाचाही उल्लेख करून त्यांतलें नीचत्व दाखविलें. त्यावरूनही मंडळीनें त्यांची टवाळी केली. परंतु, त्यांनीं तिकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं, आणि शेवटीं आपलें ह्मणणें खरें केलें. अशा प्रकारें, अशा लहान वयांत, आपल्या बरोबरीच्या विद्यार्थ्यांवर एवढें वजन ठेवणें, ही गोष्ट सामान्य नव्हे. हें जें त्यांचें वळण शाळेंत दिसून आलें, तेंच पुढें मोठेपणीं पुष्कळ वाढून त्यांच्या मोठ्या व्यवहारांत त्यांच्या उपयोगीं पडलें.

इटन शाळेमध्यें, वरच्या वर्गांत वक्तृत्वही शिकवीत असतात, आणि तेथें असा नियम आहे कीं, शाळा सोडते वेळीं विद्यार्थ्यानें, आपल्या निवडीचें आणि आवडीचें ल्याटिन किंवा ग्रीक भाषेंतलें कोणाचें तरी भाषण तोंडपाठ करून, तें, तसा प्राचीन काळचा पोषाक घालून, शाळेंतल्या सगळ्या मंडळीच्या सभेंत बोलून दाखवावें. त्याप्रमाणें ग्लाडस्टन ह्यांनीं, नामांकित वक्ता सिसरो ह्यानें जें भाषण केयसवेरिस ह्याच्या विरुद्ध केलें होतें, तें पाठ करून, उत्तम रीतीनें बोलून दाखविलें.

इटन येथें असतां विलियम ग्लाडस्टन हे इतर सहाध्यायांबरोबर नानाप्रकारचे खेळही खेळत असत. पण त्यांत ते कधीं पुढार घेत नसत, त्यांस चेंडूफळीचा खेळ विशेष आवडत असे. पण त्याहीपेक्षां, आपल्यासारख्या सहाध्यायांच्या समागमें जलद जलद चालून पुष्कळ लांबलांबची रपेट करणें त्यांस फार प्रिय असे. त्यांत त्यांस व्यायाम आणि संभाषण ह्या दोहोंचा लाभ होत असे. आणि तो व्यायाम जसा शरीरसुखास साधनभूत होई, तसें तें संभाषण बुद्धिवर्धनास साह्यभूत होई. ह्या रपेटीविषयीं देखील तेव्हांच्या विद्यार्थ्यांस मोठें भूषण वाटत असे. जेम्स मिलनेस ग्यास्केल ह्या नांवाचा एक विद्यार्थी त्या मंडळींत फिरायास जात असे. त्यानें एके वेळीं त्याविषयीं आपल्या मातुश्रीस लिहिलें कीं, "काल संध्याकाळीं मी ग्लाडस्टनाबरोबर फिरायास गेलों होतों. हा ग्लाडस्टन मोठा हुशार असून, ह्याच्या इतका शाहाणा आणि धूर्त मुलगा माझ्या पाहाण्यांत अद्याप आला नाही." हें एका मुलाचें ह्मणणें एका मुलाविषयीं आहे. त्यांत विशेषसा अर्थ नाहीं. तरी, ग्लाडस्टनांविषयीं त्या मंडळींत ग्रह कसा होता, हें ह्यावरून दिसून येतें.

इटनच्या शाळेमध्यें विद्यार्थ्यांची एक सभा असे. तींत व्याख्यानें होत, निबंध वाचीत, आणि वादविवाद चाले. त्या सभेस ग्लाडस्टन मिळाले, आणि तिच्या कामांत पुढारी झाले. त्या सभेचा एक नियम असा होता कीं, प्रचलित राजकारणांचे विषय तींत कधीं काढूं नयेत. तरी तशा जुन्या विषयांवर चर्चा करण्यास हरकत नव्हती. त्या चर्चेवरून,

प्रकृत विषयांच्या संबंधानें, तेथल्या सभासदांचीं मतें स्पष्ट होत असत. आणि त्यांवरून, इंग्लिश राजकारणांत जे मोठे दोन पक्ष—लिबरल आणि कान्सर्व्हेटिव—ह्मणून आहेत, त्यांतल्या कोणत्या पक्षाचा अभिमान कोणाला आहे, हें उघड होत असे. त्यांपैकीं, विलियम ग्लाडस्टन हे बहुतकरून नेहमीं कान्सर्व्हेटिव पक्षांत असत.

खेळण्याखिद्‌ळण्यांत विलियम ग्लाडस्टन हे फारसे अग्रगण्य नसत. परंतु, सभेमधल्या वादविवादांत ते सर्वांच्या पुढें असत. ते एखाद्या विषयावर बोलायला लागले ह्मणजे, सगळी सभा हालवून सोडीत असत. हे जें कांहीं सांगत, त्यास ह्यांचीं प्रमाणें अगदीं सिद्ध असत. आणि त्याच्या उलट उगाच कोणीं वाचाळपणा केला ह्मणजे ते त्याचे धुडके धुडके उडवून देत असत. आपल्या सभेंत चांगले समजदार लोक घ्यावे, सभेमध्यें चांगले चांगले गहन आणि उपयुक्त विषय वादविवादास काढावे, त्यांवर चर्चा चांगली संभावितपणाची व्हावी, आणि तिच्या योगानें सभासदांच्या ज्ञानाच्या वृद्धीस भर पडावी, असा उद्योग ते नेहमीं करीत असत.

इ० स० १८२७ ह्या वर्षीं इटन येथील शाळेंत एक मासिक पुस्तक विद्यार्थीमंडळीनें चालू केलें. त्यांत निबंध लिहिण्याविषयीं पुष्कळांनीं अभिवचनें दिलीं होतीं. त्यांत विलियम ग्लाडस्टन हे एक होते. हें मासिक पुस्तक जूनपासून डिसेंबरपर्यंत सरासरी कसें तरी चाललें. त्यांत ग्लाडस्टन ह्यांचे लेख पुष्कळ आले, आणि त्यांवरून त्यांचा चांगला लौकिक झाला. परंतु, पुढें त्यास दुसरे कोणी लिहिनातसे झाले, तेव्हां तें बंद पडलें. आरंभशूरत्व हें कमजास्त प्रमाणानें सर्वत्र आहे. त्याचा आरोप केवळ आह्मां दाक्षिणात्यांवरच नको.

ग्लाडस्टन हे इटन शाळेंत असतां, तेथल्या इतर विद्यार्थी जनांस फार आवडत असत, फार पूज्य वाटत असत, आणि त्यांचा सहवास हा एक मोठा लाभ आहे, असें त्यांच्या मनांत ठसलें होतें. त्यांचे सहाध्यायी जेम्स मिलनेस ग्यास्केल ह्यांस, त्यांच्या आईबापांच्या मनांत, केंब्रिज विश्वविद्या-

लयांत घालावयाचें होतें. हें जाणून, आणि ग्लाडस्टन हे आक्सफोर्ड विश्वविद्यालयांत जाणार हें समजून, त्यांनीं त्यांस लिहिलें, कीं "ग्लाडस्टन ह्यांचा आणि माझा परिचय फार चांगला झाला आहे—किंबहुना मोठा स्नेह जमला आहे, तो, मला आक्सफोर्ड येथें पाठविल्यानें अखंड चालेल, हा एक मोठा लाभ होईल. ग्लाडस्टन हे कांहीं सामान्य गृहस्थ नाहींत. मला जर कोणीं असें विचारिलें कीं, तुमच्या मित्रमंडळामध्यें अत्युत्तम आणि प्रसंगीं हाकेस हाक देणारा असा मोठा माणूस कोण आहे? तर मी ग्लाडस्टन ह्यांचें नांव सांगेन........असें असतांही जर तुह्मी मला केंब्रिज येथेंच पाठविण्याचा निश्चय कराल, तर मी तिकडे जाईन, पण ग्लाडस्टन ह्यांचा वियोग माझ्या अतिशयित दुःखास कारण होईल." त्याप्रमाणेंच आर्थर हालाम ह्यांनीं ह्यांविषयीं असें लिहिलें आहे कीं, "आजपर्यंत पुष्कळांचें तरुणपण मीं पाहिलें आहे. त्यांत ग्लाडस्टन ह्यांच्या तरुणपणाकडे पाहून मला असें वाटतें कीं, ही सध्या नुसती लहानशी कळी आहे. ही यथाकालीं फुलली ह्मणजे हिच्या सुवासाचा घमघमाट चोहींकडे पसरणार आहे." ह्यावरून इटनच्या शाळेंत ग्लाडस्टन ह्यांस किती चांगले विद्यार्थी ह्मणून मानीत होते, आणि त्यांच्या भावी मोठेपणाची छाया त्यांच्या वर्तनांत कशी दृश्यमान झाली होती, तें कळून येतें.

इटन शाळेंत असतां ग्लाडस्टन हे आपली रोजनिशी नित्यनेमानें भरीत असत. तिजवरून दिसतें कीं, त्या अल्पवयांत देखील ते क्लारेंडन, ब्लेर, हिराडटूस, गिबन, होमर इत्यादि मोठमोठ्या ज्ञात्यांचें ग्रंथ वाचीत असत, वर्तमानपत्रांत निबंध लिहीत असत, आणि सभांकरितां भाषणें लिहून काढीत असत. त्यांत कधीं कधीं पद्येंही रचीत. तें सगळें पाहून मोठें आश्चर्य वाटतें. आणि असें मनांत येतें कीं, असे उत्तम कित्ते जर आमच्या राष्ट्रांतल्या विद्यार्थ्यांच्या पुढें वारंवार आले, तर त्यांचें कांहीं तरी वळण त्यांना लागेल, आणि सुशिक्षणाच्या अभिवृद्धीस त्याचा पुष्कळ उपयोग होईल.

विद्याभ्यास, सदाचरण आणि उद्योगशीलता ह्यांविषयीं उत्तमप्रकारें नांव मिळवून ग्लाडस्टन हे इ० स० १८२७ ह्या वर्षीं इटनच्या शाळेंतला

आपला विद्याभ्यास पूर्ण करून निघाले, त्या वेळेच्या सुमारास त्यांनीं एका मासिक पुस्तकांत **'वक्तृत्व'** ह्या विषयावर जो एक निबंध लिहून प्रसिद्ध केला, त्यांत असें आहे कीं, " जो तरुण मनुष्य आपल्या आंगच्या गुणांनीं लोकस्तुतीस पात्र होतो, त्याच्या मनांत असें येत असतें कीं, आपणास सरकारांतून एकदम एकादी जागा मिळेल, आपण राजाचे चिटणीस किंवा कदाचित् मुख्य प्रधानही होऊं, असाही योग येईल." हें त्यांच्या स्वतःच्या भावी कारकीर्दीचें भविष्य त्यांच्या अंतःकरणांत आलें होतें. पुढें त्यांचा विचार आक्सफोर्ड विश्वविद्यालयांत जायाचा ठरलाच होता. तरी, थोडी विशेष पक्कता संपादण्याकरितां खासगत रीतीनें कांहीं चांगल्या शिक्षकांपाशीं राहून त्यांनीं ग्रंथपठण केलें. त्यांत डाक्टर टर्नर हे नामांकित गृहस्थ होते. हेच गृहस्थ पुढें कलकत्त्याचे बिशप होऊन आले होते. ह्या वेळच्या एका गोष्टीच्या संबंधानें ग्लाडस्टन ह्यांनीं पुढें बरेच दिवसांनीं एके ठिकाणीं असें लिहिलें कीं, "आह्मी कांहीं मंडळी मिळून एकदा माकलेसफील्ड येथें फिरायास गेलों होतों. तेथें एक रेशमी कापडाचा कारखाना आह्मीं पाहिला. त्याच्या मालकानें आह्मांस कांहीं रेशमी रुमाल दाखविले. आणि सरकारांनीं परकीय मालाची बंदी काढून टाकिल्याबद्दल फार कुरकूर केली. तेव्हां माझ्या मनांत असा विचार आला कीं, अशा घाणेच्या नमुन्याचे आणि हलक्या प्रतीचे पदार्थ लोकांस तयार करितां येण्यासारखे मुळीं कायदे करावे तरी कशाला?" ह्यावरून असें दिसतें कीं, त्यांचें मन लहानपणापासून अर्थशास्त्राच्या व्यवहाराकडे लागलेलें होतें.

इ० स० १८२८ च्या आक्टोबर महिन्यांत ग्लाडस्टन हे आक्सफोर्ड येथील विश्वविद्यालयाची क्राइस्टचर्च ह्मणून जी एक शाखा आहे, तींत प्रविष्ट झाले. ह्यांत न्यायशास्त्र, ल्याटिन आणि ग्रीकभाषा, अरिस्टाटलाचे ग्रंथ आणि धर्मशास्त्र हे विषय विशेष शिकवीत असत. हें विश्वविद्यालयही मोठ्या आख्येचें आहे. ह्या एकुणिसाव्या शतकांत, तेथल्या विद्यार्थ्यांतले सात गृहस्थ—लार्ड लिव्हरपूल, जार्ज क्यानिंग, सर राबर्ट पील, लार्ड डर्बी, लार्ड

साल्सबरी, ग्लाडस्टन, आणि लॉर्ड रोजबरी हे—इंग्लिश राज्याचे मुख्य प्रधान झाले. ह्मणजे आक्सफोर्ड विश्वविद्यालय हें इंग्लंडाकरितां मुख्य प्रधान तयार करण्यासाठींच जणूं काय घातलेलें आहे. तेथें ग्लाडस्टनांचा अभ्यास मोठ्या आस्थेनें चालला. ते स्वतः उत्तम बुद्धिमान् होते. त्यांस गुरु उत्तम मिळाले होते. आणि विद्या शिकून उत्तम तें करायाचें काय, हें धर्मश्रद्धेच्या योगानें ग्लाडस्टनांच्या मनांत उत्तम प्रकारें भरलें होतें. तेव्हां ह्या उत्तम गोष्टींच्या योगाचा परिणाम उत्तम व्हावा, हें साहजिकच होतें. ग्लाडस्टन ह्यांचा विद्याभ्यास उत्तम झाला. त्यांस त्या विद्यालयांत मोठा मान मिळूं लागला. त्यांचे मोठेमोठे गुरु देखील त्यांस फार वाखाणूं लागले. आणखी ज्यांचा मिळून सहवास त्यांच्याशीं तेथें झाला, त्या सर्वांस असें वाटलें कीं, ग्लाडस्टन हे कोणी लोकोत्तर पुरुष आहेत, आणि हे केव्हां तरी फार मोठ्या योग्यतेस खचीत चढायाचे आहेत. इ० स० १८२९ च्या दिसेंबरांत केंब्रिजच्या विद्यालयांतली कांहीं निवडक मंडळी तेथें गेली होती. त्यांत रिचर्ड मांकटन ह्मणून एक तरुण विद्यार्थी होते. तेच पुढें लार्ड हौटन झाले होते. त्यांनीं तेव्हां ग्लाडस्टनांविषयीं असें लिहिलें कीं, "सर्वांपेक्षां ग्लाडस्टन ह्यांजकडे माझें लक्ष विशेष लागलें. मी खचीत सांगतों कीं, ते फार श्रेष्ठ प्रतीचे गृहस्थ आहेत."

आक्सफोर्ड येथें असतांनाही ग्लाडस्टन ह्यांची छाप तेथल्या बाकीच्या मंडळीवर फार उत्तम बसली. ती केवळ विद्याभ्यासांतच बसली असें नव्हे; तर वर्तनक्रमांतही बसली. त्यांचें वर्तन मोठ्या नमुन्याचें असे. तें पाहून बाकीच्या अव्यवस्थित आणि व्यसनी विद्यार्थ्यांस मोठी शरम वाटत असे. ग्लाडस्टन ह्यांस तेथलें एकही व्यसन लागलें नाहीं. एवढेंच केवळ नव्हे, तर, मद्यपानाचा जो फार मोठा प्रघात तेथें होता, तो त्यांच्या उदाहरणानें बराच कमी झाला. तो केवळ त्यांच्या वेळेसच कमी झाला होता असें नाहीं, तर त्यांनीं तें विद्यालय सोडल्यावरही तो तसाच कमी होता, अशी निदान दाहा वर्षांची तरी साक्ष पटत आहे. फूल मातींत पडलें, तर मातीची घाण फुलास लागत नाहीं, परंतु फुलाचा सुवास मातीस लागतो, असें कवि वर्णितात, त्याचें हें एक फार चांगलें उदाहरण आहे.

ह्या विद्यालयामध्यें असतांना ग्लाडस्टन ह्यांनीं विद्याभ्यास फार उत्तम रीतीनें केला. तो इतका कीं, त्यांस तेथें दरसाल एक हजार रुपये प्राप्तीची स्कालरशिप मिळाली. ती गरीब विद्यार्थ्यास न देतां त्यांस दिली, ह्याबद्दल तेथल्या कांहीं लोकांस बरें वाटलें नाहीं. परंतु, तेव्हां असा एक समज होता कीं, अशी स्कालरशिप ज्यांस मिळते, त्यांनीं मोठ्या मेहेनतीनें अभ्यास करून, विद्यालयास भूषण वाटे अशी योग्यता संपादिलीच पाहिजे. तसें साहित्य ग्लाडस्टन ह्यांचे ठायीं तेथल्या अधिकाऱ्यांस आढळून आलें, ह्मणून त्यांनीं ही स्कालरशिप त्यांस दिली. आणखी, हें आपणांवर एक मोठें ऋण आहे, हें आपणांस लौकिक मिळवून फेडिलें पाहिजे, असें ग्लाडस्टन ह्यांच्या मनांत अहोरात्र घोळत असे. तेणेंकरून त्यांस विद्याभ्यास विशेष अगत्यानें करण्यास उमेद येत असे.

ह्या वेळची दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ग्लाडस्टन ह्यांचा विचार असा होता कीं, आपण वाङ्मय हा ऐच्छिक विषय घेऊन त्यांत एम्. ए. व्हावें. त्यांच्या मनांत गणितशास्त्राकडे लक्ष द्यावयाचें नव्हतें. हें त्यांच्या वडिलांस कळलें. तेव्हां त्यांनीं एकदा त्यांस असें लिहिलें कीं, गणितशास्त्र येत नाहीं तो मनुष्य नाहीं, असें मी समजतों, ह्याकरितां परिक्षेस गणितशास्त्र घेतलेंच पाहिजे. तें पाहातांच, तिळभरही कांकूं न करितां, त्यांनीं गणितशास्त्राच्या अभ्यासास आरंभ केला. आणि तो वाङ्मयाच्या अभ्यासाप्रमाणें मोठ्या आस्थेनें एकसारखा चालविला. हें सगळें वडिलांची आज्ञा पाळण्याकरितां त्या वेळीं त्यांनीं केलें. तरी, प्रौढ वयांत ते स्पष्टपणें असें बोलत असत कीं, त्या वेळीं मी गणितशास्त्र शिकलों, ह्मणूनच मला हिशेबी काम चांगलें करूं लागून, मला दरबारांत फडनिशीची जागा मिळाली; एरव्हीं मिळाली नसती. ह्मणजे आपणांस जें यश प्राप्त झालें, त्याचें श्रेय वडिलांस आहे, असें दर्शविण्याचा त्यांचा आशय असे. वडिलांचे उपकार स्मरणें हें महामतीचें लक्षण आहे.

ते तेथें आपलें एक पलही व्यर्थ घालवीत नसत. आठ आठ दाहा दाहा तास एकसारखे वाचीत असत. आणि जें काय वाचीत असत, तें निरंतरचें

आपलेंसें करीत असत. आणखी, त्या वाचनापासून आपण शिकावयाचें काय, आपण लक्षांत ठेवायाचें काय, हें पाहायास कधींही चुकत नसत. ह्याच परिणाम असा झाला कीं, ह्यांच्या परीक्षा उत्तम प्रतीनें उतरण्यास जी तयारी पाहिजे होती, तिच्या दुप्पट ह्यांची तयारी झाली. तिच्या योगानें एका विषयांत "उत्तम" ह्मणून घेण्यास जितके गुण पाहिजेत होते, तितके त्यांत मिळवून तसेच गुण ह्यांस दुसऱ्या विषयांत मिळाले. हे दोन विषय ह्मटले ह्मणजे प्राचीन भाषा आणि गणित हे होते. तेव्हां, ह्यांस परीक्षेमध्यें "**उत्तमोत्तम**" असें परीक्षकांनीं ह्मटलें. ह्याच्या पलीकडे त्या विद्यालयांतलें मोठें बक्षीस मिळवावयाचें त्यांस राहिलें नाहीं. शिवाय हिब्रू भाषेचा अभ्यासही ह्यांनीं तेथें केला.

ह्या पाठशाळेंत एक ऐक्यसभा ह्मणून स्थापित केलेली होती. तींत पुष्कळ वादविवाद होत असत, आणि निबंध वाचीत असत. त्या सभेंत चांगले, मोठमोठे बुद्धिमान् विद्यार्थी असत. त्या सभेचें चिटणिसीचें काम ग्लाडस्टन ह्यांनीं कांहीं दिवस केलें. आणि पुढें ते त्या सभेचे अध्यक्ष झाले. तेथें त्यांचीं जीं भाषणें झालीं, त्यांवरून त्यांचा मोठा लौकिक झाला. ह्याशिवाय त्यांनीं तेथें एक निबंधसभा स्थापित केली होती.

आई धर्मशील, बाप धर्मशील आणि अगदीं प्रथम विद्याभ्यास झाला त्या शाळेचे गुरु धर्मशील, अशी स्थिति असल्याच्या योगानें ग्लाडस्टनांच्या मनावर लहानपणीं जो धर्मनिष्ठेचा ठसा एकदां वठला, तो तसाच कायम राहिला, एवढेंच नाहीं, तर, तो त्यांच्या ज्ञानवृद्धीबरोबर अधिकाधिक वाढत गेला. नेहमीं देवास भिऊन वागावयाचें, करवेल तेवढा परोपकार करावयाचा, मनोविकारांचें दमन करावयाचें, नेमल्या वेळीं प्रार्थना करावयाच्या, इत्यादि गोष्टी जशा ते लहानपणीं करीत, तशा इटन शाळेंत आणि आक्सफोर्ड विद्यालयांत करीत होते. बिशप चार्लस वर्डस्वर्थ ह्यांनीं असें वर्णन केलें आहे कीं, "सगळ्या विश्वविद्यालयांत त्यांच्या बरोबरीच्या मंडळीमध्यें, नेमानें धर्मशास्त्रपठण करणारा, आणि तें तितकें चांगल्या मार्मिक रीतीनें समजणारा, असा दुसरा एक देखील माणूस नव्हता. आणखी केवळ मलाच एकट्याला

नव्हे, तर आणखी पुष्कळांस त्यांच्याविषयीं असें वाटे कीं, ते केव्हांना केव्हां तरी इंग्लंडच्या दरबारचे मुख्य प्रधान खचीत होणार आहेत." कार्डिनल म्यानिंग ह्या नामांकित धर्मप्रचारकांनीं ह्यांविषयीं असें ह्मटलें आहे कीं, "धर्मशास्त्राचें पुस्तक आणि प्रार्थनेचें पुस्तक हीं बगलेंत मारून नित्य नेमानें देवळांत जातांना आह्मी त्यांस पाहात असूं." ह्या साक्षी लहान नव्हत. अल्प वयामध्यें एवढी बळकट धर्मनिष्ठा असणें हें खरोखर मोठें भाग्य होय. आणखी ही धर्मनिष्ठा ग्लाडस्टन ह्यांच्या ठायीं अखेरपर्यंत अगदीं अचल होती, हें त्यांचें महत् भाग्य होय.

ह्याप्रमाणें इ. स. १८३१ ह्या वर्षीं आपला सगळा विद्योपक्रम संपवून ग्लाडस्टन हे आक्सफोर्ड विश्वविद्यालयांतून, सगळे मानपान आणि सगळ्या पदव्या मिळवून बाहेर पडले. विद्या झाली, तेव्हां अर्थात् पुढें उद्योगधंद्याचा विचार उभा राहिला. वास्तविक पाहिलें असतां, त्यांस आपल्या निर्वाहाकरितां कांहीं धंदा करायास पाहिजेच होता असें नव्हतें. कां कीं, त्यांचा प्रपंच सुखानें सहज चालण्यासारखी दौलत त्यांच्या वडिलांनीं संपादून ठेविली होती. परंतु, कांहींएक उद्योग न करितां राहाणें आणि दुसऱ्यानें मिळविलेलें अन्न खात बसणें, हें ग्लाडस्टनांसारख्या तेजस्वी आणि विचारी पुरुषांस कसें रुचावें? तेव्हां, आतां, एवढी विद्या झाल्यावर आपण उद्योग कोणता करावा, कोणता उद्योग आपणांस चांगला करितां येऊन लाभदायक होईल, ह्याविषयीं ग्लाडस्टन हे विचार करूं लागले. आणखी त्यांस असें ठाऊक होतें कीं, आपण धंदा कोणता करावा ह्याची निवड करणें, ही प्रत्येक माणसाच्या स्वातंत्र्यांतली मुख्य गोष्ट आहे. त्याप्रमाणें हा विचार ग्लाडस्टन ह्यांच्या वडिलांसही मान्य असला पाहिजे. परंतु, त्यांतच आवड ह्मणून एक वासना आहे. तिचें घोडें कधीं कधीं पुढें ढकलतें. आणि त्याप्रमाणें गोष्टी घडतात. ग्लाडस्टन ह्यांच्या मनाचा कल पहिल्यापासून धर्माकडे विशेष होता. त्याच्या योगानें त्यांस असें वाटत होतें कीं, आपण धर्मशिक्षणाच्या कामांत पडावें, ह्मणजे त्याच्या योगानें देवाच्या मोठेपणाचा गौरव आणि माणसांची सेवा हीं दोन्ही साधतील. आणखी त्याप्रमाणें त्या कामांत शिर-

ण्याचा त्यांच्या मनाचा निश्चयही झाला होता. हें त्यांचे सहाध्यायी कार्डि-नल म्यानिंग ह्यांस तेव्हांच कळलें होतें. त्याविषयीं त्यांनीं आपल्या उतार वयांत एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, "धर्मपरिचारक होण्याचा संभव माझ्यापेक्षां त्यांचाच पुष्कळ अधिक होता. आणि मला असें वाटतें कीं, धर्मपरिचारक होण्यास तेव्हां मी जितका अयोग्य होतों, तितके ते योग्य होते." परंतु, त्यांच्या वडिलांची इच्छा कांहीं वेगळी होती. त्यांस असें वाटत होतें कीं, आपला मुलगा चांगला बुद्धिवान् आहे, आणि विद्वान् झाला आहे, ह्यानें देशहिताच्या कामांत पडून, पराक्रम करून कीर्तिमान् व्हावें. असा मतभेद पडला. तरी, ग्लाडस्टन ह्यांस त्याविषयीं तिळभरही संकट वाटलें नाहीं. कां कीं, वामनांनीं ह्मटलें आहे,

**जो तोपवी स्वजनकास सुपुत्र तोच.**

त्याप्रमाणें ग्लाडस्टन हे सुपुत्र होते. त्यांनीं आपली सगळी इच्छा एकीकडे गुंडाळून ठेवून, पित्याच्या विचाराप्रमाणें देशाच्या कारभारांत पडण्याचा निश्चय केला. प्रत्येक मनुष्य स्वतंत्र आहे, त्याच्या स्वातंत्र्यांत हात घाल-ण्यास दुसऱ्या कोणासही अधिकार नाहीं, अशा गोष्टी सांगून स्वातंत्र्याच्या पांघरुणाखालीं स्वतः मनःपूत वागणारे किंवा दुसऱ्यांस मनःपूत वागण्यास उपदेश करणारे जे कोणी ह्या युगांत कोठें कोठें दृष्टीस पडतात, त्यांनीं ही ग्लाडस्टनांची गोष्ट ऐकून मान खालीं घालावी. आह्मी तर असें समजतों कीं, ग्लाडस्टन ह्यांस ही पित्राज्ञा शिरसावंद्य करण्याची जी एवढी प्रबल इच्छा झाली, तीस कारण त्यांची धर्मश्रद्धाच होय. त्यांच्या धर्मशास्त्रांत, इतर धर्मशास्त्रांप्रमाणें, पित्याची आज्ञा शिरसावंद्य करण्याविषयीं पुष्कळ वचनें आहेत. त्यांतलीं थोडींशीं येथें सांगतों.—

**लेंकरांनो, बापाचा उपदेश ऐका.**

**सुज्ञ पुत्र आपल्या बापाचा उपदेश ऐकून घेतो.**

**माझ्या लेंकरा, आपल्या बापाचा उपदेश ऐकून घे.**

**लेंकरांनों, तुह्मी सर्व प्रकारें आईबापांस माना; कारण हें प्रभूला आवडतें आहे.**



# भाग तिसरा.



## जनस्थिति, योगायोग आणि उदयारंभ.

कालदेशवर्तमान पाहून तदनुरूप आपलें आचरण ठेवणें
हाच काय तो मुख्य सद्गुण होय.

**एक रोमन तत्वज्ञ.**

सारासार विचार उभारलें जगडंबर
त्यांत कोण सार कोण असार विवेकें ओळखावें.

**रामदास.**



कंदर राज्यें तीन प्रकारचीं असतात. राजसत्ताक, राजलोकसत्ताक, आणि लोकसत्ताक. राजसत्ताक ह्मणजे एकट्या राजाच्या इच्छेप्रमाणें चालतें राज्य तें. राजलोकसत्ताक ह्मणजे राजा आणि लोक ह्या दोघांच्या अनुमतानें चालतें राज्य तें. आणि लोकसत्ताक ह्मणजे केवळ लोकांच्या अनुमतानें चालतें राज्य तें. ह्यांपैकीं, ह्या वेळीं, इंग्लंडांत राजलोकसत्ताक राज्य आज कितीएक शतकांपासून स्थापित झालेलें आहे. सिंहासनारूढ राजा किंवा राणी कोणी तरी असतें. त्याच्या हातीं राजसत्ता असते. पण, ती नियमित असते; सगळी नसते, त्या सिंहासनारूढास राज्यकारभारांत साह्य करण्यास पार्लमेंट ह्मणून एक सभा असते. तिच्या हातीं बाकीची सगळी सत्ता असते. त्या सभेच्या अनुमताशिवाय सिंहासनारूढास कांहींएक राज्यकार्य करितां येऊं नये, त्याप्रमाणेंच, सिंहासनारूढाची मान्यता पडल्याखेरीज पार्लमेंटास कोणतेंही राज्यकार्य करितां येऊं नये, अशी रचना करून ठेविली आहे. ह्मणजे, देशामध्यें राजा ही जशी एक महाशक्ति आहे, तशी, पार्लमेंट ही एक महाशक्ति आहे; देशाचें

कल्याण करणें जसें राजाच्या हातीं आहे, तसेंच पार्लमेंटाच्या हातीं आहे; अशी समजूत तिकडच्या सगळ्या लहानमोठ्या लोकांची झालेली आहे. ह्या पार्लमेंटाच्या दोन शाखा आहेत; एक लार्डांची सभा, ह्मणजे राजाच्या उमरावांची आणि मानकऱ्यांची, आणि दुसरी कामन्सांची सभा, ह्मणजे प्रजाजनांनीं निवडून दिलेल्या आपल्या वतीच्या प्रतिनिधींची सभा. ह्यांतल्या लार्डांच्या सभेंत ५७० सभासद आहेत. ह्या ५७० पैकीं ६ राजकुळांतले आहेत, २ आर्चबिशप आहेत, २२ ड्यूक आहेत, २२ मार्किस आहेत, १२० अर्ल्स आहेत, २६ व्हायकौंट आहेत, २४ बिशप आहेत, ३०४ ब्यारन्स आहेत, स्काटलंडच्या वतीचे मानकरी १६ आहेत, आणि ऐर्लंडाच्या वतीचे २८ आहेत. आणि कामन्सांच्या सभेंत एकंदर ६७० सभासद आहेत. ह्या ६७० पैकीं इंग्लंड आणि वेल्स ह्यांच्या वतीचे ४९५ आहेत, स्काट्लंडाच्या वतीचे ७२ आहेत, आणि ऐर्लंडाच्या वतीचे १०३ आहेत. ह्या संख्या स्थूलमानाच्या आहेत.

ह्या दोन सभांपैकीं, लार्डांच्या सभेंत प्रवेश होणें हें अगदीं सिंहासनारूढाच्या इच्छेवर अवलंबून असतें. परंतु, कामन्सांच्या सभेंत ह्मणजे प्रतिनिधींच्या सभेंत जागा मिळविणें हें कोणाही माणसाच्या स्वतःच्या शाहाणपणावर आणि कर्तबगारीवर अवलंबून असतें. कां कीं, मनुष्य शहाणा आणि कर्तबगार असा दिसला, ह्मणजे लोक त्याला आपला प्रतिनिधि ह्मणून निवडून त्या सभेंत पाठवितात. आणि अशा प्रकारें आपली निवड होणें हा इंग्लंडामध्यें फार मोठा मान समजतात. तो एवढा मोठा कीं, त्याच्यापुढें हिंदुस्थानांतल्या इलाख्याच्या गव्हरनरांच्या जागा ह्या कांहींच नाहींत. आपणां सर्वांस ठाऊक आहे कीं, आपल्या इलाख्याचे मोठे हुशार आणि व्यवहारदक्ष गव्हरनर सर रिचर्ड टेंपल हे, आपली पांच वर्षांची मुदत सरण्याच्या आधींच, गव्हरनराच्या कामाचा राजीनामा देऊन पार्लमेंटांत—ह्मणजे अर्थात् कामन्ससभेमध्यें—आपली निवड करून घेण्याकरितां उड्या घालीत तिकडे निघून गेले होते. तेथें त्या वेळीं त्यांची निवड झाली नाहीं, तें वेगळें; पण त्या सभासदपणाची केवढी प्रतिष्ठा तिकडे मानितात, हें त्या वेळीं स्पष्ट झालें.

ह्याचें कारण एवढेंच कीं, त्या ठिकाणीं आपल्या देशाच्या उपयोगीं पडण्यास—आपल्या देशाचें कल्याण करण्यास—मनुष्यास पुष्कळ जागा असते, असें सर्व लोक समजतात. ह्मणून विद्या संपादून, मोठमोठ्या परीक्षा देऊन, पदव्या मिळवून, जो काय मोठा दिग्विजय करावयाचा, तो हाच कीं, कामन्स सभेंत सभासद होऊन जावयाचें, आणि तेथें आपली कर्तृत्वशक्ति दाखवायाची, असें इंग्लंडांतल्या सगळ्या सुशिक्षित आणि कीर्तिप्रिय लोकांस वाटत असतें. त्याप्रमाणें ह्या वेळेस ग्लाडस्टन ह्यांस झालें असावें, हें उघड आहे.

ह्याशिवाय इंग्लंडाच्या दरबारीं दुसरा एक मोठा चमत्कारिक प्रकार आहे. तो सगळ्या दरबारांत, कोणत्या ना कोणत्या तरी रूपानें असतोच आहे, परंतु, इंग्लंडांत त्याचा पर्याय कांहीं विशेष आहे. तो हा कीं, आज कितीएक वर्षांपासून त्यांच्यामध्यें भले मोठे दोन पक्ष पडलेले आहेत. त्यांस, इ० स. १८३४–३५ पर्यंत व्हिग आणि टोरी अशीं नांवें चालत होतीं. त्यांसच आतां **लिबरल** आणि **कान्सर्व्हेटिव** अशीं नांवें पडलीं आहेत. त्यांच्यामध्यें मोठा भेद हा आहे कीं, लिबरल पक्ष जो आहे, त्याचीं मतें अशीं आहेत कीं, राज्यव्यवस्थेमध्यें, अनुभवांतीं, जे जे फेरफार, कालवशेंकरून आवश्यक वाटतील, ते ते लोककल्याणार्थ बेलाशक करावे, त्यांच्या आड कोणीं येऊं नये. आणि कान्सर्व्हेटिव पक्षाचें मत असें आहे कीं, जें काय जुनें, मागेंपासून चालत आलें आहे, तें तसेंच, अचल चालूं द्यावें. त्यांत सहसा कधीं फेरफार करूं नये. ह्मणजे, आमच्यांतल्या सध्याच्या लोकस्थितीप्रमाणें ह्मटलें ह्मणजे लिबरल पक्षास **नवा पक्ष** आणि कान्सर्व्हेटिव पक्षास **जुना पक्ष** ह्मटलें असतां बरेंच शोभण्यासारखें आहे, आणि तें आमच्या वाचकांस सहज समजण्यासारखें आहे. आलीकडे मराठीमध्यें ह्या नव्या पक्षास **उदार** आणि जुन्या पक्षास **अनुदार** अशीं नांवें कोणीं कोणीं दिलीं आहेत. ह्या दोन्ही पक्षांची मंडळी पार्लमेंटामध्यें असते. आणि ह्या सभेचीं सगळीं कामें बहुमताप्रमाणें चालत असल्याकारणानें, ज्या पक्षाचे लोक पार्लमेंटांत अधिक असतात, त्या पक्षाचें ह्मणणें खरें होतें, त्याची चलती राहते, आणि दुसऱ्या पक्षास माघार घ्यावी लागते. आणखी, ज्या

पक्षाची सरशी होते, त्याच्या हातीं राज्यकारभार जाऊन, सगळें प्रधानमंडळ त्या पक्षाच्या लोकांचें होतें. स्वतः सिंहासनारूढास कोणत्याच पक्षाचा अभिमान नसतो. त्याला अभिमान सरशीचा किंवा श्रेष्ठत्वाचा असतो, असें ह्मटलें तरी चालेल. हे पक्ष एकमेकांचा पाडाव करण्याविषयीं नेहमीं आपली पराकाष्ठा करीत असतात. हा झगडा एकसारखा चाललेला असतो. त्याच्या योगानें, कुस्त्यांनीं मल्लांचें शरीर सुदृढ होतें त्याप्रमाणें, एकंदरींत, राज्याचें फार हित होत असतें, असा शहाण्या माणसांचा समज आहे.

आणखी ह्या पक्षभेदाचा चमत्कार असा आहे कीं, समजुती फिरल्या-कारणानें किंवा अनुभव अधिक आल्याच्या योगानें, मनुष्य कान्सर्व्हेटिव-पक्षी असतो तो लिबरलपक्षी होतो, असें प्रत्ययास आलें आहे. ह्याचें एक मोठें उदाहरण ह्मटलें ह्मणजे ग्लाडस्टन ह्यांचें आहे. हे शाळेंत आणि पाठ-शाळेंत होते तेव्हांपासून हे कान्सर्व्हेटिव पक्षाचे कट्टे अभिमानी होते. त्यांस जुनें चालत आलेलें तें सगळें चांगलें वाटत असे, आणि राज्यव्यव-स्थेंत नवीन फेरफार करावयाचा ह्मटला ह्मणजे त्यांचें पित्त खवळत असे. इटन आणि आक्सफोर्ड येथील सभांमध्यें अशा प्रकारचे वाद पुष्कळ निघत. त्या प्रसंगीं लिबरलपक्षी लोकांच्या कोटिक्रमाच्या ते चिंधड्या चिंधड्या करून टाकून, आपलें मत स्थापित करीत असत. इ० स० १८३१ ह्या वर्षीं **रिफार्मबिल** ह्मणजे पार्लमेंट सुधारण्याच्या कायद्याचा मसुदा लार्ड ग्रे ह्यांनीं पार्लमेंटापुढें आणिला होता. त्यांत, पार्लमेंटाचे सभासद निवड-ण्याच्या पद्धतीमध्यें जी जुनी अव्यवस्था होती, ती काढून टाकण्याचे नियम घातलेले होते. ह्मणजे कितीएक मोठ्या शहरांच्या आणि प्रांतांच्या वतीचे सभासद पार्लमेंटांत मुळींच नव्हते; आणि कितीएक यःकश्चित् स्थलांच्या वतीचे सभासद पिढ्यानपिढ्या निवडून येत होते; ही जुनीपुराणी असंबद्ध पद्धति काढून टाकून, स्थलमहत्वाच्या मानानें सभासद पार्लमेंटांत घ्यावे, असा एक मुख्य नियम होता. शिवाय दुसरे कितीएक असे नियम होते; ते चांगले आणि आवश्यक होते. तरी, त्यांच्या योगानें जुन्या निवडणुकीच्या पद्धतीमध्यें पुष्कळ फेरफार व्हावयाचे होते. तेवढ्यावरून

तो मसुदा ग्लाडस्टन ह्यांस आवडला नाहीं. आणि तो विषय आक्सफोर्ड विश्वविद्यालयाच्या सभेमध्यें वादास निघाला, तेव्हां ते रागानें असें ह्मणाले कीं, "ह्या कायद्यानें आमच्या सगळ्या राज्याची उलटापालट होईल, आणि आमच्या सामाजिक व्यवस्थेचा सगळा पाया निखळून जाईल." हें त्यांचें भाषण ते कान्सर्व्हेटिवपक्षपाती असल्या वेळचें होतें. पुढें इ. स. १८५९ ह्या वर्षीं ते, होत होत होत, पूर्णपणें लिबरलपक्षपाती झाले. तेव्हांपासून त्यांस आपल्या कान्सर्व्हेटिवपक्षपातीपणाविषयीं कधीं कधीं फार पश्चात्ताप होत असे, आणि त्याविषयीं ते उघडपणें बोलत असत. त्या संबंधानें इ. स. १८७८ ह्या वर्षीं आक्सफोर्ड येथें एका सभेंत ते असें ह्मणाले कीं, "माझ्या वेळच्या आक्सफोर्ड येथील अध्यापनक्रमांत एक फार मोठा दोष होतासा वाटतो. तो कदाचित् माझा स्वतःचा दोष असेल. तो हा कीं, आक्सफोर्ड येथें असतां, मला जें काय शिकतां आलें नाहीं, तें मी आक्सफोर्ड सोडल्यावर शिकलों. तें हें कीं, मनुष्याच्या स्वातंत्र्याच्या अविनाशी आणि अमोल अशा मूलतत्त्वांची खरी योग्यता समजणें—हें मला तेथें आलें नाहीं. तें आतां आलें आहे." आह्मांस ह्या ह्मणण्याचें मुळींच आश्चर्य वाटत नाहीं. मनुष्यास सगळें ज्ञान एकदम कोठें मिळत नसतें. ज्ञानाचा कांहीं गठ्ठा बांधलेला नसतो; ह्मणून तें कोणालाही एकदम देतां किंवा घेतां येत नाहीं. शिवाय, कांहीं ज्ञान असें आहे कीं, तें कोणाला सांगून कळत नाहीं. त्याविषयीं अनुभवच घ्यावा लागतो. किंवा, त्याची पक्कता केवळ अनुभवानेंच व्हावयाची असते. तसें, लिबरलपक्षपाती होण्यास जें काय ज्ञान पाहिजे होतें, अथवा जो काय अनुभव पाहिजे होता, तें ज्ञान किंवा तो अनुभव त्यांस आक्सफोर्ड येथें मिळाला नाहीं, ह्मणून ते कानसर्व्हेटिव राहिले, ह्यांत काय नवल आहे? पण, त्यांत येथें एवढें घ्यावयाचें कीं, त्यांस तें ज्ञान आणि तो अनुभव मिळाल्यावर मग आपलीं पहिलीं मतें सोडून देण्यास ते कचरले नाहींत, किंवा लाजले नाहींत. ह्यावरून नीतिधैर्याचा अंकुर त्यांचे ठायीं मोठ्या जोराचा पहिल्यापासून होता, असें दिसतें.

विद्योपक्रम पुस्तकसंबंधाचा संपला, परंतु, देशाटनावांचून ज्ञानसंपादनाची पूर्णता होत नाहीं, अशी समजूत यूरोपांत असल्याकारणानें, ग्लाडस्टन, लार्ड लिंकन आणि आर्थर हालाम, हे तिघे एकत्रपणें युरोपांतले देश पाहण्यास निघाले. त्यांनीं फ्रान्स आणि जर्मनीचा कांहीं भाग पाहिला. तेव्हां फ्रान्समध्यें १८३० ची राज्यक्रांति नुकतीच आटोपून थोडें स्थिर-स्थावर होत होतें. तेथें लुई फिलिपि ह्यास गादीवर बसवून, पार्लमेंटाची जुळाजूळ करण्यांत मंडळी गुंतली होती. तेथें, इंग्लंडच्या वतीचे वकील लार्ड ग्रानव्हिल ह्यांच्या येथें, थायर्स, गिझो, लाफयत, इत्यादि नामांकित फ्रेंच मूर्तींची गांठ घ्यावयास ग्लाडस्टन ह्यांस चांगली संधी सांपडली. शिवाय, त्यांनीं तेथलें दरबार, न्यायसभा इत्यादि सर्व लक्षपूर्वक पाहिलें, आणि पुष्कळ माहिती करून घेतली. पुढें ग्लाडस्टन हे आपल्या दोघां मित्रांस सोडून एकटेच इटली देशांत गेले. तिकडे राज्यांत फार अव्यवस्था त्यांच्या दृष्टीस पडली. तिजविषयीं माहिती मिळवीत आणि इटालियन भाषेचा अभ्यास करीत हे स्वस्थ फिरत राहिले.

इकडे इंग्लंडामध्यें ती वेळ मोठी गडबडीची होती. ती कशी हें थोडें विशेष स्पष्ट करून सांगितलें पाहिजे. ती वेळ इ० स० १८३२ हें वर्ष होय. ह्या वर्षाच्या आदिपश्चात् इंग्लंडांत आणि त्याच्या आसपास काय स्थिति होती आणि काय काय झालें होतें, हें पाहिलें पाहिजे, ह्मणजे तें सगळें लक्षांत येईल. इंग्लंडाच्या गादीवर चौथा विलियम हा राजा होता. फ्रेंच लोकांनीं आपल्या दाहाव्या चार्लस राजाला पदच्युत करून देशांतून हांकून दिलें होतें. बेलजम हें हालंडाशीं झगडून वेगळें झालें होतें. हें पाहून इंग्लंडांतल्या लोकांस आवेश चढल्यासारखा झाला होता. त्यांना असें वाटूं लागलें होतें कीं, फ्रान्स, बेलजम इत्यादि देशांत लोकसत्तेचें माहात्म्य जसें वाढलें आहे, तसें इंग्लंडांत वाढलें पाहिजे. राज्यव्यवस्थेंत सुधारणा झाली पाहिजे. पार्लमेंटाचे सभासद निवडण्याच्या कामांत जो घोंटाळा आहे, तो निघाला पाहिजे. ही लोकांची तीव्रता सरकाराच्या दृष्टोत्पत्तीस आली. तेव्हां त्यांसही असें वाटलें कीं लोकांचें ह्मणणें कबूल करणें भाग आहे.

त्याप्रमाणें, इ० स० १८३१ च्या मार्च महिन्यांत पार्लमेंटसभा भरल्यावर, लार्ड जान रसेल ह्यांनीं कामन्ससभेपुढें **रिफार्मबिल** आणिलें. त्याचें पहिलें वाचन झालें. तेव्हां मतें घेतांना असें दिसलें कीं, त्यास प्रतिकूलांपेक्षां अनुकूल असें काय तें एकच मत अधिक होतें. तेवढें बस नव्हतें. तें बिल चांगलें होतें, तरी, कान्सर्व्हेटिवपक्षाच्या मंडळीस तें अतिशयित त्रासदायक आणि अपमानास्पद वाटलें. सरकारानें लोकमत पाहण्यासाठीं पार्लमेंटसभा बरखास्त करून नवीन निवडीचा हुकूम सोडिला. तेव्हां देशांत जागेजाग दंगे होऊं लागले. नाटिंगहाम क्यासल ह्या इमारतीस आग लाविली. आणि ब्रिस्टल येथें सगळें शहर लोकांनीं आपल्या स्वाधीन करून घेऊन, तेथल्या तुरुंगांतले कैदी सोडून दिले. ह्या दंग्याधोप्यामध्यें कितीएक माणसें प्राणांस मुकलीं, आणि लक्षावधि रुपयांच्या सामानसुमानाचा नाश झाला. हा सगळा प्रकार रिफार्मबिलाच्या प्रतिपक्ष्यांस भिवविण्यासाठीं होता. ह्या इतक्या गोष्टी इकडे चालल्या असतांना, प्रतिनिधींची नवी निवड होऊन त्यांची सभा भरली, आणि त्यांनीं तें रिफार्मबिल पसंत केलें. परंतु, तें लार्डांच्या ह्मणजे मानकऱ्यांच्या सभेनें नामंजूर केल्यामुळें तेथें तसेंच थडकून राहिलें.

ह्या वेळेच्या सुमारास इंग्लंडाची स्थिति कशी झाली होती, तिचें वर्णन रसेल नामक ग्रंथकारानें केलें आहे. त्याचें तात्पर्य असें:—स्वातंत्र्यभक्त होते, त्यांना वाटत होतें कीं हा नवा कायदा झाल्यास स्वातंत्र्याचा सुकाळ होईल. शहाण्या लोकांस वाटे कीं, सरकारानें वेळींच लोकांस सवलती दिल्यानें राज्यक्रांतीचें विघ्न टळेल. भाविकांस वाटे कीं, लोकांस राजकीय हक्क मिळाले ह्मणजे आपोआप त्यांचें दुःख आणि दरिद्र नाहींसें होईल. परंतु, अनर्थ घडत होते त्यांवरून भित्रे लोक घाबरून गेले होते. त्यांना वाटे फ्रान्ससारखी राज्यक्रांति आपल्या येथें होईल कीं काय कोण जाणे. ऐर्लंडांत गुप्तपणें बंडाची तयारी होती. दांडग्या लोकांस जय मिळतो, असें पाहून ते सरकारास भीतनासे झाले होते. बाजारांत पतपाणी कमी झालें होतें. आपली मालमत्ता कशी सुरक्षित राहील, असें भय लोकांस पडलें

होतें. व्यापारधंद्यास कोणी पुढें सरेना. आतां कांहींतरी एकदम मोठी क्रांति होणार आहे असें लोकांस वाटे. मोठमोठ्या शहरांत एक भयंकर रोग पसरून हजारों माणसें मरत होतीं. लोक गर्भगलित झाले होते. प्रलयकाल समीप आला, असें धर्मभोळ्यांस वाटत होतें. ह्या स्थितीविषयीं कार्लाइल ह्या तत्त्ववेत्त्यानें ह्मटलें आहे कीं, "आपण सगळे देवास विसरलों आहों, हें ह्या अनर्थाचें मूळ आहे."

हें बिल पास व्हावें अशी इच्छा पुष्कळ चांगल्या मोठमोठ्या देशहितेच्छु लोकांची होती. त्यांच्या आग्रहास सरकारच्यानें ना ह्मणवेना. आणि जुन्या पक्षाच्या लोकांस तें पसंत नव्हतें, ह्मणून लार्डांच्या सभेंत त्यास बहुमत मिळेना; आणखी, बिल नामंजूर होणार, ह्या भीतीनें अज्ञानलोक दंगा करीत होते, ते कांहीं केल्या स्वस्थ राहीनात. ह्या वेळीं मुख्य प्रधान जगद्विख्यात ड्यूक आफ् वेलिंग्टन हे होते. त्यांनीं वाटर्लूच्या लढाईंत मोठा दिग्विजय करून लोकांत आपलें नांव गाजविलें होतें. तरी, ह्या कामांत लंडनशहरीं त्यांचें कोणी कांहीं ऐकेना. तेव्हां त्यांस तें काम सोडून


ड्यूक आफ् वेलिंग्टन.

द्यावें लागलें; आणि अर्ल ग्रे ह्यांस मुख्य प्रधान व्हावें लागलें. सध्यांचे लार्ड ह्या बिलास बहुमत मिळूं देत नाहींत, त्या पक्षीं आणखी नवे पुष्कळसे लार्ड करावे, ह्मणजे त्या बिलास आपोआप बहुमत मिळेल, अशी मसलत हे मुख्य प्रधान राजास देत होते. परंतु, ती त्यास आवडली नाहीं. तेव्हां, कोणत्या तरी पर्यायानें ह्या बिलास लार्डांच्या सभेंत बहुमत मिळण्याकरितां अशी युक्ति योजिली कीं, जे लार्ड ह्या बिलास प्रतिकूल होते, त्यांतल्या शंभर लार्डांनीं त्या दिवशींच्या सभेस बुद्ध्या मुळींच येऊं नये.

त्याप्रमाणें सगळी व्यवस्था झाली, आणि तें रिफार्मबिल एकदाचें पास होऊन त्याचा अंमल चालू झाला.

ह्या नव्या कायद्याच्या अंमलानें पार्लमेंटाचे सभासद निवडण्याच्या पद्धतींत ज्या सुधारणा झाल्या, त्या येणेंप्रमाणेः—१. ज्या प्रांतांत मतदार लोक थोडे होते, त्या प्रांतांस प्रतिनिधि निवडण्याचा अधिकार नाहींसा झाला. २. बर्मिंगहाम, लीड्स, मांचेस्टर इत्यादि जीं शहरें गेल्या शंभर वर्षांत फार वाढलीं होतीं, त्यांस आपल्या वतीनें पार्लमेंटांत प्रतिनिधि पाठविण्याचा अधिकार पहिल्यानेंच मिळाला. ३. निवड करण्याचें मत देण्यास अधिकार पुष्कळ लोकांस मिळाला. ४. शहरांत जे कोणी स्वतःच्या घरांत राहात होते, किंवा दरसाल दाहा पौंड देऊन भाड्याच्या घरांत राहात होते, त्यांस, आणि खेड्यापाड्यांनीं ज्यांस स्वतःचें घर किंवा जमीन दाहा पौंड किंमतीची होती, त्यांस मत देण्याचा अधिकार मिळाला. ह्मणजे, पहिली जी अंदाधुंदी होती, ती मोडली. कामन्सांची सभा ह्मणजे लोकांच्या प्रतिनिधींची सभा—तींत खरोखर लोकमत प्रदर्शित व्हावें आणि त्याच्या अनुरोधानें राज्याचीं कामें चालावीं, अशी तिची रचना झाली.

ह्याप्रमाणें रिफार्मबिल पसार झाल्यावर पार्लमेंट बरखास्त होऊन नवीन कायद्याप्रमाणें सभासदांची निवडणूक लागलीच चालू झाली. त्या निवडणुकीच्या वेळीं ग्लाडस्टन त्यांत कसे आले तें सांगतों. ड्यूक आफ् न्यूक्यासल ह्मणून एक मोठे कान्सर्व्हेटिव जमीनदार होते. त्यांचें वजन न्यूआर्क ह्या कसब्यांत फार मोठें असल्याकारणानें त्यांस वाटेल त्या मनुष्यास ते त्या कसब्यांतून निवडून पाठवीत असत. आणि त्याविषयीं त्यांस मोठी घमेंड असे. परंतु १८३१ ह्या वर्षाच्या निवडणुकींत तेथें त्यांचें कांहीं चाललें नाहीं, आणि एक लिबरल पक्षाचा मनुष्य निवडण्यांत आला. तेव्हां, ह्या नवीन निवडणुकीच्या वेळीं आपल्या पक्षाचा कोणी चांगला उमेदवार त्यांस पाहिजे होता. त्या ड्यूकांचा मुलगा लार्ड लिंकन हा आक्सफोर्ड येथें ग्लाडस्टनांचा साहाध्यायी होता, त्यानें तेथल्या सभेंतलें ग्लाडस्टन ह्यांचें भाषण ऐकिलें होतें, आणि

त्याचा ठसा श्रोत्यांवर किती चांगला उठला होता, हें पाहिलें होतें. त्यानें आपल्या वडिलांस सांगितलें कीं, ग्लाडस्टनांस जर ह्या कामास बोलवाल, तर सगळ्या अडचणी एकदम दूर होतील. त्याप्रमाणें ड्यूक आफ् न्यूक्यासल ह्यांनीं ग्लाडस्टनांस इटली देशांतून बोलावून नेलें. आणि ग्लाडस्टनांनीं त्या कसब्याच्या मतदारांस अशा रीतीनें आपलें बुद्धिवैभव दाखविलें कीं, त्यांचें भाषण ऐकिल्याबरोबर त्यांनीं त्यांची निवड केली. तें भाषण पुष्कळ लांब आहे. तरी, त्यांतला एक भाग फार चित्तवेधक आहे. त्याचें तात्पर्य असें. "अमक्या एका माणसाच्या अथवा अमक्या एका पक्षाच्या मतांप्रमाणें मी मतें देईन, असें तुह्मांस सांगून तुह्मी मला निवडा असें मी तुह्मांस ह्मणत नाहीं. तर, माझ्या ज्या समजुती मीं स्पष्टपणें बोलून दाखविल्या आहेत, त्या तुह्मांस पसंत असल्या, तर तुह्मी मला निवडा, असें तुह्मांस माझें सांगणें आहे. त्या समजुती ह्मणजे ह्या कीं, कांहीं एक शोध न करितां, आणि सारासारविचार न पाहातां, राज्यपद्धतींत उगाच कांहींतरी फेरफार करण्याचा प्रयत्न करणें, ह्याचा प्रतिकार केला पाहिजे. कदाचित् त्या फेरफारापासून अल्पस्वल्प बरें होतेंसें दिसत असेल; परंतु, त्या बऱ्याबरोबर वाईट पुष्कळ खचीत व्हावयाचें. ह्मणून अशा प्रयत्नांचा प्रतिकार अवश्य केला पाहिजे. माझी खचीत खातरी आहे कीं, अशा फेरफारापासून, आमच्या समाजामध्यें जें काय वाईट आहे, तें वाढावयाचें आहे, आणि गरीबगुरीब मजुरांच्या डोक्यांवरचें ओझें अधिक जड व्हावयाचें आहे. त्याप्रमाणेंच, समाजांतली शांतता नाहींशी व्हावयाची आहे, लोकांतला विश्वास उडावयाचा आहे, आणि सगळ्या उन्नतीच्या बुडावर घाव बसावयाचा आहे. ह्मणून त्याचा प्रतिकार केला पाहिजे, असें मी समजतों." ह्या भाषणाच्या झोंकावरून उघड दिसून आलें कीं, ग्लाडस्टन हे पक्के कान्सर्व्हेटिवपक्षपाती होते. तें मतदारांस फार आवडलें, आणि अशा प्रकारें ग्लाडस्टन हे इ० स० १८३२ ह्या वर्षीं न्यूआर्कच्या वतीनें पार्लमेंटाचे सभासद झाले. तेव्हां त्यांस आणि त्यांच्या तीर्थरूपांस मोठा संतोष झाला. येथें एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी ही आहे कीं,

त्यांचा राजद्वारीं जो प्रवेश झाला, तो केवळ त्यांच्या विश्वविद्यालयांतल्या वक्तृत्वाच्या लौकिकानें झाला, विद्वत्तेच्या जोरावर झाला, इतर खटपटींनीं झाला नाहीं.

ग्लाडस्टन हे पार्लमेंटाचे सभासद झाले तेव्हां ते कान्सर्व्हेटिवपक्षाचे होते, हें वर सांगितलेंच आहे. त्यांचीं मतें तेव्हां कशीं होतीं, ह्याचें स्थूलमानाचें वर्णन एका ग्रंथांत केलें आहे, त्याचें तात्पर्य असें:—ते अमक्या एकाचें ऐकणारे किंवा अमक्या एकास धरून चालणारे असे नव्हते. ते केवळ स्वमतानुसारी होते. त्यांची इच्छा अशी होती कीं, राज्यकारभारांत वारंवार बदल करण्याविषयींची जी प्रवृत्ति लोकांत वाढत चालली आहे, तिचा प्रतिकार करावा; कां कीं, तीपासून इष्टापेक्षां अनिष्ट अधिक होण्याचा संभव आहे. राष्ट्राच्या उद्धाराचा उत्तम मार्ग ह्मटला ह्मणजे हा कीं, राज्यकर्त्यांनीं अगदीं बरोबर रीतीनें धर्मनीतीस धरून आपलीं कर्तव्यें करावीं, आणि कायद्यामध्यें तीं धर्मबंधनें बरोबर राखावीं. गरीबांच्या स्थितीकडे विशेष लक्ष असावें. मजूरांस योग्य मजुरी मिळावी. गुलामगिरी ही धर्मशास्त्रप्रणीत आहे. परंतु, गुलामांच्या मुलांस विद्या शिकवावी, आणि सोईसोईनें त्यांस मुक्त करावें. हीं मतें लिबरलपक्षाच्या मतांच्या अगदीं उलट होतीं, हें उघडच आहे.

नव्या कायद्याप्रमाणें निवडलेल्या लोकांच्या प्रतिनिधींची पहिली सभा इ० स० १८३३ च्या जानेवारी महिन्याच्या २९ व्या तारखेस भरली. ह्याच ग्लाडस्टनांचा पार्लमेंटांत प्रवेश होय. हे जे कोणत्या सुमुहूर्तावर ह्या सभेंत आले, ते तिजमध्यें एकसारखे एकसष्ट वर्षें ह्मणजे इ० स० १८९४ पर्यंत होते. ते एकाच प्रांताच्या वतीनें नव्हते. तर वेळोवेळीं त्यांची निवड वेगळ्या वेगळ्या प्रांतांनीं आणि वेगळ्या वेगळ्या संस्थांनीं केली होती. एका वेळीं तर, ज्या विश्वविद्यालयांत ते एवढे विद्वान् झाले, त्या आक्सफोर्डच्या विश्वविद्यालयाच्या वतीचे ते सभासद होते. आणि त्याविषयीं त्यांस मोठा अभिमान वाटत असे. शिवाय ह्या मुदतींत त्यांनीं कितीएक वेगळ्या वेगळ्या

सरकारी हुद्यांच्या जागा पतकरून उत्तम कामगिरी बजाविली. त्यांत देशाच्या फडणिशीचें काम ह्मणजे जमाखर्चाचें काम उत्तम प्रकारें करून, देशाचें उत्पन्न वाढविलें, आणि लोकांवरचें करांचें ओझें कमी केलें. त्याचें वर्णन पुढें केलेंच आहे. त्याप्रमाणेंच, दरबारांतल्या दोन पक्षांच्या झटापटीमध्यें हे चार वेळां महाराणी सरकाराचे मुख्य प्रधान झाले होते. प्रथम इ० स० १८६८ पासून १८७४ पर्यंत; दुसऱ्यानें १८८० पासून १८८५ पर्यंत; तिसऱ्यानें १८८६ त कांहीं दिवस; आणि चौथ्यानें १८९२ पासून १८९४ पर्यंत.

ह्या एकसष्ट वर्षांत त्यांनीं कितीएक तपेंपर्यंत सगळ्या कामन्स सभेच्या कामाचीं सूत्रें आपल्या हातांत ठेविलीं होतीं. आणि आपल्या बुद्धिबळानें केवळ स्वदेशाचींच नव्हत, तर परदेशांचींही मोठमोठीं कामें केलीं. ह्या सभेंत येऊन बसण्याच्या आधीं प्रत्येक सभासदास शपथ घ्यावी लागते. ती अशीः—“मी परमेश्वरस्मरण करून असें ह्मणतों कीं, मी सगळें काम प्रामाणिकपणानें करीन, सिंहासनारूढाशीं, त्याच्या गादीच्या वारीसदारांशीं, आणि त्याच्या मागून गादीवर बसतील त्यांशीं प्रजाधर्मानें वागेन. ह्यांत परमेश्वर मला साह्य करो.” ह्याप्रमाणें, इतरांबरोबर ग्लाडस्टन ह्यांनीं शपथ घेतली, आणि अगदीं अखेरपर्यंत त्याप्रमाणें ते वागले. एवढेंच केवळ नव्हे, तर त्याहून पुष्कळ अधिक चांगल्या प्रकारें वागले. हेंच शपथेचें खरें साफल्य होय.

ही सभा एकदा भरूं लागली, ह्मणजे ती कितीएक दिवसपर्यंत तशीच दररोज भरत जाते. ती सगळी कामें आटपतपर्यंत तशीच चालतें. तीं कामें फार मोठमोठीं असतात. कितीएक नवे कायदे व्हावयाचे असतात. त्यांवरून देशांतल्या व्यवहारांत फेरफार व्हावयाचे असतात, आणि त्यांत कितीएकांचें प्रत्यक्ष किंवा परंपरया हिताहित असतें. शिवाय, न्यायान्यायाचे विचार पुष्कळ असतात. त्यामुळें पुष्कळ लोक आपापल्या परी त्यांवर, अनुकूळ अथवा प्रतिकूळ कोटिक्रम करितात, आणि आपलें मत स्थापित करण्याचा आणि आपलेकडे बहुमत वळवून घेण्याचा प्रयत्न करितात. तें

वाग्युद्ध अत्यंत प्रेक्षणीय आणि श्रवणीय असतें. तेथें जय मिळविणें हें महत्कीर्तीस कारण होतें. ह्मणून मोठमोठे वक्ते तेथें आपली पराकाष्ठा करितात. आजपर्यंत इंग्लंडाच्या राजकारणांत जे पुरुष मोठ्या योग्यतेस चढून कीर्तिदेवीच्या मंदिरांत विभूषित झाले आहेत, ते बहुतेक पार्लमेंटांत प्रकाशमान होऊन मग वर चढलेले आहेत. त्यांतलेच ग्लाडस्टन हे एक होते. हे ह्या नव्या पार्लमेंटांत प्रविष्ट झाले त्या प्रसंगीं तींत सर राबर्ट पील आणि ऐर्लंडाचे कैवारी ओकोनेल हे दोन गृहस्थ अग्रगण्य होते. ह्यांपैकीं, ग्लाडस्टन हे सर राबर्ट पील ह्यांच्या धोरणानें वागूं लागले, आणि पुढें अगदीं त्यांचे शिष्य बनले. ते इतके कीं लोक त्यांस पीलमतवादी ह्मणूं लागले. त्या वेळीं पार्लमेंटाच्या विचारास पात्र असे जे विषय गाजत होते, त्यांत ऐर्लंडांतल्या लोकांची सामाजिक स्थिति, ऐर्लंडांत ठेविलेलें सरकारी धर्मखातें, इंग्लंडांतल्या दरिद्री लोकांची असंतुष्टी, आणि इंग्लंडाच्या वसाहतींतल्या गुलामांची स्थिति, हे विषय प्रमुख होते. ह्मणजे, ह्या विषयांवर मोठ्या कडाक्याचे वादविवाद पुष्कळ झाले. ह्या सगळ्यांत ग्लाडस्टन ह्यांनीं भाषणें केलीं. आणखी शिवाय दुसऱ्याही कितीएक विषयांवर ते बोलले. त्या भाषणांवरून त्यांचा फार मोठा लौकिक झाला, आणि हे उगाच कांहीं तरी बोलावयाचे नाहींत, तर, इतर लोकांच्या बोलण्यांत आलें नाहीं, आणि पार्लमेंटाच्या ऐकण्यांत तर आलें पाहिजे, असें जें त्यांना वाटतें, तेंच ते बोलतात, अशी लोकांची खातरी झाली. आणि तेणेंकरून, ते उभे राहिले ह्मणजे सगळे लोक त्यांचें भाषण लक्षपूर्वक ऐकूं लागले. त्यावरून पुष्कळांच्या मुखांतून असे उद्गार निघाले कीं, ग्लाडस्टन हे पार्लमेंटांत सभाजय करून केव्हां तरी सरकारचे मुख्य प्रधान खचीत होणार. तें भविष्य खरें झालें. एकदां नाहीं, दोनदां नाहीं, तीनदां नाहीं, ग्लाडस्टन हे महाराणी सरकारचे मुख्य प्रधान चार वेळां झाले. ते केव्हां केव्हां झाले, आणि इ० स० १८३५ पासून १८९४ पर्यंत दुसरे कोणकोणते मुख्य प्रधान कोणकोणत्या वेळीं झाले, त्यांचा तपशील येणेंप्रमाणें आहेः—

| | | |
|---|---|---|
| १८३५ पासून | १८४१ पर्यंत | लार्ड मेलबोर्न. |
| १८४१ पासून | १८४६ पर्यंत | सर राबर्ट पील. |
| १८४६ पासून | १८५२ पर्यंत | अर्ल रसेल. |
| १८५२ पासून | १८५५ पर्यंत | अर्ल आफ् अबर्डीन. |
| १८५५ पासून | १८५८ पर्यंत | लार्ड पामरस्टन. |
| १८५८ पासून | १८५९ पर्यंत | अर्ल आफ् डर्बी. |
| १८५९ पासून | १८६५ पर्यंत | लार्ड पामरस्टन. |
| १८६५ पासून | १८६६ पर्यंत | अर्ल रसेल. |
| १८६६ पासून | १८६८ पर्यंत | अर्ल आफ् डर्बी. |
| १८६८ त कांहीं दिवस | | लार्ड बीकान्सफील्ड. |
| १८६८ पासून | १८७४ पर्यंत | **मिस्तर ग्लाडस्टन.** |
| १८७४ पासून | १८८० पर्यंत | लार्ड बीकान्सफील्ड. |
| १८८० पासून | १८८५ पर्यंत | **मिस्तर ग्लाडस्टन.** |
| १८८५ पासून | १८८६ पर्यंत | लार्ड साल्सबरी. |
| १८८६ त कांहीं दिवस | | **मिस्तर ग्लाडस्टन.** |
| १८८६ पासून | १८९२ पर्यंत | लार्ड साल्सबरी. |
| १८९२ पासून | १८९४ पर्यंत | **मिस्तर ग्लाडस्टन.** |
| १८९४ पासून | पुढें | लार्ड साल्सबरी. |

ह्यावरून सहज लक्षांत येईल कीं, ग्लाडस्टन हे सव्वीस वर्षांत चारदां महाराणी सरकारचे मुख्य प्रधान झाले, आणि त्यांच्या एकंदर प्रधानगिरीची कारकीर्द सुमारें तेरा चौदा वर्षांची होती. येथें एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, इंग्लंडची मुख्य प्रधानकी ही, मागून किंवा वशिल्यानें किंवा दुसऱ्या उपायानें मिळत नसते; किंवा, ती पत-करण्यास आपण होऊन कोणी जात नाहींत. तर, एका पक्षाचा निरुपाय होऊन त्यानें दरबार सोडल्याबरोबर, दुसऱ्या पक्षाच्या पुढाऱ्यास सरकार आपण होऊन बोलावून आणितात, आणि त्यास मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें देतात—द्यावींच लागतात—दुसरा मार्गच नसतो. ह्मणजे, मुख्य प्रधानकी

ही आपण होऊन गळां पडते, असें ह्मटलें तरी चालेल. ह्यालाच भाग्य घर शोधीत येतें ह्मणायाचें. असें भाग्य चारदां ग्लाडस्टनांचें घर शोधीत आलें होतें. फार मोठी गोष्ट आहे.

ह्या ठिकाणीं इंग्लिश दरबारची एक विशेष वहिवाट सांगून ठेवण्यासारखी आहे. ती ही कीं, मुख्य प्रधान नेमल्यावर, ती जागा पतकरल्याची खूण ह्मणून नव्या मुख्य प्रधानांनीं सिंहासनारूढाच्या दर्शनास जाऊन, त्याच्या हाताचें चुंबन करावें. हा परिपाठ मूळ कशावरून पडला, ह्याचा इतिहास कोठें उपलब्ध नाहीं. परंतु, हा संस्कार फार भूषणावह मानितात. ग्लाडस्टन ह्यांस हा चार वेळ साधला.





# भाग चौथा.

## पार्लमेंटादिकांतलीं कांहीं कामें.

आवडीनें करी कर्मउपासना सर्वकाळ ध्यानारूढ मन.

**रामदास.**

संधि विग्रह यान आसन द्वैधीभाव आश्रय जाण
हेचि साही राजगुण विचक्षण बोलती.

**मुक्तेश्वर.**



संपत्ति संपादणें हें एके प्रकारीं सोपें असतें. पण तिचा उपयोग यथायोग्यपणें करून दाखविणें हें फार कठिण असतें. त्याप्रमाणें, एकादी मोठी जागा मिळविणें हें एके प्रकारीं सोपें असतें; पण, त्या जागेच्या संबंधाचीं कर्तव्यें चांगल्या प्रकारें बजाऊन धन्य ह्मणवून घेणें, हे परम कठिण असतें. तसा प्रसंग आतां ग्लाडस्टन ह्यांजवर होता. न्यूआर्क कसब्याच्या वतीनें सभासद निवडले जाऊन ते पार्लमेंटांत आले. त्यांस त्यांस फार श्रम पडले नाहींत, हें सगळें ठीक झालें. परंतु, आपल्या वक्तृत्वशक्तीनें आपलीं मतें स्थापित करणें, आणि आपण ज्या स्थानावर येऊन बसलों आहों त्या स्थानास योग्य आहों, असें लोकांच्या निदर्शनास आणणें, हें काम त्यांस करावयाचें होतें. तें त्यांनीं उत्तम प्रकारें केलें.

पार्लमेंटांत त्यांचा प्रवेश झाला, त्या वेळेस तेथें गुलामगिरीवर वाद चालला होता. पुष्कळांचें ह्मणणें असें होतें कीं, इंग्लंडाच्या वसाहतींत गुलामगिरी असणें हें इंग्लंडाच्या नीतिमत्तेस मोठें लांछन आहे, ह्याकरितां ती एकदम नाहींशी करावी, आणि राष्ट्राच्या लौकिकाची कालिमा काढून टाकावी. दुसऱ्यांचें ह्मणणें असें पडे कीं, गुलामगिरी ही जरी फार वाईट

आणि मनुष्यपणास लज्जास्पद आहे, तरी, ती आज इतकी वर्षें एकसारखी चालून, तीपासून राष्ट्राचें पुष्कळ हित झालें आहे, होत आहे, आणि होणार आहे, ह्याकरितां, ती एकदम बंद केली असतां लक्षावधि लोकांचें कोट्यवधि रुपयांचें नुकसान होईल, तें चांगलें नाहीं. आणखी धर्मशास्त्रांत ( बैबलांत ) हीस मुळींच कोठें आधार नाहीं असें नाहीं. ह्मणून, ती हळहळ अशा रीतीनें मोडावी कीं, त्यापासून गुलामांच्या धन्यांचें नुकसान होऊं नये. ग्लाडस्टन हे ह्या मताचे होते. आणखी असें झालें होतें कीं, वेस्टइंडिया-बेटांत डेमिरारा येथें त्यांच्या वडिलांचा पुष्कळ जमीनजुमला होता. त्यांत पुष्कळ गुलाम कामावर होते, आणि त्यांच्यांत आलीकडे मरामर झाल्याचा बोभाट झाला होता. त्यामुळें कांहीं लोकांस असें वाटे कीं, ग्लाडस्टन हे जें बोलत आहेत, तें आपल्या वडिलांच्या हिताकरितां बोलत आहेत. परंतु, तसा खरा प्रकार नव्हता. त्यांचें मतच तसें होतें; आणि शास्त्रांतल्या उल्लेखानें त्यांस विशेष जोर आला होता. ह्या विषयाच्या संबंधानें ग्लाडस्टन ह्यांनीं तीन चार वेळां भाषणें केलीं. त्यांपैकीं एके भाषणाच्या शेवटीं ते प्रतिपक्षास लक्षून ह्मणाले, "महाराज, जे आपण ह्या प्रकरणीं इतके उतावळे झालां आहां कीं, आपणांस दोन वर्षें देखील धीर धरवत नाहीं, त्या आपणांस मी असें विचारितों कीं, अमेरिकेंत कापूस उत्पन्न करण्याच्या संबंधानें ह्या वेळीं आपल्या माथ्यावर केवढी जबाबदारी आहे, ह्याचा आपण शोध तरी केला आहे काय? त्या देशांत आजमितीस सुमारें तीस लाख गुलाम आहेत. त्या देशाकडून गुलामगिरी कमी करण्याविषयीं किंवा काढून टाकण्याविषयीं आग्रह ऐकूं येत नाहीं. आणखी ही येथचीच ओरड मनस्वी आहे. आणखी ही संस्था खासगत आहे. ही अशीच युगांचीं युगें पिढ्यान-पिढ्या चालावयाची आहे ह्मणतात. शिवाय, ह्या गुलामगिरीपासून किती उपयोग आपण करून घेत आहों तो पाहा. इ० स० १८२८ ह्या वर्षांत, गुलाम नाहींत असे मजूर लावून कापूस जो उत्पन्न केला, तो अवघा ४५०००००० पौंड होता, आणि गुलामांकडून पिकविला तो ३१,८०००००० पौंड होता! आणखी, ही स्थिति केव्हां आहे, तर, थोडेंसें

भांडवल हिंदुस्थानांत घातलें असतां, आपणांस पाहिजे तितका सगळा कापूस तेथून उत्पन्न होण्यासारखा आहे, तेव्हां हा मोठा चमत्कार नव्हे काय ?" पण ह्या विषयाच्या संबंधानें त्यांचें मत लवकरच फिरलें. इ० स० १८४३ ह्या वर्षीं परकीय देशांतल्या साखरेवर जकात बसविण्याच्या संबंधाचा वाद पार्लमेंटांत निघाला, तेव्हां ते असें ह्मणाले कीं, ही जकात बसविल्यानें गुलामांच्या व्यापारास उत्तेजन दिल्यासारखें होणार आहे. ह्मणून ही जकात बसवूं नये.

पुढें इ० स० १८३४ ह्या वर्षीं लार्ड मेलबोर्न ह्यांनीं सरकाराच्या मुख्य प्रधानकीच्या कामाचा राजीनामा दिला. आणि त्यांच्या जागीं विलियम राजांनीं सर राबर्ट पील ह्यांस मुख्य प्रधान नेमिलें. त्यांची ग्लाडस्टन ह्यांजवर फार मर्जी होती, आणि ग्लाडस्टनांची भक्ति त्यांजवर फार होती. ह्मणून त्यांनीं ग्लाडस्टनांस जूनियर लार्ड आफ् ट्रेझरी ह्या कामावर नेमिलें. आणि ह्या वेळीं पार्लमेंटच्या सभासदांची पुनः निवड झाली, तींत ग्लाडस्टन ह्यांस न्यूआर्कानें, तिळमात्रही विरोध न दाखवितां, पुनः आपल्या वतीनें सभासद निवडिलें.

इतक्यांतच ग्लाडस्टन ह्यांच्या खऱ्या योग्यतेची किंमत इंग्लंडांतल्या चतुर पुरुषांच्या लक्ष्यांत येऊन चुकली. आणि ते त्याविषयीं आपसांत बोलूं लागले. एवढेंच केवळ नव्हे. तर, रेव्हरेंड साम्युअल विलबरफोर्स ह्या नामांकित गृहस्थानें त्यांस इ० स० १८३८ ह्या वर्षाच्या आरंभींच असें लिहिलें कीं, "आत्मश्लाघा तुह्मांस मुळींच आवडत नाहीं, हें मला ठाऊक आहे. परंतु, सध्या प्रतिनिधींच्या सभेमध्यें तुमच्याइतकें वजन दुसऱ्या कोणत्याही तरुण माणसाचें नाहीं आहे, आणि तुमचा लौकिक देशांत पसरत चालला आहे, हें तुह्मांस समजलेलें असणें ही कांहीं आत्मश्लाघा नव्हे आहे. तुह्मीं ह्यापुढें फार सावधगिरीनें वागावें; आणि आपणांस पुढें काय करावयाचें आहे, ह्याचें धोरण नेहमीं सांप्रतच्या कृत्यांत ठेवावें. तुमचा हात पोंचणार नाहीं, असें एकही उच्च पद ह्या देशांत नाहीं आहे. कदाचित् ह्या देशाचा सगळा कारभार तुह्मांस करण्याचा प्रसंग येईल.

आणि असें जर व्हावयाचें असलें, तर, त्या उच्च पदास पोंचण्याच्या आधींचें वर्तन त्या पदावर पोंचल्यावरच्या कृत्यांस अत्यंत उपयोगीं पडावयाचें आहे, हें उघड आहे. तुह्मी आपलीं खरीं खरीं मतें किंचित् एकीकडे ठेवून जर प्रसंगास आवश्यक असे कांहीं वेगळ्या प्रकारें वागलां, तर, तुह्मांस त्या मतांप्रमाणें पुनः वागतां यावयाचें नाहीं. पण, जर तुमचें वर्तन येथूनतेथपर्यंत एकसारखें असलें, तर तुह्मी आपलें व्रत सोडाल, असें कधीं कोणास वाटावयाचें नाहीं. हें मी तुह्मांस लिहीत आहें, त्यास एक फार वाईट कारण आहे. तें हें कीं, आमच्यांतले बहुतेक सगळे राजकारस्थानी पुरुष केवळ वारा लागेल तशी पाठ करून वागत आलेले आहेत. आणखी, अशा पुरुषांच्या सहवासांत ज्याचा काल जात आहे, त्यास, असें वागण्याचा मोहपाश तोडून टाकून, आपल्या शुद्ध मतांस धरून चालणें, हें अत्यंत कठिण होतें. तरी, तुह्मी अद्यापपर्यंत अशा प्रकारच्या कृत्यांस प्रवृत्त झालां नाहीं, अशी माझी खातरी आहे, ह्मणून तुह्मांस हें सुचविलें आहे.'' ह्या पत्रांत ग्लाडस्टन ह्यांस ज्या सूचना केल्या आहेत, त्या केवळ त्यांस उपयोगीं पडल्या, एवढेंच नव्हे; तर, सार्वजनिक कामांत ज्या इतर तरुण माणसांस पडावयाचें आहे, त्यांसही त्या फार लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. त्यांत मुख्य तत्त्व हें दिसतें कीं, आपण जगामध्यें अशा रीतीनें नेहमीं वर्तत असावें कीं, पुढें गेल्यावर आपणांस मागच्या वर्तनाविषयीं पश्चात्ताप होऊं नये. एवढेंच केवळ नव्हे, तर, मागचें वर्तन पुढच्या वर्तनास साह्यभूत, आणि उत्तेजनदायक व्हावें. असो.

इ० स० १८३९ ह्या वर्षीं राष्ट्रीय शिक्षणासंबंधानें एक ठराव पार्लमेंटांत त्या वेळच्या प्रधानमंडळानें आणिला होता. त्या संबंधानें ग्लाडस्टन हे तेथें बरेच बोलले. त्यांत मुख्य मुद्दा असा होता कीं, सरकारानें, प्रजाजनांच्या मुलांच्या शिक्षणाची तजवीज करणें हें त्याचें कर्तव्य आहे कीं नाहीं. त्याविषयीं उभय पक्षीं पुष्कळ भवति न भवति झाली. त्यांत कोणीं असें काढिलें कीं, यहुदी लोक हे ख्रिस्ती नाहींत, ते सगळें बैबल खरें मानीत नाहींत, त्यांच्या मुलांस शिक्षण देणें हें सरकारचें कर्तव्य होईल कीं नाहीं. त्याविषयीं

ग्लाडस्टनांचें ह्मणणें दोन प्रकारचें पडलें. ह्मणजे असें:—सरकार ह्मणजे प्रजेची इच्छा, असें जर घेऊन चालायाचें आहे, तर अशा मुलांच्या शिक्षणाची तजवीज करणें सरकारचें कर्तव्य आहे. कां कीं, यहुदी लोकांचा समावेश प्रजाशब्दांत होत आहे. पण, सरकार ह्मणजे कांहीं विचारयुक्त, बुद्धियुक्त, मनोदेवतायुक्त अशी संस्था आहे, आणि ह्मणून आपल्या मनोदेवतेच्या उपदेशाच्या विरुद्ध वागणें हें त्यांस अप्रशस्त वाटत असेल, तर, यहुदी लोकांच्या मुलांस शिक्षण देणें हें अकर्तव्य होईल. ह्मणजे ह्या विषयाचीं दोन्ही अंगें त्यांनीं आपल्या भाषणांत प्रकट केलीं. परंतु ह्या वेळापासून त्यांचें मन कान्सर्व्हेटिव पक्षास हळ हळ सोडून थोडें थोडें लिबरल पक्षाकडे येत चाललें होतें, असें ह्मणण्यास चिंता नाहीं. आणखी हें १८३९ वर्ष दुसऱ्या एका मोठ्या गोष्टीवरून ह्या चरित्रांत स्मरणीय झालें. ती गोष्ट ही कीं, ह्या वर्षीं ग्लाडस्टन ह्यांचे लग्न झालें. ह्यांची पत्नी ही सर रिचर्ड स्टिफन ग्लैनी, वेल्स प्रांतांतील फ्लिंटशायरांतल्या हार्डन किल्ल्याचे मालक, ह्यांची कन्या होती. ती, ग्लाडस्टनांच्या प्रमाणेंच मोठ्या संपत्तिमान् कुळांतली असून, सौंदर्य, भूतदया, धार्मिकता, परोपकार, विद्वत्ता, चतुरस्रता, व्यवहारदक्षता इत्यादि गुणांनीं संपन्न होती. हा जोडा फार उत्तम जमला. पत्नी चांगली मिळणें हें पूर्वपुण्याईचें फल आहे, असें आमच्यांत समजतात, तें कांहीं खोटें ह्मणवत नाहीं.

**पूर्वदत्तेषु या विद्या पूर्वदत्तेषु यद्धनम्**
**पूर्वदत्तेषु या भार्या अग्रे धावति धावति.**

असें ह्मटलें आहे, तें खरें आहे. ह्या ठिकाणीं हेंही सांगून ठेविलें पाहिजे कीं, ह्या बाईचे वडील निवर्तल्यावर, हार्डन येथील मोठ्या जमीनजुमल्याची मालकी ह्या बाईस मिळाली. ह्मणजे अर्थात् तो जमीनजुमला ग्लाडस्टनकुळाचा झाला. तेंच पुढें ग्लाडस्टन ह्यांचें नेहमीं राहाण्याचें ठिकाण झालें. असो.

ह्या सुमारास ग्लाडस्टन ह्यांस सगळे चांगले योग आले. पार्लमेंटांत प्रवेश झाला. तेथें वजन चांगलें पडलें. ग्लाडस्टन उभे राहिले ह्मणजे

पार्लमेंटाचे सभासद त्यांचें भाषण लक्षपूर्वक ऐकूं लागले. मोठमोठ्या विद्वान् मंडळींत ग्लाडस्टन ग्लाडस्टन असें नांव गाजूं लागलें. आणखी हे केव्हां तरी मोठ्या पदवीस चढणार असें दिसूं लागलें. तेव्हांच्या त्यांच्या स्थितीचें वर्णन एका ग्रंथकारानें प्रत्यक्ष पाहून केलें आहे. त्यांत ह्मटलें आहेः—" ग्लाडस्टन ह्यांचें स्वरूप आणि रीतीभाति हीं त्यांस अत्यंत साह्यकारी आहेत. ते मोठे खुबसुरत आहेत. ते बेताचे उंच असून त्यांची आंगलट फार चांगली सुबक आहे. त्यांची मुखचर्या फार मोहक असून, तीवरून स्पष्ट दिसतें कीं, ते मोठे बुद्धिमान् असावे. त्यांचे डोळे लखलखीत पाणीदार आहेत. ते उत्तम वक्ते आहेत. ते एकदां बोलूं लागले ह्मणजे त्यांच्या भाषणाचा जसा मोठा प्रवाह चालला आहेसा वाटतो. पार्लमेंटांत त्यांचें बोलणें लक्षपूर्वक ऐकतात, आणि सगळे लोक त्यांचा मोठा मान राखितात. ते मोठे कामासू आहेत. ते आपले सगळे उद्योग वेळच्या वेळेस आणि करावे तसे करितात." हें शब्दशः खरें होतें. त्यामुळें त्या अल्पवयांत देखील ते कांहीं मत्सरी माणसांच्या डोळ्यांत खुपूं लागले होते. डिझरायली ह्मणजे पुढें लार्ड बीकान्सफील्ड झाले, त्यांचेही ठायीं त्यांजविषयीं मत्सर उत्पन्न झाला होता. त्यांनीं ग्लाडस्टनांविषयीं त्याच सुमारास आपल्या बहिणीस लिहिलें, "ह्या तरुण माणसाच्या हातून पुढें कांहींएक



लार्ड बीकान्सफील्ड.

विशेष व्हावयाचें नाहीं!" पण पुढें राजकारणांत ह्यांनींच डिझरायलीचीं खूब हाडें घुसळलीं, हें सर्वांस ठाऊकच आहे.


लार्ड मेकाले.

इ० स० १८३४ ह्या वर्षी ईस्टइंडिया कंपनीची मागच्या सनदेची मुदत सरली, आणि तिला व्यापाराची नवी सनद मिळाली. तींत विशेष हें झालें कीं, इंग्लंड आणि इकडचे देश ह्यांच्या दरम्यानच्या व्यापारावरचे सगळे प्रतिबंध निघाले. आणि त्या व्यापारांत पडण्यास पाहिजे त्यास मोकळीक झाली. तसा अफूचा व्यापार हिंदुस्थान आणि चीन ह्यांच्यामध्यें चालला होता. हिंदुस्थानांत अफू पुष्कळ पिके. ती इकडचे इंग्लिश व्यापारी चिनांत नेऊन विकीत. त्यावरून चिनी लोकांस आणि सरकारास असें वाटे कीं, ह्या व्यापाराच्या योगानें आपल्या राष्ट्राचें एक मोठें व्यसन वाढत आहे, त्याच्या योगें पुष्कळ कुटुंबांस विपत्ति येत आहे, आणि पाप पुष्कळ होत आहे हें चांगलें नाहीं. ह्यावरून त्या व्यापाऱ्यांशीं त्यांचे कलह होऊं लागले, आणि ते व्यापारी ह्मणजे इंग्लिश सरकाराची प्रजा. तेव्हां अर्थात् त्यांचा कैवार इंग्लिश सरकारानें घेतला. हें प्रकरण विकोपास चढतां चढतां चीन आणि इंग्लिश सरकार ह्यांची लढाई जुंपली. तें प्रकरण पार्लमेंटांत निघून त्यावर कितीएक वक्त्यांचीं भाषणें झालीं. त्यांत मोठें आवेशाचें भाषण, प्रसिद्ध इतिहासकार परलोकवासी लार्ड मेकाले ह्यांचें झालें. त्यावर ग्लाडस्टन ह्यांनीं उत्तर, लगेच दुसरे दिवशीं ह्मणजे इ० स० १८४० च्या एप्रिल महिन्याच्या आठव्या तारखेस दिलें. त्यांत ते ह्मणाले,—"मेकालेसाहेब

काल ह्मणाले कीं कांतान येथें ब्रिटिश बावटा फडकणें हें मोठें भूषण आहे, आणि तो पाहून, आमच्या खलाशी लोकांच्या बाहूंस स्फुरण येणें, व ब्रिटिश बावट्याचा वरचष्मा सर्वत्र असतो असें त्यांस कळणें हें संतोषकारक आहे. हें खरें आहे. ह्याविषयीं काहीं वाद नाहीं. परंतु, त्यांत असें आहे कीं, हा आमचा बावटा जो आहे, तो न्याय, छलनिवारण,राष्ट्राधिकार आणि सत्कर्मसाहस ह्यांचा पाठिराखा—ह्यांचा खांब—असा आहे, असें त्यांच्या मनांत येऊन, त्यांचे बाहु स्फुरतात, आणि त्यांस आनंद होतो—तेव्हां मात्र तो यथार्थ मानिला पाहिजे. परंतु, सध्या तो झेंडा पापमूलक अशा व्यापाराच्या संरक्षणार्थ उभारला आहे. आणि अशा असत्कार्याकरितां जर तो कधीं उभारावयाचा नाहीं—आणि तो आतां मात्र उभारला आहे—तर, त्याजकडे पाहून आपल्या मनास वाईट वाटावें, आपण त्याजकडे न पाहातां आंगावर शाहारे आणून त्यावरून दृष्टि काढून दुसरीकडे वळवावी, हेंच योग्य आहे." ह्यावरून, इंग्लंडाचें पवित्रपण राखण्याविषयीं ग्लाडस्टन ह्यांस केवढें अगत्य वाटत होतें, आणि त्याविषयीं त्यांस केवढा अभिमान होता, हें व्यक्त होतें.

इ० स० १८३८ ह्या वर्षीं ग्लाडस्टन ह्यांनीं एक पुस्तक छापून प्रसिद्ध केलें. त्याचा विषय, "राजा आणि धर्म" हा होता. ह्यांत त्यांचा सिद्धांत हा आहे कीं, राजानें धर्मरक्षण केलें पाहिजे, नाहींतर त्यास संकट प्राप्त व्हावयाचें. हें पुस्तक इतकें लोकप्रिय झालें कीं, तीन वर्षांत ह्याच्या चार आवृत्ति खपून गेल्या. ह्या पुस्तकाकडे चांगल्या मोठ्या विद्वानांचें लक्ष लागलें. आणि त्यावरून लोकांत असें झालें कीं, ग्लाडस्टन हे कोणी अलौकिक बुद्धीचे पुरुष आहेत. ह्या त्यांच्या पुस्तकावर टीका करण्याकरितां प्रसिद्ध ग्रंथकार लार्ड मेकाले ह्यांनीं भला मोठा एक वेगळा निबंध लिहिला. ग्लाडस्टनांचें पुस्तक, त्यांचे मोठे आश्रयदाते, आणि तेव्हांच्या इंग्लंडच्या दरबारांतल्या प्रमुख मंडळींतले गृहस्थ सर रावर्ट पील ह्यांसही आवडलें नाहीं. आणि ते असें ह्मणाले ह्मणून सांगतात कीं, "ग्लाडस्टन हे पुढें दरबारच्या कामांत चांगले उदयास येण्यासारखे कर्ते आणि तेजस्वी असून,

त्यांनीं अशीं हीं पुस्तकें कशाला लिहीत बसावें?'' ह्मणजे, सांप्रत काळीं आमच्या देशांतल्या कितीएक चांगल्या सुशिक्षित लोकांत देखील, ग्रंथकर्तृत्व हें कांहींसें हलकें काम मानण्याचा कल आहे, तसा तेव्हां इंग्लंडांतल्या सुशिक्षित आणि मोठ्या लोकांतही बराच होता, असें दिसतें. मनुष्यस्वभावाची व्याप्ति सर्वत्र सारखी असावयाची.

इ० स० १८४१ ह्या वर्षीं लिबरल पक्षाची सरशी नाहींशी होऊन, नवीन निवड झाली. तींत कान्सर्व्हेटिव पक्षाची सरशी होऊन, पुनः सर राबर्ट पील मुख्य प्रधान झाले. त्यांनीं ग्लाडस्टनांस व्हाइस प्रेसिडेंट आफ् धी बोर्ड आफ ट्रेड आणि मास्टर आफ् थि मिंट ह्या कामांवर नेमिलें, आणि त्यांस प्रधानमंडळींत बुद्ध्या घेतलें. तें एवढ्याकरितां मुख्यत्वेंकरून होतें कीं, त्यांस राष्ट्रीय जमाखर्चाच्या पद्धतीची माहिती फार चांगली होती. त्या सुमारास जो जमाखर्चाचा खरडा सादर करावयाचा होता, त्यांत मोठी तूट येत होती. ती नवा कर बसवून भरून काढावयाची होती, आणि तें ह्मणणें पार्लमेंटाकडून मंजूर करून घ्यावयाचें होतें. त्या कामीं ग्लाडस्टन ह्यांचा फार उपयोग झाला. ही तूट भरून काढण्यास त्यांनीं प्राप्तीवरचा वगैरे कर वाढविला, आणि ह्या वाढीच्या शिलकेचा उपयोग करून, १२०० पैकीं ७५० जिन्नसांवरची जकात कमी केली व काढून टाकिली. त्या वेळीं जो वादविवाद झाला, त्यांत हे आपल्या योजनेच्या समर्थनार्थ एकंदर १२९ वेळां बोलले ह्मणतात! ह्यानंतर दोन वर्षांनीं ग्लाडस्टन हे बोर्ड आफ् ट्रेडचे प्रेसिडेंट झाले. ह्या हुद्यावर असतां, त्यांनीं इंग्लंडांतून निर्गत होत असलेल्या यंत्रादिकांवरची जकात बंद करून टाकिली. पुढें इ० स० १८४४ ह्या वर्षीं आगगाडीच्या संबंधानें एक कायदा त्यांनीं पास करून घेतला. त्याच्या योगानें तिकडील गरीब लोकांवर त्यांचे मोठे उपकार झाले आहेत. त्या कायद्यांत असें होतें कीं, तिसऱ्या वर्गाच्या उतारूंपासून दर मैलास एक पेन्साहून अधिक पैसा घेऊं नये; दर माणशीं ५६ पौंड ओझें फुकट न्यावें; तीन वर्षांच्या आंतल्या मुलाबद्दल भाडें घेऊं नये; आणि बारा वर्षांच्या आंतल्या वयाच्या माणसास निम्मे दर घ्यावा.

ह्यानंतर लिबरल प्रधानमंडळ झालें. तेव्हां लार्ड जान रसेल ह्यांनीं असा एक कायद्याचा मसुदा पार्लमेंटांत आणिला कीं, यहुदी लोकांस पार्लमेंटांचे सभासद होण्याची मोकळीक असावी. त्यावर ग्लाडस्टन ह्यांनीं ते कान्स-र्व्हेटिव पक्षाचे असतांही फार उत्तम भाषण केलें, आणि त्या मसुद्यास अनुमोदन दिलें. त्या वेळेस त्यांच्या मनाचा कल कसा बदलत चालला होता तें स्पष्ट दिसतें. त्या वादाच्या वेळीं कोणीं असें ह्मटलें कीं, यहुदी लोकांविषयीं ह्यांचीं मतें अशीं आहेत, असें जर आक्सफोर्डच्या युनिव्ह-र्सिटीस कळतें, तर त्यांनीं ह्यांची निवड केलीच नसती. त्यावर ग्लाडस्टन ह्यांनीं सणसणीत असें उत्तर दिलें कीं, "माझ्या मनाची जी खातरी आहे, तिच्या विरुद्ध मला निवडणाऱ्यांचें मत असतांनाही मी त्या मतास मान्य झालों, असें जर मीं केलें, तर मीं आपलें कर्तव्य केलें नाहीं, मी आपल्या कर्तव्यास चुकलों, असें मला वाटेल. ह्मणून तें मी कांहीं झालें तरी करणार नाहीं." ह्या मतास विरुद्ध होणाऱ्यांची कोटी एवढीच होती कीं, यहुदी लोक पार्लमेंटांत घेतल्यानें पार्लमेंट ख्रिस्ती नाहींसें होईल. त्यावर ग्लाडस्टन ह्यांनीं उत्तर दिलें कीं, सभासद निवडण्याविषयीं मत देण्यास यहुदी लोकांस आह्मीं मोकळीक दिली आहे, तरी, आह्मी ख्रिस्ती नाहीं असें कांहीं झालें नाहीं.

ह्या सुमारास पार्लमेंटामध्यें एका मोठ्या प्रकरणाचा वादविवाद होऊन, त्याचा निर्णय लोकसुखास उत्तम साधनभूत झाला. तें प्रकरण ह्मणजे इंग्लंडांत बाहेरच्या देशांतून जें धान्य यावयाचें, त्याजवर जबरदस्त जकात बसविलेली होती, ती काढून टाकण्याचा कायदा मंजूर झाला, हें होय. इ. स. १८१५ ह्या वर्षी असा कायदा झाला होता कीं, दर क्वार्टरास ऐशीं शिलिंग गव्हांचा भाव होईपर्यंत परदेशांतलें धान्य, बिनजकातीनें, ग्रेटब्रिटनांत येऊं द्यावयाचें नाहीं. हा कायदा मूळारंभीं, तिकडच्या शेतक-ऱ्यांच्या हितासाठीं ह्मणून केला होता. पण, तिकडची लोकसंख्या जसजशी वाढूं लागली, तसतसें गरीब लोकांस धान्य महाग मिळूं लागून ह्यापासून सगळ्या राष्ट्राचें मनस्वी नुकसान होऊं लागलें. तेव्हां, तो कायदा रद्द करण्याच्या उद्योगास आरंभ मि० व्हिलियर्स ह्या गृहस्थांनीं केला. हे


कावडेन.

पार्लमेंटाचे सभासद होते. ह्यांचे विचार, ऐर्लंडांत दुष्काळ पडल्यामुळें लोकांच्या मनांत विशेष भरले, आणि त्या उद्योगास काबडेन, ब्रैट ह्यांसारखी मंडळी साह्य करूं लागली. त्यांच्या वक्तृत्वानें लोकांची आणि सरकारचीही अशी खातरी झाली कीं, तो कायदा रद्द करणें हें प्रजाहितास आवश्यक आहे. त्याप्रमाणें त्या वेळच्या सगळ्या पुढारी लोकांनीं त्याविषयीं आपापल्यापरी खटपट केली. परंतु, या संधीस ग्लाडस्टन हे पार्लमेंटांत नव्हते. त्याचें कारण असें:—न्यूआर्कचे लोक ह्मणजे ज्यांच्या वतीनें ग्लाडस्टन हे पार्लमेंटांत निवडून आले होते, ते पक्के कान्सर्व्हेटिव पक्षाचे असल्यामुळें आणि ह्या वेळीं लिबरल पक्षाच्या दरबारांत ग्लाडस्टन ह्यांनीं


ब्रैट.

सरकारी जागा पतकरल्यामुळें त्यांस पार्लमेंटांतल्या जागेचा राजीनामा द्यावा लागला होता, आणि त्यांची निवड दुसऱ्या कोणत्या संस्थेकडून झाली नव्हती. तरी, तो कायदा रद्द होण्याच्या कामीं ग्लाडस्टन ह्यांची खटपट, पार्लमेंटाच्या बाहेर असूनही फार उपयोगीं पडली. चांगले माहीतगार ग्रंथकार ह्मणतात कीं, सर राबर्ट पील ह्यांची जी खातरी ह्या विषयाच्या संबंधानें झाली, तीस कारण ग्लाडस्टन ह्यांचे विचार होते. त्याप्रमाणेंच ह्यांनीं ह्या सुमारास "आलीकडचे व्यापारसंबंधीं कायदे" ह्मणून एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध केलें. त्याच्या योगानें ह्या विषयाकडे पुष्कळ लोकांचीं मनें अगदीं ह्यांच्या सारखीं वळलीं. ह्मणजे, प्रत्यक्ष नव्हते तरी अप्रत्यक्ष रीतीनें हा कायदा रद्द होण्यास ग्लाडस्टनांचे श्रम साधनभूत झालेले आहेत, हें मुख्यत्वेंकरून सांगावयाचें आहे. हा कायदा इ. स. १८४६ च्या जून महिन्यांत पार्लमेंटानें रद्द केला.

ग्लाडस्टन सुमारें पांचसहा वर्षेंपर्यंत इंग्लंडच्या दरबारचे नाना फडणीस ह्मणजे जमाखर्चखात्याचे प्रधान झाले होते. त्यास आरंभ इ. स. १८५३ ह्या वर्षीं झाला. ह्या वर्षाच्या जमाखर्चाचा खर्डा त्यांनीं अतिशयित मेहेनत घेऊन तयार केला. कां कीं, त्यांत पुष्कळ नव्या गोष्टी घालण्याच्या होत्या, त्यांतल्या जुन्या काढून टाकावयाच्या होत्या, त्या सगळ्या कामन्ससभेच्या मनांत भरवायाच्या होत्या, त्या त्यांकडून मंजूर करून घ्यायच्या होत्या, आणि त्यांवरून एकंदर सगळ्या देशाचें मोठें हित साधावयाचें होतें. त्या वेळच्या त्यांच्या उद्योगाविषयीं त्यांच्या चरित्रांत असें लिहिलें आहे कीं, त्यांस नानाप्रकारच्या व्यापारांच्या मंडळ्या आपापलें मत कळविण्यास इतक्या येत असत कीं, ग्लाडस्टन ह्यांस दररोज पंधरा पंधरा सोळा सोळा सत्रा सत्रा तास एकसारखें काम करावें लागत असे, आणि जेवायाला जायालाही फुरसत होत नसे. आणि तितक्या आग्रहाच्या फराळास त्यांस एखादे वेळीं रात्रीं कोठें जावें लागलें, ह्मणजे त्या रात्रीं त्यांस निजायास चार वाजत. अशा कामाच्या ओझ्यानें लादलेले असतां देखील, ते आपल्या दुसऱ्या मुलास दररोज तासतास ल्याटिन भाषा स्वतः शिकवीत असत. त्यास कधीं एक दिवसही खंड पडूं दिली नाहीं.

ह्या जमाखर्चाचा खर्डा ग्लाडस्टन साहेबांनीं एप्रिल महिन्याच्या १८ व्या तारखेस कामन्स सभेस सादर केला. त्या वेळीं त्यांचें भाषण पांच तासपर्यंत अगदीं अस्खलित झालें. तें अगदीं अप्रतिम झालें. त्यांत सगळें आंकड्यांशीं काम होतें. त्यामुळें तें तितकें सरस होण्यासारखें नव्हतें. तरी, त्यांनीं सगळी सभा पांच तासपर्यंत अगदीं चित्रासारखी तटस्थ करून ठेविली होती. असें भाषण पूर्वींच्या शेंपन्नास वर्षांत कधीं कोणाचें झालें नव्हतें, असें जुन्या जुन्या लोकांच्या बोलण्यांत आलें. एका सभासदानें तर असें ह्मटलें आहे कीं, आपलें पांच तास निघून गेले, हें घड्याळाकडे पाहिलें तेव्हां लक्षांत येऊन असें वाटलें कीं, इतका वेळ इतक्या लवकर गेला तरी कसा! त्या खर्ड्यामध्यें मागच्या अनेक गोष्टी सांगितल्या होत्या, आणि पुढें काय करावयाचें हें सुचविलें होतें. त्यांत इतकें काय होतें, हें तपशीलवार सांगत बसणें हें कंटाळवाणें होण्याचें भय आहे. आणि त्यास अवकाशही नाहीं. ह्मणून, त्याचा मुख्य ओघ काय होता, तो सांगतों ह्मणजे झालें. देशांतल्या पुष्कळ लोकांस नित्याच्या उपयोगाच्या वस्तु स्वस्त्या आणि सहज मिळून त्यांस अधिक सुख व्हावें. त्यांच्यावरचें करांचें ओझें पन्नास लक्ष पौंडांचें कमी व्हावें. साधारण कामधंदा, गाड्याघोडीं, आणि लोकांच्या उपयोगाचे साधारण पदार्थ ह्यांवरचे कर कमी करावे. वर्तमानपत्रांतल्या जाहिरातींवरचा कर मुळींच काढून टाकावा. चहावर २ शिलिंग १ पेन्स कर होता, तो १ शिलिंग करावा. साबणावरचा कर कमी करावा. पेनी पावती टिकिटें चालू करावीं. १२३ पदार्थांवरची जकात मुळींच उठवावी, व १३३ वरची कमी करावी. आणखी ह्याच्या योगानें उत्पन्नास जी तूट येईल, ती, मृत्युपत्रांत स्थावरावरचा हक्क दिला असेल त्यावर, मद्यावर, आणि ज्यांचें उत्पन्न शंभरांच्यावर आहे, अशांवर जकात आणि कर बसवून भरून काढावी. अशी योजना त्यांत केलेली होती. आणि तिची मोडणी अशा रीतीनें केली होती कीं, ती ऐकून सगळे लोक अगदीं थक्क होऊन गेले. त्यांतही लोकांवर इतकी छाप बसण्यास एक विशेष कारण हें होतें

कीं, त्यांत सगळा लोकहिताचा कळवळा भरला होता. लोकांस प्राप्तीवरच्या कराचा अतिशयित कंटाळा आला होता. त्या संबंधानें ते शेवटीं ह्मणाले "हे आतां सांगितलेले कर जर आपण मंजूर कराल, तर इ० स० १८६० ह्या वर्षीं प्राप्तीवरचा कर अजीबात नाहींसा होईल. मीं आपणांस किती वेळ तरी बसविलें हें घड्याळावरून पाहून मला फार संकोच वाटतो. ह्याबद्दल मला क्षमा करावी. आपल्या राष्ट्राची प्रतिष्ठा राहावी, पार्लमेंट सभेचे विचार मान्य व्हावे, देशाचें उत्तम हित साधावें, कोणाविषयीं प्रतारणा होऊं नये, सर्वांवर भार, ज्याच्या त्याच्या मगदुराप्रमाणें, सारखा पडावा, हा काय तो आमचा मुख्य हेतु आहे. आणि आह्मांला अशी आशा आहे कीं, हें सगळें मान्य होऊन चांगल्या प्रकारें सिद्धीस गेलें, तर त्याच्या योगानें केवळ देशाचें हित होईल, एवढेंच नव्हे, तर देशाला द्रव्यलाभ होईल; आणखी ज्या राज्याच्या छायेखालीं आणि ज्या संस्थांच्या आधारानें आपण सुखानें कालक्रमणा करीत आहों, त्या राज्याचे आणि त्या संस्थांचे पाये खंबीर होऊन आणि त्यांचें ऐक्य होऊन त्यांची अभिवृद्धि होईल." त्याप्रमाणेंच, ते मध्येंच एकदां ह्मणाले कीं, "इंग्लंडांतल्या कामकरी लोकांच्या डोक्यावरचें प्रत्यक्ष करांचें ओझें कमी करून, त्यांस सुखानें राहायास सांपडावें, असें करणें हें न्याय्य आहे, तें करण्याचा हा सगळा प्रयत्न आहे."

ग्लाडस्टन साहेबांचें हें भाषण इंग्लडांतल्या सगळ्या लहानमोठ्या माणसांस अतिशयित मानवलें, आणि त्यावरून त्यांची मोठी वाहवा झाली. लार्ड अबर्डीन ह्यांनीं प्रिन्स आलबर्ट ह्यांस ह्याविषयीं लिहिलें:—"वक्त्यांचें सामर्थ्य पाहून सगळी सभा चकित झाली. चोहींकडे लोक असें बोलतात कीं, अशा प्रकारचें वक्तृत्व आलीकडे कितीएक वर्षांत झालेलें नाहीं." लार्ड जान रसेल ह्यांनीं महाराणी व्हिक्टोरियांस सांगितलें कीं, इतकें उत्तम झाषण आजपर्यंत कामन्स सभेंत कधीं झालेंच नाहीं. लार्ड अबर्डीन ह्यांस विंडसर राजवाड्यांतून दुसऱ्याच दिवशीं महाराणी व्हिक्टोरिया ह्यांनीं ह्याविषयीं लिहिलें कीं, "गेल्या रात्रीं ग्लाडस्टन साहेबांनीं पार्लमेंटांत जो सभाजय केला, त्याचें अभिनंदन संतोषपूर्वक केल्यावांचून

आमच्यानें राहवत नाहीं. त्यांवर आमची फार आशा आहे. हें एक मोठें समाधान आहे." प्रिन्स आलबर्ट ह्यांनीं दुसरेच दिवशीं स्वतः ग्लाडस्टन साहेबांस लिहिलें, "आपण काल रात्रीं जो अप्रतिम सभाजय केला, त्याविषयीं आपलें अभिनंदन केल्यावांचून माझ्यानें राहवत नाहीं. आपलें भाषण मी आतांच लक्षपूर्वक साद्यंत वाचिलें. तें ऐकायाला मी जर सभेंत असतों, तर तेव्हांचे तेव्हां मीं आपला मोठा जयजयकार केला असता. आपला जमाबंदीचा खर्डा सर्वांस फार पसंत पडला आहे, असें माझ्या कानीं आलें आहे. लार्ड जान रसेल ह्यांनीं त्या प्रसंगाची जी हकीकत महाराणीसाहेबांस लिहून पाठविली आहे, ती ह्या पत्रासोबत आपल्या अवलोकनास पाठविली आहे. ही वाचून आपणांस आनंद होईल, अशी माझी खातरी आहे. कशावरून म्हणाल, तर सरकारी कामदारांस त्यांच्या वरच्या अधिकाऱ्यांच्या तोंडच्या स्तुतीइतकें दुसरें कांहींच गोड लागत नसतें, हें मला ठाऊक आहे." स्वतः मुख्य प्रधानांनीं लाडस्टनांस लिहिलें कीं, "गेले रात्रीं जो अप्रतिम सभाजय झाला, त्याबद्दल सर्व लोक माझें अभिनंदन करीत आहेत. अशा वेळीं मी आधीं तुमचें अभिनंदन करावें, हें मला अत्यंत आवश्यक वाटतें. स्वतः मजपेक्षां तुमची मला किती धन्यता वाटत आहे, हें तुह्मांला सहज कळण्यासारखें आहे. आतां दरबार जर असेंच पुष्कळ दिवस आमच्या वतीचेंच राहिलें, तर, त्याचें सगळें श्रेय तुह्मांस आहे." असें आणखी पुष्कळ त्यांच्या चरित्रांत सांगितलें आहे. तें येथें घेण्यास अवकाश नाहीं. तरी, हें सांगितलें आहे एवढ्यावरून हें खचीत आहे कीं, ग्लाडस्टनांच्या ह्या एका भाषणानें इंग्लिश राज्यांतल्या प्रजाजनांचें पुष्कळ हित करून, ह्या गृहस्थांचें प्रस्थ सगळ्या देशांत एवढें वाढविलें कीं, सगळ्या पार्लमेंटांत त्यांच्या एवढा ज्ञाता, वक्ता, आणि जनहितकर्ता दुसरा पुरुष नाहीं, असें सर्वतोमुखीं झालें. हा लाभ अप्रतिम आहे.

ग्लाडस्टन ह्यांचा हा १८५३ चा जमाखर्चाचा खरडा सादर झाल्यावर तो पसंत होण्याच्या आधीं देशांतरावर एक मोठें प्रकरण उभें राहिलें.

तें असेंः–रशिया आणि तुर्कस्थान ह्यांचें वैमनस्य येऊन तुर्कस्थानावर रशियाचें सैन्य प्रुथनदीच्या पार जाऊन, त्यानें मोल्डेव्हिआ आणि वालाचिया हीं ठिकाणें घेतलीं. तिकडे तुर्कस्थानच्या सुलतानांनीं लढाईचा झेंडा उभारून आपलें सैन्य रशियाच्या सैन्याशीं लढायास पाठविलें. ह्या गोष्टींच्या संबंधानें ग्लाडस्टन ह्यांनीं मांचेस्टर येथें मोठें कडाक्याचें भाषण केलें. त्यांत त्यांनीं असें सांगितलें कीं, ह्या सगळ्या प्रकरणांत रशियाची आगळीक आहे, आणि त्याच्या मनांत बाकीच्या सगळ्या राष्ट्रांवर आपलें श्रेष्ठत्व स्थापावयाचें आहे, हें ठीक नाहीं. ह्मणून त्यांनीं इंग्लिश सैन्य तुर्कस्थानच्या सुलतानांच्या साह्यास पाठविलें. त्यास फ्रेंच सरकाराचेंही साह्य आलें. अशा प्रकारें तुर्कस्थान, इंग्लंड आणि फ्रान्स हीं एकीकडे आणि रशिया एकीकडे, असे दोन पक्ष जोरावर येऊन त्यांचा संग्राम काळ्या समुद्रांत चालू झाला. ह्या संग्रामाच्या खर्चास रकम देण्याचें काम ग्लाडस्टनांवर आलें. तेव्हां, जमाखर्चाच्या खर्ड्यांत प्रदर्शित केलेल्या सगळ्या सुधारणा त्या वेळेस एकीकडे ठेवाव्या लागल्या, आणि नवें कर्ज काढून ती लढाई चालवावी लागली. तें कर्ज ह्मणजे ३४०००००० पौंड झालें. तेव्हां, त्यांच्या प्रतिपक्ष्यांस त्यांजवर पुष्कळ टीका करण्यास यथेच्छ जागा मिळाली. लढाईवर सैन्य रवाना झालें, त्यांत अव्यवस्था फार झाली आहे, तिची चौकशी करायास कमिशन नेमिलें पाहिजे, अशी सूचना पार्लमेंटामध्यें मिस्तर रोबक ह्यांनीं आणिली. ती सगळीच कांहीं निराधार नव्हती. तिच्या पायीं लार्ड जान रसेल ह्यांनीं आपल्या कामाचा राजीनामा दिला. तेव्हां त्या सगळ्या कृत्यास निर्दोष ठरविण्याचा सगळा भार ग्लाडस्टन ह्यांजवर पडला. त्याविषयीं त्यांनीं आपली पराकाष्ठा केली. तरी, लोकमत फिरलें तें फिरलेंच. पार्लमेंटांत रोबक ह्यांस अनुकूळ मतें ३०५ मिळालीं, आणि ग्लाडस्टनांस अनुकूळ अशीं १४८ मिळालीं. तेव्हां सरकारचा पक्ष कमी पडला. तरी, कांहीं लोक ग्लाडस्टनांकडचे झाले, आणि कांहीं रोबक ह्यांकडचे झाले. त्यांत नामदार प्रिन्स आलबर्ट ह्यांनीं ब्यारन स्टाकमर ह्यांस एका पत्रांत असें लिहिलें कीं, "ग्लाडस्टन ह्यांचे

विचार मर्दपणाचे, राजकारणास शोभण्यासारखे आणि सरळ प्रामाणिकपणाचे आहेत." पुढें लार्ड पामरस्टन हे मुख्य प्रधान झाले. त्यांच्या ह्मणण्यास मान्य होऊन ग्लाडस्टन हे चान्सलर आफ् एक्सचेकरचे कामावर राहिले. त्यांतला हेतु एवढाच होता कीं, आपल्या भिडेस्तव रोबक ह्यांच्या सूचनेकडे फारसें कोणीं लक्ष पुरवूं नये. पण तें कांहीं साधलें नाहीं.

हा संग्राम तिकडे चालला. सिबास्टोपल येथच्या लढाईंत रशियाचा पराभव झाला, आणि त्याच्या प्रतिपक्ष्यांचा जय झाला. परंतु, त्या सुमारास रशियाचे नवे झारमहाराज गादीवर आले होते. त्यांनीं तो संग्राम, स्वतःची इच्छा नसतां, केवळ वडिलांनीं आरंभलेला ह्मणून, पुढें चालविला होता, आणि तो करवेल तितका लवकर बंद करावा, असें त्यांच्या मनांत होतें. त्याप्रमाणेंच फ्रान्साच्या बादशाहास त्याचा कंटाळा आला होता. इतक्यांत, सर्वत्र शांतता राखण्याच्या स्तुत्य उद्देशानें आस्त्रियाचे बादशाहा मध्यें पडून, त्यांनीं, सगळ्यांच्या विचारानें एक शांततेचा तह ठरावा, असा घाट घातला. तो तह, मोठमोठ्या राष्ट्रांचे वकील एकत्र जमून, पारिस येथें, इ० स० १८५६ च्या फेब्रुआरीच्या २६ व्या तारखेपासून मार्चाच्या ३० व्या तारखेपर्यंत सभा भरून, ठरला. त्यास इंग्लंड, फ्रान्स, आस्ट्रिया, प्रुशिया, तुर्कस्थान, आणि सार्डिनिया ह्या राष्ट्रांचे वकील आले होते. त्यांत ठरलें कीं, कार्स हें ठिकाण तुर्कस्थानास परत द्यावें. सिबास्टोपल आणि दुसरीं ठाणीं प्रतिपक्ष्यांनीं घेतलीं असतील, तीं रशियास परत द्यावीं. युरोपांतल्या इतर राष्ट्रांप्रमाणें तुर्कस्थानास सार्वत्रिक व्यवहाराचे अधिकार असावे, आणि तुर्कस्थानच्या स्वातंत्र्यरक्षणाविषयीं इतर राष्ट्रांनीं दक्षता ठेवावी. हें पाहून तुर्कस्थानच्या सुलतानांस फार आनंद झाला. आणि त्यांनीं असें फर्मान प्रसिद्ध केलें कीं, आह्मी आपल्या ताब्यांतल्या ख्रिस्ती लोकांचें संरक्षण चांगल्या प्रकारें करून, त्यांची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न करूं. हा सगळा प्रकार ग्लाडस्टन ह्यांस अत्यंत संतोषप्रद झाला, आणि त्यांनीं त्याची फार वाहवा केली. कां कीं, त्यांस जें काय पाहिजे होतें, तें ह्यांत बहुतेक सगळें साधलें होतें.

ह्यानंतर इंग्लंडच्या दरबारांत मोठ्या महत्वाचें असें डान पासिफिको ह्याचें प्रकरण उद्भवलें होतें, आणि त्यावरून सगळ्या युरोपांत मोठें रण माजतें कीं काय, असें भय पडलें होतें. त्याच्या परिमार्जनास ग्लाडस्टन ह्यांचें वक्तृत्व फार उपयोगीं पडलें. त्याचा प्रकार असा. डान पासिफिको ह्या नांवाचा कोणी एक यहुदी गृहस्थ अथेन्स येथें जाऊन राहिला होता. तो जिब्राल्टर येथें जन्मलेला आणि मूळचा राहाणारा असल्याच्या योगानें तो आपणास महाराणी व्हिक्टोरिया ह्यांच्या प्रजेंतला एकजण ह्मणवीत असे. तो अथेन्स येथें स्वस्थ—कोणाच्या वाटेस न जातां राहत असे. परंतु तेथल्या लोकांत अशी एक चाल आहे कीं, ईस्टर सणाच्या दिवशीं यहुदी लोकांची कुचाळी करावयाची. तिची बंदी सरकारानें केली होती. तरी तीस न जुमानितां इ. स. १८४७ च्या ईस्टर सणाच्या दिवशीं, उगाच्या उगाच, तेथल्या लोकांनीं डान पासिफिको ह्याच्या घरावर हल्ला करून त्याच्या सामानाची नासधूस केली. तेव्हां डान पासिफिको ह्यानें ग्रीक सरकारांत अशी फिर्याद केली कीं, माझी नुकसानी तीन लाख वीसहजार रुपयांची झाली आहे, ती सरकारानें भरून द्यावी. ह्या फिर्यादीकडे ग्रीक सरकारानें लक्ष पुरविलें नाहीं. त्याप्रमाणेंच फिनले ह्या नांवाचा कोणी इंग्लिश गृहस्थ अथेन्स येथें घरदार करून राहिला होता, त्याची कांहीं जमीन तेथल्या सरकारानें सार्वजनिक कामाकडे लावण्यास घेतली होती, आणि तिची किंमत त्याच्या मागण्याप्रमाणें त्यास दिली नव्हती, ही दुसरी एक तक्रार होती. तिकडेही तें सरकार कोणीडोळा करीत होतें. ह्या खासगत आणि अगदीं क्षुल्लक बाबी होत्या. राजकारणाशीं ह्यांचा कांहीं संबंध नव्हता. तरी, त्या वेळचे परकीय राज्यासंबंधाचे इंग्लंडाचे प्रधान लार्ड पामरस्टन ह्यांनीं त्यांचा मोठा बाऊ केला. त्यांच्या मनांत असें आलें कीं, ग्रीक सरकारच्या दरबारांत फ्रेंचांचा जो वकील आहे, त्यानें बुद्ध्या इंग्लंडाचा अपमान करण्याकरितां ही दांडगाई ग्रीक सरकाराकडून करविली आहे. ह्मणून, त्यांनीं मुंगीचा हत्ती करून, एकदम, इंग्लिश आरमार पायरियस समुद्रांत रवाना केलें, आणि तेथें ग्रीक सरकाराचीं आणि ग्रीक व्यापाऱ्यांचीं

जीं जाहाजें होतीं, तीं पकडून ठेविलीं. तेव्हां ग्रीसनें फ्रान्स आणि रशिया ह्या राष्ट्रांची प्रार्थना करून त्यांचा धांवा केला. कां कीं, ग्रीसच्या स्वातंत्र्याचें संरक्षण करण्याविषयीं मागें जो एक तह झाला होता, त्यांत इंग्लंडाबरोबर तीं दोन राष्ट्रें होतीं. त्या राष्ट्रांस लार्ड पामरस्टन ह्यांनीं उडवाउडवीचेंच उत्तर दिलें. तेव्हां सगळ्या युरोपांत मोठें रण माजण्याचा प्रसंग आला. त्याविषयीं ग्लाडस्टन ह्यांस फार वाईट वाटलें, आणि त्यांनीं त्या संबंधानें पार्लमेंटांत मोठ्या आवेशानें भाषण केलें. तें भाषण त्यांच्या उत्तम भाषणांतलें एक गणलेलें आहे. त्यांत ते आपल्या स्वतःच्या राष्ट्राविषयीं ह्मणजे इंग्लंडाविषयीं ह्मणाले, "लार्ड पामरस्टन ह्यांस असें वाटतें कीं, प्राचीन काळीं रोमन मनुष्य जगांत जसा मोठा—सर्वश्रेष्ठ—असे, तसा, आपल्या राजवटींतला प्रत्येक इंग्लिश मनुष्य जगामध्यें सर्वांत मोठा असला पाहिजे. परंतु, तेव्हांचा रोमन मनुष्य ह्मणजे कसा होता कळलें काय ? तो, सगळ्यांत श्रेष्ठ झालेल्या—सगळ्यांस मागें टाकलेल्या—अशा जातींतला होता. तो परदेश काबीज करणाऱ्या पराक्रमी जातींतला, ह्मणजे अशा राष्ट्रांतला होता कीं त्या राष्ट्रानें बाकीच्या सगळ्या राष्ट्रांस थरथर कांपायास लावून आपल्या अर्ध्या वचनांत ठेविलें होतें. त्या लोकांकरितां कायदे तेव्हां अगदीं वेगळ्या प्रकारचे होते. आणि ज्या सवलती इतर राष्ट्रांस मुळींच नव्हत्या, त्या सवलतींचा उपभोग ते करीत होते. त्यांसारखे सध्याच्या स्थितींत आपण इतर राष्ट्रांवर आहों—इतर राष्ट्रांपेक्षां श्रेष्ठ आहों—असें लार्ड पामरस्टन ह्यांस वाटतें काय ? त्यांच्या बोलण्याच्या झोंकावरून असें दिसतें कीं, इतर राष्ट्रांतलें अज्ञान घालविण्याचा, दुर्गुण नाहींतसे करण्याचा, आणि त्यांस सन्मार्गवर्ती करण्याचा सगळा गुरुपणा जसा काय आपणांकडे आला आहे ! आणि जे कोणी आपलें न ऐकतील त्यांस शासन करण्याचा अधिकार आपलेकडे आहे ! परंतु, महाराज, ह्या राज्यरीतीच्या योगानें, आपणांवरचा एक मोठा—फार मोठा—आरोप दृढ होत आहे. तो आरोप आपल्या राष्ट्रांतल्या प्रत्येक माणसावर आहे. तो आरोप हाच कीं, इंग्लिश गृहस्थ कोठेंही जावो, तो बहुधा सरळ, प्रामाणिक, उदार, शूर, मोकळ्या मनाचा, आणि

सत्यशील असा असावयाचाच, त्यांत अंतर पडावयाचें नाहीं; परंतु, परकीय लोकांस ज्याची मोठी किळस येते, असा एक दोष त्याच्या आंगांत आढळतो. तो हा कीं, काय ते मोठे आपण, आणि आपणांपुढें बाकी सगळीं माणसें कसपटें, असें त्याला वाटतें, आणखी, तो कोणत्याही प्रकारें इतर लोकांची परवा करीत नाहीं, असें ते ह्मणतात. आतां मी बोललों आहें, हें घोंगडें काठीवर घालून कांहीं लोक नाचवितील, आणि ह्यांत कांहीं देशाभिमान नाहीं, असें कोणी दाखवितील, ते दाखवोत. पण, पार्लमेंटानें—कामन्ससभेनें—ह्या भ्रमाविषयीं सावध राहावें. प्रसंगीं तुह्मांला भूल पडली तर तेवढ्यानें भागावयाचें नाहीं. तुमच्यावर लार्डोची सभा आहे. त्यांच्यावर इंग्लंडचे लोक आहेत. त्यांच्याही वर विद्याचारसंपन्न राष्ट्रांची नीतिमत्ता आहे. इतकें असून इंग्लंड जर आपला आग्रह धरून बसेल, तर, प्रसंगीं त्यास कोणी साह्य होणार नाहीं, आणि त्याला एकटें राहावें लागेल. पण, महाराज, असें होऊं नये. असें होणें चांगलें नाहीं. राष्ट्र सशक्त असो, कीं अशक्त असो, आपण सगळीं सारखीं आहोंत, असें मोकळ्या मनानें मानूं, सगळीं भावंडें आहों असें समजूं, आणि परस्परांवर अवलंबून असणें हें आपलें पवित्रपण आपण राखूं. आपण आपल्या देशबांधवांचे हक्क यथास्थित राखण्याविषयीं परराष्ट्रांस जर आग्रह करीत आहों, तर, त्या राष्ट्रांतल्या माणसांचे हक्क आपण राखले पाहिजेत. तीं राष्ट्रें लहान किंवा अशक्त आहेत, एवढ्यावरून त्यांची उपेक्षा करितां कामास नये. इतर राष्ट्रांनीं आमच्या राष्ट्राच्या कारभारांत उगाच ढवळाढवळ करणें हें जसें आपणांस बिलकूल आवडावयाचें नाहीं, तसें आपण त्यांच्या कारभारांत हात घालणें हें त्यांस आवडणार नाहीं.'' ह्यावरून ग्लाडस्टन ह्यांचें मन कसें होतें, तें स्पष्ट कळण्यासारखें आहे. हें बोलणें पुष्कळ मंडळीस रुचलें नाहीं. त्यांनीं त्यावर पुष्कळ टीका केली, आणि ग्लाडस्टन ह्यांस स्वदेशाभिमान नाहीं असें गर्भित केलें. त्यांस त्यांनीं मुळींच जुमानिलें नाहीं. असो. हें ग्रीसचें प्रकरण पुढें इतर राष्ट्रांच्या मध्यस्थीनें तोडीवर आलें, आणि कांहीं रकम त्या गृहस्थांस ग्रीक सरकाराकडून देववून तें प्रकरण मिटविलें. ह्यांत न्याय

आणि सत्य ह्यांचा तर मुख्य पक्षपात होताच. आणखी त्यांतल्या त्यांत, टाळवेल तितका रक्तपात टाळावयाचा, हा एक ग्लाडस्टन ह्यांचा मोठा रोंख होता. ते बिस्मार्कांच्या संबंधानें बोलतांना एकदां ह्मणाले कीं, "रक्त-पातावर मिळविलेली कीर्ति मला नको."

आयोनियन हीं सात बेटें ग्रीस देशाच्या पश्चिमेस आहेत. तीं इ० स० १८१५ पासून इंग्लिश सरकारच्या रक्षणाखालीं होतीं. ह्मणजे तेथल्या प्रजासत्ताक राज्यांत इंग्लंडाचा एक अधिकारी लार्ड हाय् कमिशनर ह्या हुद्याचा असे. त्याच्या हाताखालीं कांहीं सैन्य असे. तो, त्या राज्याचा कारभार तेथली प्रतिनिधि मंडळी चालवीत असे, त्यावर नुसती नजर ठेवीत असे. पण तें त्यांतल्या लोकांस आवडत नव्हतें. त्यामुळें तेथें नेहमीं अस्वस्थता असे. त्यांच्या अडचणी ऐकून घेण्यास आणि त्यांस इंग्लिश सरकारच्या आश्रयाचे लाभ समजून देण्यास लार्ड डर्बी ह्यांनीं ग्लाडस्टन ह्यांस इ. स. १८५८ च्या नोवेंबर महिन्यांत हाय् कमिशनर एक्स्ट्रार्डिनरी हा अधिकार देऊन तिकडे पाठविलें. त्यांनीं त्या कामांत लोकांचीं मनें इंग्लंडाकडे वळविण्याविषयीं आपली पराकाष्ठा केली. परंतु आपलें आधिपत्य ग्रीस देशाकडे असावें, असें जें त्या लोकांच्या मनांत एकदां भरलें होतें, तें कांहीं केल्या निघेना. शिवाय त्यांत एक असा थोडासा चमत्कार झाला. होमर ह्या ग्रीक कवीचें काव्य ग्लाडस्टन ह्यांस अतिशयित आवडत असे. त्यामुळें त्यांचा ओढा ग्रीस देशाकडे विशेष असे. त्यावरून आयोनियन बेटांतल्या लोकांस असें वाटे कीं, आपण ग्रीस देशाच्या आश्रयाखालीं राहावें, हेंच आमच्या मनांत भरविण्यास ग्लाडस्टन आले आहेत. पण ही समजूत बरोबर नव्हती. ग्लाडस्टन ह्यांनीं तेथल्या लोकांच्या सभा भरून त्यांस नानाप्रकारीं इंग्लंडाच्या आश्रयानें राहाण्यास सांगितलें, पण तें सगळें व्यर्थ गेलें. तेथल्या लोकांनीं आपल्या ह्मणण्याचा अर्ज त्यांच्यापाशीं दिला, तो त्यांना इंग्लंडच्या दरबारीं पाठवावा लागला. आणि इ. स. १८५९ च्या फेब्रुवारी महिन्यांत आयोनियन बेटांतून ग्लाडस्टन हे निघून परत इंग्लंडास गेले. पुढें लवकरच तीं बेटें, तेथल्या लोकांच्या ह्मणण्या-

प्रमाणें, ग्रीसच्या ताब्यांत गेलीं. पण ह्यांत, ग्लाडस्टन ह्यांस आरंभीं अतिशयित लोकापवाद सोसावा लागला. कारण कीं, होमरावरच्या प्रेमावरून ह्यांचा ओढा ग्रीस देशाकडे असल्यामुळें, ह्या बेटांतल्या लोकांस ग्रीस देशाच्या स्वाधीन होण्याविषयीं ग्लाडस्टन ह्यांनींच चिथविलें असलें पाहिजे, असें इंग्लंडांतले कांहीं लोक समजूं लागले. आणि त्यावरून, त्यांस देशाभिमानशून्य ह्मणून शिव्या देऊं लागले. कांहींएक अपराध न करितां मोठ्यामोठ्यांना देखील व्यर्थ लोकापवाद सोसावा लागतो, आणि चूप बसावें लागतें, त्याचें हें एक चांगलें उदाहरण आहे.

इ. स. १८६० ह्या वर्षाच्या जमाखर्चाचा खरडा ग्लाडस्टन ह्यांनीं पार्लमेंटास सादर केला होता, तो फार महत्त्वाचा होता. कां कीं, काबडेन ह्यांनीं फ्रान्स देशाशीं व्यापाराचा नवा तह ठरवून कागदावरची जकात कमी केल्याच्या व्यवहाराशीं त्याचा संबंध फार होता. ह्मणजे कागदावरची जकात माफ झाल्यानें केवढा लाभ होण्यासारखा होता, हें त्यांत चांगलें दाखविलें होतें. ह्या कागदावरच्या कराच्या कायद्याचा मसुदा कामन्स-सभेनें पसंत करून लार्डांच्या सभेकडे पाठविला. तेथें त्यास विरोध झाला. लार्डांनीं तो नामंजूर केला. तेव्हां ग्लाडस्टन ह्यांस त्यांचा अतिशयित राग येऊन ते आपल्या कामाचा राजीनामा देण्याच्या बेतास आले. तरी, तो आवेश तितकाच आंवरून, मोठ्या युक्तीनें त्यांनीं असें केलें कीं, त्याच्या पुढच्या वर्षाच्या ह्मणजे इ. स. १८६१ च्या जमाखर्चाच्या खरड्यांतच त्या कागदावरच्या कराचा ठराव सामील करून, त्यांनीं तो लार्डांच्या सभेस सादर केला. तेव्हां, त्या दोन प्रकरणांची ताडातोड त्यांस करतां येईना, आणि जमाखर्चाचा खरडा तर मंजूर करणें त्यांस भाग होतें. तेव्हां तें सगळें त्यांनीं पसंत केलें. हाच ग्लाडस्टन ह्यांचा लार्डांच्या सभेवरचा पहिला जय होय.

ह्याप्रमाणें पुढें ग्लाडस्टन ह्यांनीं इ० स० १८६२, ६३, ६४ आणि ६५ ह्या चार वर्षांचे जमाखर्चाचे खरडे पार्लमेंटास सादर केले. त्यांत उद्योगधंद्यावर कराचें ओझें न पडावें, करांची माफी करवेल तितकी करावी, करवेल तितकी काटकसर करावी, आणि युद्धप्रसंग सहसा येऊं देऊं नये,

हीं मुख्य तत्त्वें होतीं. त्यांच्या धोरणानें त्यांनीं सगळी व्यवस्था लाविली होती, आणि उत्पन्नांतून दरसाल बरीच शिलक राही असें बरेंच केलें होतें. तरी, त्यांच्या ह्या कारकीर्दींत, क्रिमियाची लढाई, आणि अमेरिकेंतल्या आपसांतल्या लढाईमुळें कापसाच्या बाजाराची ओढाताण, हीं विघ्नें आलीं. त्यामुळें त्यांतल्या पुष्कळ गोष्टी व्हावयाच्या राहिल्या. ह्या कृत्यांत काबडेन ह्याचें साह्य त्यांस फार झालें. हे काबडेन अनियंत्रित व्यापाराचे मोठे कैवारी होते. त्यांच्या खटपटीनें फ्रान्साशीं व्यापारासंबंधीं तह चांगला झाला. त्याचा उपयोग ग्लाडस्टन ह्यांचे बेत सिद्धीस जाण्यांत फार झाला. ह्या उद्योगानें ग्लाडस्टन ह्यांस मोठा संतोष झाला. स्वतः ग्लाडस्टन, ह्या सगळ्या उद्योगाच्या संबंधानें ह्मणाले, "इ. स. १८४५ ह्या वर्षीं इंग्लंडांत ११६३ प्रकारच्या पदार्थांवर कस्टमची जकात पडत होती, त्या संबंधाच्या सगळ्या आमच्या सूचना जर पसंत झाल्या, तर ती जकात अवघी ४८ पदार्थांवर राहील!" ह्यांनीं हें काम हातीं घेतलें, तेव्हां उत्पन्नापेक्षां खर्च पुष्कळ अधिक होता. परंतु इ. स. १८६५ त ह्या वर्षीं जमेंतून खर्च वजा जातां ३२०००००० पौंड शिलक राहावे असा हिशेब झाला होता. शिवाय त्यांनीं २४००००० पौंड इंग्लंडच्या कर्जाचे फेडिले, ते वेगळेच. देशाच्या जमाखर्चांत एवढा मोठा फेरफार कोणीं कधीं केला नव्हता, आणि त्यांत इतकें चातुर्य कोणीं प्रगट केलें नव्हतें. ह्या कामांवरून ग्लाडस्टन हे उत्तम नानाफडणीस आहेत असा मोठा लौकिक, केवळ इंग्लंडांतच नव्हे, तर सगळ्या युरोपखंडांतल्या दुसऱ्या देशांतही झाला. फ्रान्साच्या जमाखर्चाचा घोंटाळा झाला होता, आणि त्याचा हिशेब बरोबर लागेना, ह्मणून त्या देशाची नानाफडणिशी कांहीं दिवसपर्यंत ग्लाडस्टन ह्यांच्या हातीं द्यावी, असें देखील मध्यें चाललें होतें. "विद्वान् सर्वत्र पूज्यते" तें हेंच.

पार्लमेंटाचे सभासद निवडण्याबद्दलचीं मतें पूर्वीं लोक उघडपणें देत असत, त्यामुळें, मतें देणारांस आणि मतें मिळविणारांस दोघांसही पराकाष्ठेचा त्रास सोसावा लागत असे. ह्मणून, ती पद्धति अगदीं बंद करून, तीं मतें गुप्तपणें द्यावीं, असा कायदा ग्लाडस्टन ह्यांनीं इ. स. १८७१ ह्या वर्षीं मोठ्या प्रयत्नानें पास करविला.

लष्करी पदव्या उघडपणें विकण्याचा आणि विकत घेण्याचा धंदा चालत असे. त्याच्या योगानें, आंगांत गुण नसतांही, सरासरी माणसांस, पैशाच्या जोरावर, लष्करामध्यें अमलदार होतां येत असे, आणि हुद्यांवर चढतां येत असे. त्यामुळें गुण एकीकडे राहात. त्यांची चीज होत नसे. हें ग्लाडस्टन ह्यांस फार गैर दिसलें. ह्मणून, त्यांनीं कायद्याचा मसुदा कामन्ससभेंत आणून तो परिपाठ बंद करण्याचा प्रयत्न चालविला. परंतु, त्या मसुद्यास लार्डांच्या सभेचा फार मोठा विरोध दिसला. तेव्हां ग्लाडस्टन ह्यांनीं तो कायद्याचा नाद सोडून देऊन, मुख्य प्रधान ह्या नात्यानें तें सगळें प्रकरण महाराणी साहेबांस समजावून सांगून, त्या क्रयविक्रयास स्वतः महाराणी सरकाराची जी मंजुरी लागत असे, तीच अजी मिळूं नये असें केलें. ही युक्ति लोकांस फार विलक्षण वाटली, आणि तीवरून ग्लाडस्टन ह्यांची मोठी तारीफ झाली.

इ. स. १८५७ ह्या वर्षीं स्त्रीपुरुषांच्या घटस्फोटाच्या कायद्याचा मसुदा कामन्ससभेपुढें आला. त्यास पुष्कळ लोकांची संमती होती. त्यांतही लार्ड पामरस्टन ह्यांचा पक्षपात त्याविषयीं फार मोठा होता. परंतु, ग्लाडस्टन ह्यांचें मत अगदीं त्यास प्रतिकूल होतें. त्या मसुद्यावर वाद वेगळ्या वेगळ्या मुद्यांच्या संबंधानें, कितीएक दिवसपर्यंत चालला होता. त्यांत ग्लाडस्टन हे एकंदर सत्तर बाहात्तर वेळां बोलले. त्या मसुद्यामध्यें असें होतें कीं, बायकोच्या हातून एकदां व्रतभंग झाल्याचें सिद्ध झाल्याबरोबर तिला काडी मोडून देण्याचा अधिकार नवऱ्यास आहे; आणि बायकोच्या पक्षीं असें होतें कीं, नवरा मारतो किंवा हाल करतो असें सिद्ध होऊन तो वारंवार व्रतभंग करतो असें सिद्ध झाल्याशिवाय तिला नवरा सोडण्याचा अधिकार येत नाहीं. हा पक्षपात ग्लाडस्टन ह्यांस अत्यंत अयोग्य वाटला. त्याविषयीं ते फार कडक बोलले. त्या संबंधाचीं त्यांचीं भाषणें ऐकून एखाद्याला असें वाटलें असतें कीं, ह्यांनीं ह्या एका विषयाच्या अभ्यासांत सगळा जन्म घालविला आहे कीं काय कोण जाणे. ते भराभरां पूर्वींच्या तशा प्रकारच्या कायद्यांतलीं कलमें ह्मणून दाखवीत, आणि त्याविषयीं धर्मशास्त्रांत काय ह्मटलें आहे तें पटापट शब्दशः सांगत. तें ऐकून सगळ्या

लोकांस फार आश्चर्य वाटे. त्यांत, प्रथम त्यांनीं तो मसुदा अजीबात खोडून टाकण्याचा प्रयत्न केला. तो तडीस जात नाहीं, असें त्यांस दिसलें तेव्हां तो पुढें कालांतरावर टाकण्याची खटपट त्यांनीं केली. ती जमत नाहींशी वाटली, तेव्हां त्यांतलें जें काय अगदीं अप्रशस्त असें त्यांस वाटत होतें, तें गाळण्याचा उद्योग केला. तोही निष्फळ झाला. आणि तो कायदा शेवटीं पसंत झाला. त्याच्या संबंधानें ग्लाडस्टन ह्मणत कीं, "ह्या प्रकरणीं अडचणी मनस्वी येतात, हें मला कबूल करणें भाग आहे. तें मी कबूल करितों. परंतु लग्न हें एक फार मोठें गुह्य आहे, असें मला वाटतें. जगांतल्या व्यवहारांत ज्या कांहीं अत्यंत विलक्षण गोष्टी आहेत, त्यांतलीच एक गोष्ट लग्न ही आहे. आणखी मला विचार करितां करितां शेवटीं असें वाटतें कीं, आपल्या जुन्या समजुतींप्रमाणें, लग्नाच्या गोष्टी ह्या देवाच्या घरच्या आहेत, असें घेऊन चाललें पाहिजे. आलीकडे विशेषेंकरून श्रेष्ठ प्रतीच्या लोकांत, मला शोधांतीं आणि अनुभवांतीं असें कळलें आहे कीं, ह्या समजुतींत विलक्षण फेरफार होऊन गेला आहे. ह्मणजे, लग्नें लागल्यावर नवराबायकोचें विटणें, हे प्रकार जितके पूर्वीं होत असत, तितक्यांपेक्षां सध्यां पुष्कळ—मनस्वीच—होत चालले आहेत. हें घटस्फोटाच्या कायद्यामुळें झालें आहे, असें मी ह्मणत नाहीं. हा कायदा झाला तेव्हां जितके घटस्फोट होतील असें आह्मांला वाटलें होतें, तितके घटस्फोट होत नाहींत. परंतु, स्त्रीपुरुषांच्या बेबनावांची संख्या दिवसेंदिवस वाढत चालली आहे, ही गोष्ट कांहीं खोटी नव्हे. हिचें मला फार वाईट वाटतें." ह्या वादविवादांत ग्लाडस्टन ह्यांचें कोटिक्रमसामर्थ्य उत्तम प्रकारें दिसून आलें. तरी तो विषय पुष्कळांच्या मनांत भरला होता. त्यामुळें ग्लाडस्टन ह्यांच्या सूचनांवरून कांहीं फेरफार होऊन तो कायदा पास झाला. लग्नसंबंधींची ग्लाडस्टनांची कल्पना अगदीं आह्मां हिंदूंच्या कल्पनेसारखी होती, असें कोणालाही वाटण्यासारखें आहे.

इ० स० १८६२ ह्या वर्षी अमेरिकेंतल्या स्वतंत्र संस्थानांत, गुलामांच्या व्यापारावरून मतभेद होऊन फाटाफूट झाली. दक्षिणेकडील संस्थानें गुलामांचा व्यापार करण्याचा आग्रह धरून बसलीं, आणि उत्तरेकडचीं संस्थानें

तो बंद करण्याचा निश्चय करून राहिलीं. ह्या वेळीं संस्थानांचे प्रेसिडेंट **एब्राहाम लिंकन** हे होते. ते मोठे निग्रही आणि स्वातंत्र्यभक्त होते. त्यांच्या उद्योगानें उत्तरवाल्यांस मोठी वीरश्री आली होती, आणि ते दक्षिणवाल्यांशीं मोठ्या निकरानें लढत होते. त्या प्रकरणीं इंग्लंडाचा असा निश्चय झाला होता कीं, त्या दोन पक्षांपैकीं कोणत्याच पक्षास साह्य करायाचें नाहीं, आणि अगदीं तिऱ्हाईतपणें राहावयाचें. परंतु त्यांत थोर पुरुषांस मतस्वातंत्र्य होतेंच. ह्या प्रकरणीं ग्लाडस्टन हे उत्तरवाल्यांकडचे असावयाचे, अशी सर्वांची खातरी होती. कारण, ते दिवसेंदिवस अधिकाधिक लिबरल-पक्षी होत चालले होते. परंतु, ह्याविषयीं त्यांनीं आक्टोबरच्या सातव्या तारखेस न्यूक्यासल येथें जें भाषण केलें, त्यांत त्यांनीं आपला सगळा ओढा दक्षिणवाल्यांकडे असल्याचें प्रगट केलें. ते ह्मणाले, "दक्षिणेकडचे लोक कांहीं सामान्य नाहींत. जेफर्सन, डेव्हिस, इत्यादि अग्रण्यांनीं चागलें सैन्य तयार केलें आहे. ते आरमार तयार करीत आहेत असें दिसत आहे. आणि ह्या दोहींपेक्षां विशेष श्रेयस्कर असें जें काय त्यांनीं केलें आहे, तें हें कीं, त्यांनीं वेगळें राष्ट्र सिद्ध केलें आहे. हीं दक्षिणेकडचीं संस्थानें उत्तरेकडच्यांपासून वेगळीं झाल्यावर आपलें स्वातंत्र्य स्थापित करतील, ह्यांत


एब्राहाम लिंकन.

मुळींच कांहीं संशय नाहीं." हें त्यांचें मत अमेरिकेंतल्या उत्तरवाल्यांस आणि ग्लाडस्टनांच्या अनुयायांस कळलें, तेव्हां त्यांस विलक्षण आश्चर्य वाटलें, आणि हें झालें कसें, हें त्यांस मोठें गूढ पडलें. पण, खरा प्रकार कांहीं वेगळा होता. ह्याविषयीं जस्टिन मकार्थी ह्यांनीं असें लिहिलें आहे कीं, "ह्या विषयाची माहिती करून घेण्याच्या आधीं ग्लाडस्टन असें बोलून गेले, हेंच फार वाईट झालें. त्यांनीं काबडेन, ब्रैट, मिल इत्यादिकांचीं मतें काय होतीं तीं आधीं पहावयाचीं होतीं. परंतु, ग्लाडस्टन हे जन्माचेच फार उतावळे होते. त्यांच्या पोटांत एकादी चांगली गोष्ट वाटली ह्मणजे ती ओंठांत येण्यास मुळींच उशीर लागत नाहीं. अशी त्यांची वृत्ति आहे, तिचा हा परिणाम आहे. तीस उपाय नाहीं." आणि तेंच खरें होतें. ह्याचें प्रमाण लगेच पुढें आलें. लढाईस पांच वर्षें लोटल्यावर, ग्लाडस्टनांनीं एके प्रसंगीं भाषणांत आपली चूक प्रांजळपणें कबूल केली. ते ह्मणाले, "मी तेव्हां फार चुकलों होतों, हें मला कबूल करणें भाग आहे. मीं आपलें तसें मत बोलून दाखविलें, हें मोठें ओझें मी आपल्या डोक्यावर घेतलें होतें, हें खचीत आहे. पण, तेव्हां असें मत देण्यांत माझा कांहीं हेतु वाईट नव्हता. अमेरिकेंतल्या सगळ्या लोकांकडे माझा जीव जसा आतां ओढत आहे, तसा तेव्हांही ओढत होता. परंतु, त्या संस्थानांच्या मधले संबंध तेव्हां माझ्या लक्षांत आले नव्हते, ह्मणून माझें मत तसें झालें होतें, आणि तें मी बोलून चुकलों, त्यास उपाय नाहीं. बाकी, इतर इंग्लिश गृहस्थांच्या मताहून माझें मत कांहीं वेगळें आहे. तें हें कीं, त्या सगळ्या संस्थानांमध्यें ऐक्य असणें हें इंग्लंडाच्या हिताचें आहे. त्यांत फूट असणें हें बरें नाहीं." मनुष्य केवढा असला, तरी त्याच्या हातून कधींना कधीं चूक होत असते. पण ती चूक प्रांजळपणें कबूल करणें ह्यांतच तें मोठेपण दृश्यमान होतें.

ही अमेरिकेंतल्या स्वतंत्र संस्थानांतली आपसांतली लढाई आटोपल्यावर इंग्लंडाच्या संबंधानें एक प्रकरण उत्पन्न झालें. आणि त्यावरून इंग्लंडास आपला अपराध पदरीं घेऊन अमेरिकेचें नुकसान भरून द्यावें लागलें.

त्याचा प्रकार असा. इंग्लंडामध्यें, त्या आपसांतल्या लढाईच्या वेळीं, कांहीं लढाऊ गलबतें बांधिलीं, त्यांत **आलाबामा** हें मोठें होतें. ह्या गलबतांवर खलाशी इंग्लिश लोक होते, त्यांवर इंग्लिश बावटे फडकत होते, आणि तीं इंग्लिशांचीं गलबतें ह्मणून बंदरोबंदरीं जात येत होतीं. तीं गलबतें त्यांनीं दक्षिणेकडच्या संस्थानांस दिलीं. त्यांचा उपयोग त्यांनीं केल्यामुळें, उत्तरवाल्यांचें फार नुकसान झालें. तें इंग्लंडानें भरून दिलें पाहिजे, असें स्वतंत्र संस्थानांचें ह्मणणें पडलें. कां कीं, इंग्लंड हें तिऱ्हाईत होतें, त्यास त्या लढाईच्या कामांत पडण्याचें प्रयोजन नव्हतें. हें प्रकरण लढाईवर जावयाचें; परंतु, इंग्लंडांतल्या दरबारांत शांतिप्रिय ग्लाडस्टन ह्यांचें प्राबल्य होतें, आणि तिकडची अमेरिकेंतली मंडळीही तशीच होती. त्याच्या योगानें उभयतां राष्ट्रांकडचे सहा सहा पंच बसवावे, आणि त्यांच्या बहुमताप्रमाणें उभयतांनीं वर्तावें, असें ठरलें. त्याप्रमाणें ग्लाडस्टन ह्यांनीं इंग्लंडाच्या वतीची मंडळी वाशिंग्टन येथें पाठविली. तींत लार्ड रिपन हे गृहस्थ होते. त्या पंचांच्या सभेंत पुष्कळ भवति न भवति होऊन, शेवटीं स्वतंत्र संस्थानांचें ह्मणणें बहुमतानें खरें झालें, आणि त्यांच्या नुकसानीबद्दल इंग्लंडानें त्यांस सुमारें ३२८०००० पौंड द्यावे असें इ० स० १८७२ च्या सप्तंबरांत ठरविलें. त्याप्रमाणें रकम अमेरिकेंतल्या संस्थानांस मिळून हें प्रकरण आटपलें. हा सगळा प्रकार इंग्लंडास अत्यंत अपमानास्पद वाटला. कांहीं इंग्लिश राजकार्यधुरंधरांच्या पायांची आग मस्तकास गेली. आणि कांहीं जागचे जागीं चुरमुरत गुप चूप राहिले. परंतु, त्यांत खरा न्याय होता. त्याच्यापुढें त्यांच्यानें जाववेना. तेथें त्यांचा उपाय हरला. हें प्रकरण अशा शांत रीतीनें आटपण्यास मुख्य कारण ग्लाडस्टन होते. हे जर ह्या वेळेस नसते, तर खचीत मोठी लढाई झाली असती.

इ० स० १८६४ ह्या वर्षीं, पार्लमेंटाचे सभासद निवडण्याविषयींच्या अधिकाराच्या संबंधानें एक मसुदा पार्लमेंटापुढें सादर झाला. त्यांत मुख्य उद्देश हा होता कीं, दहा पौंड उत्पन्नवाल्यांस जो हा अधिकार होता, तो, सहा पौंड उत्पन्नाच्या लोकांपर्यंत आणून ठेवावा. हा कायदा पसंत झाला

नाहीं, तरी, ह्याविषयीं ग्लाडस्टनांचीं जीं भाषणें झालीं, त्यांवरून ह्या प्रसंगाची विशेष प्रख्याती आहे. ते ह्मणाले, " मला तर असें वाटतें कीं, ज्या मनुष्यांस मानसिक व्यंगामुळें किंवा कांहीं राजकारणामुळें ह्याविषयीं मत देण्याचा अधिकार नाहीं, अशा मनुष्यांखेरीजकरून बाकी सगळ्या माणसांस हा अधिकार आहे." हें अगदीं खरें आहे. आणखी, हा कायदा विशेषेंकरून साधारण प्रतीच्या कामकरी–मजूरलोकांच्या संबंधाचा फार होता. ह्मणजे, हा जर पसंत झाला असता, तर त्यांस हा हक्क मिळावयाचा होता. ह्याविषयीं ग्लाडस्टन ह्मणाले, "आह्मांला लोक असें सांगतात, कीं, ह्याविषयीं ते लोक कांहीं गडबड करीत नाहींत, मग तुह्मी कां उगाच उचल करितां? ह्यावर माझें विचारणें असें आहे कीं, ह्या संबंधाची उचल त्यांच्याकडून होईपर्यंत आपण कांहींएक बोलूं नये, तसेंच स्वस्थ राहावें, हें योग्य आहे काय? माझें मत तर असें आहे कीं, पार्लमेंटाच्या कायद्यांत सुधारणा करण्यासाठीं अशा कामकरी लोकांकडून उचल होण्याविषयींची वाट पाहत बसणें हें कांहीं चांगलें नाहीं. एवढेंच केवळ नव्हे, तर अशी उचल होण्याचा प्रसंग त्यांस येऊं देणें हें टाळवेल तितकें टाळावें, हें अत्यंत आवश्यक आहे. कामकरी लोकांकडून अशी उचल होणें हें, त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ प्रतीच्या लोकांकडून ह्मणजे ज्यांस रिकामा वेळ पुष्कळ असतो अशा लोकांकडून उचल होण्यासारखें नाहीं. वेळ पुष्कळ रिकामा असतो, त्यास अशा उचली सहज करितां येतात, त्यांत त्यांस कांहीं नुकसान सोसावें लागत नाहीं. वेळ फुकट जात असतो, तो इकडे लागतो, एवढेंच काय तें. परंतु, मजुरांचें तसें नाहीं. मजूर माणूस ह्या उचलीच्या कामाकडे गुंतावयाचा ह्मटला ह्मणजे, त्यानें आपल्या हातचें काम सोडावयाचें, ह्मणजे ज्या कामावर त्याचें स्वतःचें आणि त्याच्या बायकामुलांचें उपजीवन चालत असतें, तें काम सोडावयाचें, आणि ह्या कृत्यास लागावयाचें, त्यांत त्याचें केवढें तरी नुकसान आहे बरें? आणखी त्यानें तसें करणें ह्मणजे, त्यानें असें ह्मणावयाचें कीं, माझ्याकरितां प्रभूनें जें काय करावयास पाहिजे आहे, तें प्रभु करीत नाहींत—माझा निरुपाय झाला आहे, ह्मणून मी

निरुपायास्तव ही उचल करावयास लागतो. ह्मणजे ह्यांत राज्यकर्त्यांवर अविश्वास गर्भित होतो, हें नीट नाहीं. परंतु, सध्या प्रसंग कांहीं तसा नाहीं, ही गोष्ट मोठ्या आनंदाची आहे. तथापि, कामकरी लोकांकडून उचल होत नाहीं आहे, एवढ्यावरून कायद्यांत सुधारणा करण्याचें मार्ग टाकणें हें पार्लमेंटास आणि इंग्लिश राष्ट्रास करितां कामास नये. कां कीं, तें कारण त्यास पुरेसें नाहीं." खरें आहे. मागितल्यावर, तगादा केल्यावर, निकड लावल्यावर, कोणी झालें तरी देईलच. परंतु, मागणी होण्याच्या आधीं केवळ न्याय्य ह्मणून आपण होऊन देणें हें भूषणावह आहे.

ग्लाडस्टन ह्यांनीं ग्रीस देशाचीं, तुर्कस्थानाचीं, आयोनियन बेटांचीं, तशीं इतर देशांचीं पुष्कळ कामें केलीं. पण आमच्या हिंदुस्थानचें काय काम केलें, असा प्रश्न सहज उत्पन्न होतो. त्यालाही उत्तर आहे. पण तें ऐकण्याच्या अगोदर एक विचार मनांत ठेविला पाहिजे. तो हा कीं, ग्लाडस्टन जरी फार मोठे बुद्धिवान् आणि मोठे नामांकित राजकारणी पुरुष होते, तरी, ते मनुष्य होते. त्यांच्या मनाला त्यांच्या देशाच्या संबंधाचीं इतकीं कामें होतीं कीं, त्यांच्यापुढें परदेशांचें काम करण्यास त्यांस मुळींच फावत नसे. तरी, प्रसंगानुसार प्रकरण पुढें आलें असतां, हिंदुस्थानाविषयींही ते आपली न्यायदृष्टि प्रगट करण्यास कधीं चुकले नाहींत. पण असे प्रसंग एक किंवा दोनच आले, तेथें उपाय नाहीं. त्यांतल्या एका प्रसंगीं, लार्ड लिटन ह्यांच्या जागीं हिंदुस्थानाच्या व्हाइसरायांच्या जागेवर त्यांनीं



लार्ड रिपन.

लार्ड रिपन ह्यांची नेमणूक केली. ही नेमणूक करण्यास त्यांस इंग्लंडच्या दरबारांत बरीच अडचण सोसावी लागली. कां कीं, लार्ड रिपन हे फार थोर आणि फार चांगले गृहस्थ आहेत, अशी जरी इंग्लंडच्या लोकांची खातरी होती, तरी, त्यांनीं, त्या वेळेच्या थोडें आधीं, प्राटेस्टंट धर्मपंथाचा त्याग करून रोमनक्याथोलिक धर्मपंथ स्वीकारिला होता, त्यावरून ते लोकांच्या चर्चेस पात्र झाले होते तरी, त्याविषयीं ग्लाडस्टन ह्यांनीं कांहीं परवा केली नाहीं. लार्ड रिपन हे हिंदुस्थानाच्या व्हाइसरायाचें काम, हिंदुस्थानास सुखावह आणि इंग्लंडास भूषणावह असें करतील असें खचीत समजून, त्यांनीं त्यांची योजना केली. ती चांगली सफल झाली. ती अशी कीं, लार्ड रिपन ह्यांनीं हिंदुस्थानाच्या हितार्थ इतक्या गोष्टी केल्या कीं, त्यांचें वर्णन करण्यास वेगळा ग्रंथ ल्याहावा लागेल. त्या गोष्टींत मुख्य ह्या होत्याः—

१. अफगाणिस्थानाशीं लढाई चालली होती, ती बंद केली.

२. गोरे लोक आणि काळे लोक ह्यांचा न्याय एकाच पद्धतीप्रमाणें व्हावा, असें ठरविण्याचा प्रयत्न केला.

३. वायव्यप्रांत आणि अयोध्याप्रांत ह्यांत परवारी ह्मणून एक कर होता, तो बंद केला.

४. मिठावरची जकात सरसकट दरमणीं दोन रुपये केली. त्यानें लोकांवरचें १,४०,००००० रुपयांचें ओझें कमी झालें.

५. विलायती कापसाच्या मालावरची आणि दुसऱ्या कितीएक पदार्थांवरची जकात माफ केली.

६. ईजिप्तच्या लढाईच्या खर्चाच्या मदतीस हिंदुस्थानास इंग्लंडानें ५०,००००० रुपये द्यावे असें ठरवून घेतलें.

७. वर्तमानपत्रांच्या स्वातंत्र्यास प्रतिबंधक कायदा पूर्वींच्या कारकीर्दींत झाला होता, तो रद्द केला.

८. सरकारी कामाकाजाकडे ह्या देशांत तयार झालेला माल जितका चालण्यासारखा असेल तितका घ्यावा, असा ठराव केला.

९. स्थानिक स्वराज्याची स्थापना शहरोशहरीं करून, लोकांस आपापलीं सार्वजनिक कामें करतां यावीं, असें वळण लाविलें.

ह्या सगळ्या कामांत ग्लाडस्टन ह्यांच्या कर्तृत्वाचें पुष्कळ धोरण दृश्यमान आहे. लार्ड रिपन ह्यांनीं आपलें नांव हिंदुस्थानांतल्या लोकांच्या अंतःकरणांत चिरस्थायी करून ठेविलें आहे. लार्ड रिपन ह्यांचें नांव हिंदुस्थानचे लोक कधीं विसरणार नाहींत. हिंदुस्थानांतल्या इंग्लिश राज्याविषयीं ग्लाडस्टनांनीं एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, "हिंदुस्थानांमध्यें इंग्लिश राजसत्ता चिरस्थायी होण्यास मुख्य दोन गोष्टी आवश्यक आहेत. त्यांतली पहिली गोष्ट ही कीं, आमचें राज्य हिंदुस्थानच्या लोकांस हितावह होणें आणि दुसरी गोष्ट ही कीं, आमचें इंग्लिश राज्य सुखावह खरोखर आहे, असें त्या लोकांच्या मनांत चांगलें भरणें." खरेंच आहे. आह्मी तर असें ह्मणतों कीं, ग्लाडस्टनांच्या ह्या दोन वाक्यांत हिंदुस्थानसंबंधाच्या इंग्लडाच्या सगळ्या राजनीतीचा आणि सगळ्या व्यवहारशास्त्राचा समावेश झाला आहे. ह्या दोन गोष्टी जर पूर्णपणें साधल्या, तर हिंदुस्थानचें कोटकल्याण झालें, असें ह्मणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. आणखी, विचार करून पाहिला ह्मणजे असें स्पष्ट दिसतें कीं, लार्ड रिपन ह्यांची कारकीर्द ह्या दोन तत्वांस धरून चालली होती. तीं तत्वें त्यांना आणि त्यांच्या राष्ट्राला ह्मणजे इंग्लंडाला लाभदायक आणि भूषणावह होऊन, हिंदुस्थानास सुखावह झालीं आहेत. ते हिंदुस्थान सोडून गेले, तेव्हां त्यांचा जो सन्मान हिंदुस्थानच्या लोकांनीं केला, तो ज्यांनीं डोळ्यांनीं पाहिला असेल, त्यांस, मागचा शेंपन्नास वर्षांचा इतिहास वाचून देखील खातरीनें असें ह्मणतां येईल कीं, इंग्रजांचें राज्य हिंदुस्थानांत झाल्या दिवसापासून लार्ड रिपनांइतके चांगले इंग्लिश गृहस्थ हिंदुस्थानांतल्या लोकांस दुसरे एकही वाटले नाहींत. अद्याप देखील राज्यप्रकरणीं अडचणी आल्या ह्मणजे हिंदुस्थानाच्या लोकांस लार्ड रिपन ह्यांची आठवण होते. हें सगळें ग्लाडस्टनांच्या कृतीचें फल आहे. ही केवळ हिंदुस्थानांतलीच गोष्ट नव्हे. अगदीं शेवटीं इ० स० १८९४ ह्या वर्षीं ग्लाडस्टन ह्यांनीं मुख्य प्रधानकीच्या कामाचा राजीनामा

दिला तेव्हां त्यांच्या त्या जागेवर नेमण्यास योग्य अशीं ज्या गृहस्थांचीं नांवें बाहेर आलीं, त्यांत लार्ड रिपन ह्यांचें नांव होतें. एवढी त्यांची योग्यता इंग्लंडांतही मानीत होते. तेव्हां ही नेमणूक अगदीं रास्त होती, हें उघड आहे.

ह्याशिवाय, हिंदुस्थानाचें दुसरें एक काम ग्लाडस्टन ह्यांनीं केलें. त्यांत द्रव्यसंबंध होता. त्याची रकम मोठी होती कीं लहान होती, हा विचार मुख्य नव्हे आहे. तर, मुख्य विचार न्यायदृष्टीचा आहे. इ० स० १८७९–८० ह्या वर्षीं जी लढाई अफगाणिस्थानाशीं झाली, ती कशावरून आणि कशी झाली, हें आमच्या वाचकांस ठाऊक आहेच. तिचा सगळा खर्च हिंदुस्थानावर घालण्याचा विचार ठरल्यासारखा झाला होता. परंतु, तसें करणें हें न्यायाचें नाहीं, तिचा कांहीं अंश इंग्लडानें दिला पाहिजे, अशी सूचना फासेट साहेबांनीं पार्लमेंटांत आणिली. तिच्या संबंधानें, इ. स. १८८७ च्या मार्च महिन्याच्या दुसऱ्या तारखेस ग्लाडस्टन ह्यांनीं, पार्लमेंटांत भाषण केलें. त्यांत ते



फासेट.

ह्मणाले, "ह्या संबंधानें हिंदुस्थानाच्या व्हाइसरायांचें मत आहे, तेंच तेथल्या लोकांचें मत आहे, असें सांगणें हें अगदीं विसंगत आहे. आमच्या कानीं तर सहसा असें कधीं येत नाहीं. ही अफगाणलढाई केवळ हिंदुस्थानाची नव्हती, तर, ही एकंदर इंग्लिश बादशाहीची

होती, असें, लार्ड साल्सबरी आणि व्हाइसराय ह्यांच्या बोलण्यांत गर्भित झालेलें आहे. त्या पक्षीं, ह्या लढाईच्या खर्चाचा चांगला भक्कम अंश इंग्लंडानें दिला पाहिजे, हें आवश्यक आहे. हिंदुस्थानांतली जी लढाई इंग्लंडानें आपल्या जबाबदारीवर केली आहे, तिच्या खर्चाचा बहुतेक अंश इंग्लंडानें द्यावा, हें मी ह्या देशांतल्या पाहिजे त्या सभेमध्यें निक्षून सांगण्यास तिळभरही कचरणार नाहीं. कां कीं, तें अगदीं न्याय्य आहे." ह्या भाषणावरून इंग्लंडानें त्या लढाईच्या खर्चाकडे आपल्या उत्पन्नांतले ५०,००००० पौंड दिले. ही गोष्ट कांहीं सामान्य नव्हे. इतर कामांच्या गर्दीमुळें ग्लाडस्टन ह्यांच्या दृष्टीसमोर हिंदुस्थानाच्या अडचणी आल्या नाहींत, हें हिंदुस्थानाचें दुर्दैव होय. तरी, जें हें काय थोडेंसें त्यांनीं हिंदुस्थानाकरितां केलें, त्यावरून त्यांच्या न्यायीपणाचें दिग्दर्शन उत्तम प्रकारें होतें, हें कबूल करायास पाहिजे. आपलें कोणीं काय बरें केलें आहे, तें पाहून त्याचे उपकार मानणें हें खरें मोठेपण आहे, आपलें कोणीं काम केलें नाहीं, हें उकरून काढून त्यावर रुसणें हें कांहीं शाहाणपण नव्हे.

इंग्लंडच्या दरबारास इ० स० १८८२ ह्या वर्षीं ईजिप्त देशाच्या संबंधानें बराच त्रास सोसावा लागला. त्या देशावर अमल खेदिवाचा असून तेथें आरबी पाछा ह्यानें बंड उभारलें होतें. आणखी खेदिवाचा पक्ष इंग्लिश सरकारानें पूर्वीपासूनच उचलला होता, ह्मणून त्यास साह्य करण्याकरितां सैन्य तिकडे पाठविलें होतें. इंग्रजी आरमारानें तोफा लावून अलेक्झांड्रिया हें शहर उडविलें होतें, आणि तिकडे सगळा धुमाकूळ चालला होता. तो स्वतः ग्लाडस्टनांस आणि त्यांच्या अनुयायांस मुळींच संमत नव्हता. तरी, तो, मागच्या–लार्ड बीकान्सफील्ड ह्यांच्या–कारकीर्दीपासून चालत आला होता, तो त्यांस राजकारणास्तव एकदम बंद करतां येईना. तरी, जॉन ब्रैट ह्मणजे, ग्लाडस्टनांचे एकनिष्ठ भक्त–निस्सीम भक्त –ह्यांस तो अत्यंत दुर्वह वाटला, आणि त्यांनीं प्रधानमंडळींतल्या आपल्या कामाचा राजीनामा अगदीं निरुपायास्तव दिला. ही त्यांची आणि ग्लाडस्टनांची तुटातूट झाली. ही त्यांची बहुत दिवसांची एकी तुटली, त्याचें-

त्यांस अतिशयित वाईट वाटलें. त्या प्रसंगीं त्यांनीं जें भाषण केलें, तें फार


आरबी पाछा.

चित्तवेधक आहे. ते ह्मणाले, "आमचीं मतेंच मुळीं विरुद्ध पडलीं, त्यामुळें मला त्यांपासून वेगळें होणें भाग पडलें. सध्यां स्थिति आहे, तशी चालत असतां मी जर प्रधानमंडळांत तसाच राहिलों असतों, तर, ज्या गोष्टी मला अगदीं अप्रशस्त वाटतात, अगदीं अयोग्य वाटतात, नकोतशा वाटतात, त्यांस संमती देणें भाग पडलें असतें, असें झालें असतें एक, किंवा, त्यांचा प्रतिकार करण्याकरितां आपल्या बरोबरीच्या मंडळीशीं नेहमीं भांडावें लागलें असतें, झगडावें लागलें असतें, एक. ह्मणून, मीं कामाचा राजीनामा दिला आहे, हें त्यांना आणि मला असें दोघांनाही बरें आहे. ह्या पार्लमेंट सभेस ठाऊक आहे कीं, नीतिशास्त्राचे नियम जे आहेत, ते माणसांनीं एकमेकांशीं वागतांना पाळावे, एवढेंच केवळ नव्हे, तर ते नियम राष्ट्रांनींही परस्परांशीं वागतांना पाळिले पाहिजेत. हें तत्त्व आज मी एकसारखें चाळीस वर्षें प्रतिपादीत आहें—लोकांच्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न करीत आहें. आणि सध्यांच्या प्रकरणांत साधारण जन-

नीति आणि राष्ट्रनीति ह्या दोहींचेंही फार उल्लंघन होत आहे. अशा कृत्यास संमति देणें माझ्यानें होत नाहीं. मी जें काय इतकीं वर्षें सांगत आलों आहें, त्याच्या विरुद्ध माझ्यानें जाववत नाहीं. अशा स्थितींत माझ्या मनोदेवतेनें मला जें युक्त असें एकदम सांगितलें, तें मीं केलें आहे." पुढें आरबी पाछाचा पराभव झाला. त्याला पकडून काळ्या पाण्याच्या शिक्षेवर ह्मणून सीलोन येथें पाठवून दिलें. आणि ईजिप्तांत इंग्लिशांचें वर्चस्व कायम राहिलें. हें सगळें ठीक झालें. परंतु, ह्या कामांत पुष्कळ ढिलाई होऊन, पुष्कळ थोर पुरुष खर्चीं पडले, आणि त्यासारखा इंग्रजांला कांहीं लाभ झाला नाहीं. ह्मणून ग्लाडस्टनांच्या ह्या कृतीचा लोकांस फार राग आला. तथापि, कोणीकडून तरी रक्तपात बंद व्हावा, आणि शांतता चालावी, हें जें ग्लाडस्टनांचें मुख्य तत्त्व होतें, तें कायम राहिलें.

मागच्या कारकीर्दीचें आणखी एक खरकटें ग्लाडस्टन ह्यांस काढावें लागलें. तें ट्रून्सव्हाल ह्या प्रजासत्ताक राज्याविषयीं होतें. तें कितीएक वर्षांपासून इंग्लडच्या रक्षणाखालीं होतें. हें राज्य आफ्रिकेंत आहे. तेथें बोअर लोक राहातात. ते अत्यंत स्वातंत्र्यप्रिय असून इंग्लिश सरकाराचा समज असा होता कीं, त्यांस इंग्लिश राजसत्ता पाहिजे आहे. ह्मणून त्याविषयीं चौकशी करण्यास सर थिओफिलस शेपस्टोन ह्यांस इंग्लिश सरकारानें तिकडे पाठविलें. त्यांस त्या देशाची खरी स्थिति मुळींच कळली नाहीं. कांहीं थोडेसे बोअर लोक त्यांजकडे आले, त्यांवरून त्यांला वाटलें कीं, सगळ्या लोकांची इच्छा अशीच आहे. तेवढ्यावरून त्यांनीं एकदम तेथें इंग्लिश सरकारचा झेंडा उभारून तें राज्य इंग्लिश सरकारच्या राज्याचा भाग आहे, असें प्रसिद्ध केलें. तें बाकीच्या बोअर लोकांस विषम वाटलें. कां कीं, ते स्वभावतःच मोठे स्वातंत्र्यप्रिय होते, उग्र होते, आणि त्यांस परस्वाधीन राहाण्यास मुळींच नको होतें. हें सगळें जाणून झालेला प्रकार अगदीं असंबद्ध आहे, कान्सर्व्हेटिव सरकारानें हें सगळें काम चुकीनें केलें आहे, असें ग्लाडस्टन हे वारंवार बोलत. आणि ट्रून्सव्हालच्या लोकांनीं आपल्या वर्तणुकीवरून स्पष्ट दाखविलें कीं, आपण इंग्लिश सरकाराच्या स्वाधीन

राहाण्यास मुळींच खुषी नाहीं. ते इंग्लिश सैन्यावर उठले, आणि त्यांनीं त्याचा पराभव केला. हें इतकें चाललें होतें, तोंच ग्लाडस्टन हे दुसऱ्यानें मुख्य प्रधान झाले. त्यांस असें वाटलें कीं, त्या लोकांशीं तह करून, पहिल्यासारखी सगळी व्यवस्था करावी हें बरें. परंतु, तें बाकीच्या मंडळीस आवडेना. ग्लाडस्टनांचें ह्मणणें असें होतें कीं, आपण त्यांचें राज्य चुकीनें आपल्या राज्यास जोडिलें आहे, तें त्यांचें त्यांस परत द्यावें, हेंच आपल्या ख्रिस्ती राज्यरीतीस आणि आपल्या राष्ट्राच्या उज्ज्वल कीर्तीस आवश्यक आहे. आणि त्याप्रमाणें व्यवस्था करून त्या लोकांचें प्रजासत्ताक राज्य, त्यावर इंग्लंडाचें नुसतें संरक्षण ठेवून त्यांस पहिल्याप्रमाणें परत दिलें. बोअर लोकांपासून तें राज्य इंग्लिश सैन्यानें सहज हिसकावून घेतलें असतें. परंतु तो अन्याय झाला असता, तें पाप झालें असतें, ह्मणून तें ग्लाडस्टनांनीं होऊं दिलें नाहीं. ही गोष्ट १८८५ ह्या वर्षीं झाली. हिजविषयींही कितीएक लोकांस ग्लाडस्टनांचा मोठा राग आला, आणि त्यांनीं असें पिकविलें कीं, ग्लाडस्टनांनीं इंग्लंडाचें फार मोठें नुकसान केलें. परंतु, ग्लाडस्टनांची सगळी दृष्टि धर्मनीतीवर होती. त्यांनीं कोणाच्या बोलण्यास जुमानिलें नाहीं.

त्याप्रमाणेंच मध्यएशियामध्यें रशिया पुढें पुढें येत चालला, आणि त्यानें पेंजदे हें ठिकाण घेतलें. आणखी असें भय पडलें कीं, त्या वेळीं जर त्याशीं टक्कर देण्यास कंबर बांधिली नाहीं, तर, तो आणखी पुढें पुढें येऊन, हिंदुस्थानांतल्या इंग्लिश राज्यास कदाचित् भयप्रद होईल. हें अरिष्ट सामोपचारानें टळण्यासारखें नाहीं असें पाहून, तो विषय पार्लमेंटांत काढून, त्याविषयीं फार चांगलें भाषण ग्लाडस्टनांनीं इ० स० १८८५ ह्या वर्षीं केलें. तें पार्लमेंटाच्या मनांत इतकें भरलें कीं, त्यावर कोणी वादविवाद करण्यास उठला नाहीं, आणि त्या कृत्यास एक कोटि दाहा लक्ष पौंड खर्चण्याची मंजुरी त्यांनीं एकदम दिली. परंतु पुढें आपसांत समजाविशी झाली. त्यामुळें लढाईचा प्रसंग आला नाहीं.





# भाग पांचवा.

## नेपल्स आणि बल्गेरिया.

ज्याला ताप वसे अन्य शरीरांत परि सकळ कळतो,
करि साधु त्या अतिथिची आत्मकुटुंबाहि परिस कळकळ तो.

**मोरोपंत.**

रोगें प्रवासी पीडिले कारागृहीं जे कां अटकले,
ते ते सांभाळूनि भले क्लेशातीत करिसी कीं.

**मुक्तेश्वर.**



साधु पुरुष कोठेंही असोत, दुःखितांचें दुःख निवारण्याचा प्रयत्न करावा, हें त्यांचें मोठें ब्रीद असतें. ह्यास ते कधीं टळत नाहींत. अशा प्रकारचीं अनेक लहान मोठीं कृत्यें ग्लाडस्टन ह्यांच्या हातून झालीं आहेत. त्या सगळ्यांचें साद्यंत वर्णन करण्यास अवकाश नाहीं. तरी, त्यांतलीं ठळक एकदोन कृत्यें संक्षेपतः येथें सांगावीं हें बरें दिसतें. ह्यांतलें पहिलें कृत्य, इटलीच्या दक्षिण भागीं नेपल्स येथील राज्यव्यवस्थेच्या संबंधाचें होतें, आणि दुसरें कृत्य तुर्कसरकाराच्या अमलांतील बल्गेरिया प्रांताच्या संबंधाचें होतें. त्यांपैकीं प्रथम नेपल्स संबंधाची हकीकत सांगतों.

### नेपल्स.

इ. स. १८५० च्या अखेरीस ग्लाडस्टन ह्यांची एक लहान मुलगी आजारी पडली. तिच्या प्रकृतीस आरोग्य प्राप्त होण्यासकोठेंतरी, थारेपालटासाठीं, युरोपाच्या दक्षिणभागीं गेलें पाहिजे, असें वैद्यांचें ह्मणणें पडलें.

त्यावरून ग्लाडस्टन हे, सकुटुंब, इटलीच्या पश्चिमभागीं नेपल्स ह्मणून एक लहानसें मांडलिक राज्य होतें, तेथें जाऊन राहिले. तेथें त्या वेळेस दुसरा फर्दिनांद हा राजा राज्य करीत होता. त्याला, इंग्लंडांतल्याप्रमाणें पार्लमेंट होतें आणि सगळा कारभार, कागदोपत्रीं कायद्यांप्रमाणें चालत होता, असा बाह्यात्कारें दिसत होता. परंतु, आंत सगळा अंधेर होता. केवळ झोटिंगबादशाही चालली होती. राज्यव्यवस्थेंत लबाडी फार होती. सरकारी कामदार मनस्वी लांचखाऊ आणि दुराचरणी होते. त्यापासून रयतेस अतिशयित पीडा होई. ती त्यांस सोसेनाशी झाली, ह्मणजे ते लोक बंडें करीत. त्या बंडांचा मोड करण्यास राजा अत्यंत भयंकर उपाय योजी. अशा प्रकारें राजा आणि प्रजा ह्यांचें अगदीं विटलें होतें. त्याच्या योगानें तेथल्या मोठमोठ्या लोकांस देखील भयंकर दुःखें भोगावीं लागत. त्याचें थोडें विशेष स्पष्टीकरण करणें आवश्यक वाटतें.

दरबारांत ह्मणजे पार्लमेंटांत दोन पक्ष असत, एक प्रजापक्ष आणि एक राजपक्ष. प्रजापक्ष हा लिबरल होता, आणि राजपक्ष हा कान्सर्व्हेटिव होता. त्यांत, राजपक्षाच्या मंडळीस सगळ्या गोष्टी आपल्या मनाप्रमाणें कराव्याशा वाटत, ह्मणून आपल्या वतीनें बहुमत करण्याचा प्रयत्न ते करीत; परंतु, प्रजापक्षाची मंडळी पुष्कळ आणि चांगली सुशिक्षित असल्यामुळें, त्यांस आपल्या वतीचें बहुमत करण्यास वारंवार कठिण जाई. ह्मणून ते अशी युक्ति करीत कीं, प्रजापक्षाच्या मंडळींतल्या कोणावर कांहीं, कोणावर कांहीं, असे आरोप घालून, त्यांस पकडून नेऊन, वर्षांचीं वर्षें, चौकशी वगैरे कांहींएक न करितां, तुरुंगांत ठेवीत, आणि तेथें त्यांचे इतके हाल करीत कीं, त्यांच्या योगानें त्यांचा जीव त्यांस नकोसा होई. शिवाय कितीएकांस काळ्यापाण्यावर पाठवीत. ही गोष्ट केवळ पार्लमेंटाच्या सभासदांचीच नव्हती. तर, जे कोणी राजपक्षाविरुद्ध वागल्यासारखे दिसत, त्या सर्वांची अवस्था अशीच होत असे. ग्लाडस्टन तेथें गेले तेव्हां पार्लमेंटांतले बाहात्तर सभासद अशा प्रकारच्या आरोपांवरून बंदींत टाकिलेले होते, आणि शिवाय सुमारें वीस हजार लोक तसेच बंदींत घातले होते. आणि ह्या सग-

ल्यांस अहोरात्र अंधारकोठड्यांत कोंडून ठेवीत. तेथें उजेड किंवा हवा मुळींच जात नसे. शिवाय, त्यांच्या पायांत भल्या मोठमोठ्या बिड्या घालीत, आणखी खायास अन्न असें देत कीं, तें पुढें आल्याबरोबर एखाद्यास ओकारी यावी. ह्या माणसांत कितीएक मोठमोठे मुत्सद्दी, आणि शाहाणपणाविषयीं प्रसिद्ध असेही लोक असत. पण त्यांची दाद कोणी घेईना. तेथचे कायदे इंग्रजींतल्या कायद्यांसारखे होते. चोवीस तासांपेक्षां अधिक कोणताही कैदी न्यायाधिशापुढें उभा केल्याशिवाय राहूं नये, असा नियम कागदीं होता. पण त्यास कोणी जुमानीत नसे. आणि तसेंच आवश्यक वाटलें तर कांहीं तरी खोटा बाहाणा करून, त्यास न्यायाधिशापुढें नेल्यासारखें करून पुनः कारागृहांत ठेवीत असत. ह्याप्रमाणें ही भालेराई कितीएक वर्षें चालली होती, आणि सगळे लोक तिला अगदीं त्रस्त होऊन गेले होते—त्यांस दे माय धरणी ठाय असें झालें होतें.

ह्या गोष्टी सहजगत्या ग्लाडस्टन ह्यांच्या कानीं आल्या. त्यांच्या योगानें त्यांस अतिशयित वाईट वाटलें—त्यांचें पित्त खवळून गेलें. आणि आपणांस कळलें आहे तें खरें आहे कीं त्यांत कांहीं अतिशयोक्ति आहे, हें प्रत्यक्ष पाहण्याच्या हेतूनें त्यांनीं तेथल्या राजापाशीं, त्याचे तुरुंग पाहाण्याची परवानगी मागितली. ती त्या राजानें, भोळसरपणानें लागलीच दिली. त्या वेळीं त्या बापड्याच्या मनांत देखील असें आलें नाहीं कीं, ह्या पाहाणीचा परिणाम राजकारणापर्यंत पोंचेल. शिवाय, त्याच्या मनांत असेंही आलें असेल कीं, जशी स्थिति आपली आहे, तशी स्थिति, थोडीबहुत, फ्रान्स, जर्मनी, रशिया इत्यादि मोठ्या राष्ट्रांचीही आहेच. तेव्हां, ग्लाडस्टन ह्यांस तुरुंग पाहूं देण्यास आणि राजकीय कैदीस भेटूं देण्यास कांहीं हरकत नाहीं. त्याप्रमाणें, ग्लाडस्टन ह्यांनीं ते तुरुंग प्रत्यक्ष जाऊन पाहिले, आणि त्यावरून त्यांची खातरी झाली कीं, आपणांस जो प्रकार कळला आहे तो शब्दशः खरा आहे. तेव्हां तर त्यांस फार संताप आला, आणि त्यासरसा त्यांनीं त्या अरिष्टाचें निवारण करण्याचा यत्न करण्याचा निश्चय केला. वास्तविक पाहिलें असतां, ग्लाडस्टन हे कोठले,

आणि नेपल्स संस्थानांतले लोक कोठले! त्यांचा ह्यांचा कांहींएक संबंध नव्हता. हें आमचें पाहाणें झालें. पण ग्लाडस्टन हे साधु पुरुष होते. "उदारचरितानां तु वसुधैव कुटुंबकम्" ह्यांतले ते होते. त्यांस सगळीं माणसें भावंडें वाटत. तेव्हां नेपलसच्या लोकांचा कळवळा त्यांस आला ह्यांत कांहीं विशेष नाहीं.

होय. नेपल्सच्या संस्थानांतले अन्याय नाहींतसे करण्याची इच्छा ग्लाडस्टन ह्यांस झाली. पण, त्यांनीं काय करायाचें होतें! ते कांहीं राजे नव्हते. त्यांच्या जवळ कांहीं फौजफांटा नव्हता. आणखी, नेपल्सच्या राजानें ह्यांचें ऐकावें, असें ह्यांचें कांहीं नातें नव्हतें. तेव्हां आपण करावें काय, हें एक मोठें कोडें त्यांस पडलें असेल, असें वाचकांस वाटेल. परंतु, बुद्धिवानांस कांहींच कठिण नसतें. ग्लाडस्टन ह्यांस अशी एक उत्तम युक्ति सुचली कीं, तिच्या योगानें तें त्यांचें कार्य सहज सिद्धीस गेलें. त्याविषयीं एका ग्रंथकारानें असें ह्मटलें आहे कीं, जें काम राजास तोफांनीं आणि बंदुकांनीं करतां आलें नसतें, तें ग्लाडस्टन ह्यांनीं लेखणीनें केलें. तें असें.

त्या वेळीं महाराणीसरकाराचे मुख्य प्रधान ड्यूक आफ् अबर्डीन हे होते. त्यांस ग्लाडस्टन ह्यांनीं त्या क्रूरपणाविषयीं, अन्यायाविषयीं, आणि, लोकांच्या विपत्तीविषयीं दोन तीन तपशीलवार पत्रें लिहिलीं. तीं फार वाचण्यासारखीं आहेत. त्यांत आपल्या ह्मणण्याच्या समर्थनार्थ त्यांनीं कितीएक भयंकर उदाहरणें दिलीं आहेत. तीं वाचिलीं ह्मणजे आंगावर रोमांच उभे राहातात, आणि असें मनांत येतें कीं, अशा प्रकारच्या भयंकर संकटांपासून देवानें आपलें रक्षण केलें आहे, ही आपणावर केवढी तरी त्याची कृपा आहे! पहिलें पत्र ता० ७ एप्रिल १८५१ चें आहे.

त्यांत हा विषय हातीं घेण्यास आपला अधिकार कसा पोंचतो, तें प्रदर्शित करण्याकरितां, त्यांनीं, अगदीं साधे असे तीन सिद्धांत सांगितले आहेत. त्यांचा आशय असाः—१. नेपल्सचें सरकार खऱ्या अथवा कल्पित राजकीय अपराध्यांस ज्या रीतीनें वागवीत आहेत, त्या रीतीनें

धर्म, विद्याचारसंपन्नता, मनुष्यत्व, आणि शिष्टाचार ह्यांचा विध्वंस होत आहे. २. ह्या जुलुमामुळें, त्या देशांत प्रजासत्ताक राज्यबुद्धीचा अंकुर स्वतःसिद्ध नसतां त्याचें तेथें बीजारोपण होत आहे. ३. मी कान्सर्व्हेटिव पक्षापैकीं आहें, आणि हा पक्ष युरोपांतल्या संस्थापित राज्यांचा पक्षपाती असल्याकारणानें, त्यांपैकीं कोणत्याही राज्याचें वाईट होणें हें माझ्या कान्स-र्व्हेटिव पक्षास बाधक होणार आहे. ह्मणून, नेपल्सच्या अव्यवस्थेनें जी हानि होत आहे, ती इंग्लंडची आणि पर्यायेंकरून त्यांतल्या लोकांचीही हानि होत आहे. ह्मणून, तिच्या निवारणाचा उद्योग करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. असें सांगून मग त्यांनीं वर्णनास आरंभ केला आहे. त्या वर्णनांतल्या एक दोन गोष्टी सांगतों.

कार्लो पोइरिओ ह्या नांवाचा फार चांगला शिकलेला, संभावित चालीचा, आणि निर्मल आचरणाचा असा एक गृहस्थ होता. त्याचा बाप वकील होता. त्याचें वजन मोठें होतें. पण, तो जात्या मोठा सरळ, निर्भीड, आणि स्पष्टवक्ता असा असून, राज्यांतलीं सगळीं कामें अगदीं कायद्याप्रमाणें झालींच पाहिजेत, असें ह्मणणारा होता. तेव्हां, त्यांत न्यून पडलें कीं, त्यांस तो अवश्य नांवें ठेवायाचाच. हाच काय तो त्याचा दोष राजपक्षास वाटला. त्यांनीं त्याला पकडून, राजद्रोहाच्या आरोपावरून त्याची तीनदां चौकशी केली. शेवटीं त्याला दाहा वर्षेंपर्यंत कारागृहांत कोंडून ठेविलें होतें. तेथें त्यास अतिशयित क्लेश भोगावे लागले. त्याची दाद कोणीं घेतली नाहीं! शिवाय, त्याच्यासारख्या आणखी एकेचाळीस लोकांस धरून, त्यांवर नाना प्रकारचे निरनिराळे खोटे आरोप ठेवून त्यांची शाबिदी खोट्या पुराव्यांनीं करून, त्यांस शिक्षा देवविल्या, आणि तुरुंगांत घातलें. ग्लाडस्टन ह्यांनीं त्याविषयीं पुष्कळ बारकाईनें चौकशी केली. परंतु, त्यांजकडे काडीभरही अपराध त्यांस दिसला नाहीं.

ह्या बेचाळिसांत सेटेंब्रिनी ह्मणून दुसरा एक गृहस्थ, कार्लो पोइरिओ ह्याच्या सारखाच चांगला होता. त्याला फांशीची शिक्षा ठरली होती. पण, त्याला तसाच कारागृहांत लोंबत ठेविला होता. आणि तेथें त्याचे हाल

यमयातनांपेक्षांही अधिक दुःखपद चालविले होते. त्याच्या हाताच्या जिव्हाळ्यांत दाभण टोंचीत असत, आणि तें आंत आंत खुपशीत असत.

आठ आठ दहा दहा शेर वजनाच्या दोन दोन बेड्या एका एका कैदीच्या पायांत घातलेल्या असत. त्यांतल्या एका बेडीची एक सांखळी दुसऱ्याच्या कमरेंतल्या चामड्याच्या पट्ट्याला खिळलेली असे. ती अशी कीं त्या दोघांस फार तर एकमेकांपासून दोन तीन हात दूर जातां यावें. आणि ह्या बिड्या त्यांच्या पायांत अहोरात्र असत. तेव्हां, त्यांस उठतां बसतां, चालतां फिरतां, देहधर्मास जातां येतां किती अडचण होत असेल, किती त्रास होत असतील, आणि किती लज्जा वाटत असेल, त्याची कल्पनाच करावी! त्या कैदींस मनुष्यपणास मुकावें लागत होतें.

त्या राज्यांतल्या प्रोसिडा ह्मणून एका सुभ्यांतील तुरुंगांत असे पुष्कळ कैदी कोंडून ठेविले होते. त्यांस अतिशयित पीडा भोगावी लागे. ती त्यांस सहन न होऊन, त्यांनीं एकदां बंड केलें, आणि तुरुंग आपल्या स्वाधीन करून घेतला. त्याचा बंदोबस्त सरकारानें कसा केला! तेथल्या कैदींच्या मंडळीमध्यें लहान लहान ज्वालाग्राही पदार्थ भरलेले जळते गोळे टाकून देऊन कितीएक जणांस एका क्षणांत ठार मारून टाकिलें!

कैदी लोकांची कींव किती करीत होते! तुरुंगामध्यें अधिकारी वैद्य तिसऱ्या मजल्यावर बसायाचे. त्यांच्या जवळ, पाहिजे असल्यास, दोन जिने चढून, कैदींनीं जावें, आणि औषध मागावें! तें न होईल तर जागचे जागीं मरावें. डाक्टरसाहेब कैदीच्याजवळ यावयाचे नाहींत! कां कीं, कैदीची राहाण्याची जागा ह्मटली ह्मणजे गुरांचा गोठा पुष्कळ बरा, अशी असे.

असो. असें पुष्कळच वर्णन ग्लाडस्टन ह्यांनीं त्या पत्रांत केलें आहे. तें वाचून नेपलसच्या लोकांची कींव आली नसती, असा माणूस पृथ्वीच्या पाठीवर सांपडावयाचा नाहीं. मग, ती हकीकत ग्लाडस्टन ह्यांच्या धर्मशील, दयाळू आणि भक्तिमान् अंतःकरणास प्रचलित करण्यास समर्थ झाली, ह्यांत काय नवल आहे!

ग्लाडस्टन ह्यांचें दुसरें पत्र १४ जुलै १८५१ चें आहे. त्यांतही ह्या संस्थानांतल्या अव्यवस्थेविषयीं पुष्कळ लिहिलें आहे. आणखी त्यांत दुसरें एक असें दाखविलें आहे कीं, लहानपणापासून मुलांच्या मनांत आपणांस पाहिजेत तसे ग्रह ठसविण्याचा प्रयत्न तेथच्या राजपक्षी मंडळीचा चालला होता. त्यांत तशीं पुस्तकें शाळेंत शिकविणें हा एक उपाय होता. त्या पुस्तकांत पर्यायेंकरून असें स्थापित केलेलें असे कीं, राजा हा काय तो परमेश्वर, त्याच्या आज्ञा प्रजेनें हूं चूं न करतां मानिल्या पाहिजेत. त्यांत आपलें शाहाणपण चालवितां कामास नये. ह्मणजे, प्रजासत्ताक राज्याच्या कल्पनेचा जो कोठें बारीकसारीक अंकुर लोकांच्या अंतःकरणांत होता, तो समूळ नाहींसा करण्याचा तो प्रयत्न होता. त्याकरितां एक गुरुशिष्यसंवादाचें पुस्तक लहान मुलांस शाळेंत शिकवीत असत. त्यांतला एकच मासला येथें दाखवितों:—

**शिष्य**—राज्यामध्यें लोकांस कायदे करितां येतील काय?

**गुरु**—करितां यावयाचे नाहींत. कां कीं, कायदे ह्मटले ह्मणजे ते राजसत्ता मर्यादित करण्याकरितां ठरविलेले असावयाचे. आणि ती मर्यादा राजास मात्र करितां यावयाची आहे. असें नसतें तर, लोकांच्या कल्याणाकरितां ह्मणून जी महाशक्ति—राजसत्ता—परमेश्वरानें उत्पन्न केली आहे, ती सर्वांत श्रेष्ठ अशी राहिलीच नसती.

**शिष्य**—एकादी गोष्ट राजसत्तेस विरुद्ध होते, किंवा लोकसुखास बाधक होते, तेव्हां तिचा विचार करणें हें कोणाचें कर्तव्य आहे?

**गुरु**—तें राजाचें कर्तव्य आहे. कां कीं, देवानें ती मोठी शक्ति केवळ राजाचे ठायीं, निरंतर, देशाच्या कल्याणाकरितां ठेविली आहे.

अशा प्रकारें, अगदीं लहानपणापासून मुलांचीं मनें आपणांस पाहिजेत तशीं तयार करण्याचा प्रयत्न नेपल्स येथें राजकारस्थानी पुरुष करीत. परंतु हे त्यांचे प्रयत्न व्यर्थ होत असत.

असो. हीं पत्रें ग्लाडस्टन ह्यांनीं ड्यूक आफ् अबर्डीन ह्यांस पाठविलीं. तीं त्यांनीं, परकीय राष्ट्रांचे तेव्हांचे प्रधान लार्ड पामरस्टन ह्यांजकडे दिलीं.

आणि त्यांनीं तीं छापून सगळ्या इंग्लंडभर वांटलीं. एवढेंच केवळ नव्हे, तर, इंग्लिश सरकारच्या वतीचे जे वकील परकीय देशांतल्या दरबारांत होते, त्यांजकडे त्यांच्या प्रती पाठविल्या, आणि त्यांतला मतलब तेथल्या लोकांस कळे असें केलें. अशा प्रकारें नेपल्सच्या राज्यांत किती झोटिंगबादशाही होती, हें सगळ्या जगभर माहीत झालें. त्याविषयीं फार गवगवा झाला, आणि सगळीं समंजस माणसें नेपल्सची निंदा करूं लागलीं. हें नेपल्सच्या राजाच्या कानीं गेलें. तेव्हां त्याला अतिशयित वाईट वाटलें. त्याला तोंड वर करण्यास जागा नाहींशी झाली. सगळीं राष्ट्रें त्यास उघडपणें नांवें ठेवूं लागलीं. तेव्हां, शेवटीं, त्यानें त्यावर आपलें ह्मणणें काय होतें तें प्रगट करण्याचा प्रयत्न केला. त्याचा उपयोग झाला नाहीं. ह्या पत्रांच्या चौदाव्या आवृत्तीच्या पुस्तकाबरोबर एक परिशिष्ट छापिलें आहे. त्यांत एक उदाहरण दिलें आहे. तें असें. इ० स० १८५८ च्या डिसेंबर महिन्याच्या २७ व्या तारखेस सरकारचा हुकूम ९१ कैदींविषयीं असा सुटला कीं, त्यांस जन्मपर्यंत सिसिलीच्या हद्दपार करावें. त्यावर दरबारांतल्या मुख्य अधिकाऱ्यांचा हुकूम इ० स० १८५९ च्या जानेवारीच्या ९ व्या तारखेस सुटला कीं, त्या सगळ्यांस अमेरिकेस न्यावें. हे ठराव बाहेर पडण्याच्या अगोदरच त्यांतले सोळा असामी मरण पावले होते. त्यांची दाद नव्हती. बाकीच्यांतील ६६ असामींस अमेरिकेस रवाना करून दिलें, आणि अकरा असामींस तसेंच मागें तुरुंगांत ठेविलें. तें कशाकरितां? त्यांतले बहुतेक इतके दुखणाईत होते कीं, त्यांस जाग्यावरून हालवत नव्हतें. आणि कांहीं असामी प्रांतांतल्या तुरुंगांत नेपल्सशहरापासून फार अंतरावर होते. शेवटीं कांहीं बरे वाईट उपाय योजून, जितकी अंदाधुंदी मोडविली, तितकी त्या राजानें मोडिली. निरपराधी होते त्यांस प्रतिबंधमुक्त केलें आणि बाकीच्यांच्या अपराधांची चौकशी करून त्यांस योग्य शिक्षा दिल्या. अशा प्रकारें नेपल्सच्या राज्यांतला अन्याय ग्लाडस्टन ह्यांच्या पत्रांनीं बराच नाहींसा झाला. हें पुण्य लहान आहे काय?

ह्या पत्रांवरून हा एक उत्तम परिणाम झाला. परंतु त्यापासून ग्लाडस्टन

ह्यांस त्रासही सोसावा लागला. त्यांच्या शत्रूंनीं भलभलत्या कंड्या पिकविल्या. नेपल्सच्या बंडवाल्यांस आणि बदमाश लोकांस हे सामील आहेत, असें लोकांत केलें. इंग्लंडांत कितीएक वर्षांमागें—ह्मणजे महाराणी साहेब सिंहासनारूढ झाल्यावर लवकरच चार्टिस्ट ह्या नांवाची मंडळी निघाली होती. तिचें व्रत असेंच होतें कीं, दुःखितांचें दुःख निवारण करावयाचें, मग त्यांत कांहीं होवो. त्या मंडळीचा लौकिक चांगला नव्हता. कां कीं, त्यांत सगळ्या प्रकारचीं माणसें होतीं. त्या मंडळीचा अवशेष अद्याप कांहीं आहे



ग्यारिबाल्डी.

ह्मणतात. त्यांत ग्लाडस्टनांची गणना करूं लागले. त्याशिवाय, ग्लाडस्टन

ह्यांच्या प्रयत्नानें नेपल्सच्या लोकांवर होत असलेल्या अन्यायाचें निवारण झालें हें ऐकून, इंग्लंडांत, त्यांच्याकडे, पोल, हंगेरीयन, इटालियन, साक्सन, फ्रेंच वगैरे जे लोक तसे अन्याय आणि जुलूम भोगीत होते, त्यांच्या झुंडींच्या झुंडी येऊं लागल्या. तो ग्लाडस्टनांस एक मोठा तापच झाला. तथापि, त्यांनीं सर्वांची समजूत काढून,आणि गरीब होते त्यांस कांहीं थोडें बहुत द्रव्य देऊन वाटेस लाविलें.

पुष्कळ विचारी ग्रंथकारांचें ह्मणणें असें आहे कीं, ग्लाडस्टन ह्यांच्या प्रयत्नानें नेपल्स येथें जी ही सुधारणा झाली, ती, तेथील लोकस्थितीच्या उन्नतीस पुढें फार उपयोगीं पडली, आणि पुढें इटलीचें जें ऐक्य झालें, त्यास हा उद्योग पुष्कळ अंशीं साधनभूत झाला. स्वतः **ग्यारीबाल्डी,** ह्मणजे इटलींत मोठे नामांकित योद्धे आणि स्वदेशभिमानी पुरुष नुकते होऊन गेले, ह्यांनीं ह्याविषयीं असें ह्मटलें आहे कीं, "ग्लाडस्टनांच्या ह्या दुःखनिवारणपत्रांनीं इटलीच्या स्वातंत्र्याविषयीं प्रथमारंभीं शिंग फुंकलें." ग्यारिबाल्डी ह्मणजे इटलीच्या स्वातंत्र्याचे मुख्य धारण होते. त्यांचे हे शब्द ग्लाडस्टनांच्या कीर्तीस अत्यंत भूषणावह होत.

---

## बल्गेरिया.

युरोपामध्यें मुसलमानी राज्य काय तें तुर्कस्थानचें आहे. तेथल्या राजास सुलतान ह्मणतात. ह्या राज्याचा एक भाग बल्गेरिया ह्मणून आहे. त्याचें क्षेत्रफळ २४३६० चौरस मैल आहे, आणि लोकसंख्या ३१५४३७५ आहे. ह्यांत ख्रिस्ती लोकांची वसती पुष्कळ आहे. लोक अडाणी आहेत, तरी चांगले सशक्त आहेत. त्यांवर पाछा नांवाचे अधिकारी नेमून, तुर्कसरकारचा राज्याधिकार अगदीं कडक रीतीनें चालवीत असत, आणि तेथें अंदाधुंदी फार असे. त्यामुळें वारंवार बंडें होत. त्यांचा बंदोबस्त सरकारास करावा लागे. त्यांत लोकांच्या मालमत्तेची पुष्कळ हानि होऊन, जीवांचाही नाश होत असे. त्यामुळें सरकार आणि रयत ह्यांच्या मध्यें अगदींच सूत नाहींसें झालें होतें. असें कैक वर्षें चाललें

होतें. पण तिकडे कोणी पाहीना, कीं त्या अरिष्टाचें निवारण करीना. तें पाहून, इ० स० १८७५ च्या दिसेंबरच्या ३० व्या तारखेस आस्ट्रियाच्या दरबारचे प्रधान कौंट आंड्रासी ह्यांनीं एक सूचनापत्रक ह्या प्रकरणीं काढिलें. त्यावर आणखी जर्मनी आणि रशिया ह्या दरबारांच्या सह्या घेतल्या. तें सूचनापत्रक तुर्कस्थानच्या सुलतानांस पाठविलें. त्यांत मुख्यत्वेंकरून त्यांस एवढेंच ह्मटलें होतें कीं, तुह्मीं आपल्या राज्यांतला जुलूम नाहींसा करण्याविषयीं आणि लोकांची सुधारणा करण्याविषयीं जीं अभिवचनें आजपर्यंत दिलीं आहेत, त्यांतलें एकही अभिवचन पूर्ण केलें नाहीं. तीं अभिवचनें पूर्ण करावीं. हे तुह्मीं न केल्यास, युरोपांत शांतता राखण्याच्या हेतूस्तव, युरोपांतल्या दुसऱ्या राष्ट्रांस ह्या प्रकरणांत पडावें लागेल, आणि तुह्मांस तीं अभिवचनें पूर्ण करण्यास भाग पाडणें आवश्यक होणार आहे. ह्या सूचनापत्रावर इंग्लंडाची सही आरंभीं नव्हती. परंतु स्वतः तुर्कस्थानानें विनंति केल्यावरून इंग्लिश सरकार त्यांत मिळालें. ह्यांत मिळण्याविषयीं तुर्कस्थानानें आपण होऊन इंग्लंडास विनंती करण्यांतलें बीज एवढेंच होतें कीं, इंग्लंड हें आपलें जुनें साह्यकारी आहे, आपणावर त्याची कृपा आहे, तेव्हां, ह्या इतर राष्ट्रांबरोबर तें असल्यानें, त्याच्या वजनाच्या योगानें आपणावर फारशी सक्ती व्हावयाची नाहीं, असें त्यास वाटत होतें. हें सूचनापत्र तुर्कस्थानानें बाह्यात्कारीं फार आभारपूर्वक स्वीकारिलें, आणि त्यांत सांगितलेल्या सगळ्या गोष्टी करण्याचें कबूल केलें. पण, तें सगळें तेथेंच आटपलें. तुर्कस्थानच्या हातून त्याप्रमाणें कांहींएक झालें नाहीं. ही त्या सूचनापत्राची वाट लागली. पुढें बेन्‌जामिन् डिझरायली हे महाराणी सरकारचे मुख्य प्रधान असतां, ह्मणजे इ० स० १८७६ पासून इ० स० १८८० पर्यंत, ह्या प्रकरणीं अनर्थाच्या भयंकर बातम्या इंग्लंडांतल्या लोकांच्या कानीं गेल्या. त्यांची सत्यता पाहाण्याकरितां डेली न्यूज वर्तमानपत्रकर्त्यांनीं, माकगाहाम ह्या नांवाचा आपला एक बातमीदार त्या प्रांतांत बुद्ध्या पाठविला. त्यानें प्रत्यक्ष पाहून जें काय लिहून पाठविलें, तें आधीं कळलेल्या हकीकतीशीं अगदीं बरोबर

मिळालें. शिवाय बेरिंग ह्या नांवाचा एक गृहस्थ तिकडची स्थिति स्वतः दृष्टीनें पाहून हकीकत कळविण्याकरितां सरकारानें तिकडे धाडिला होता, त्याचेंही मत तसेंच पडून, त्याचें वर्णनही तसेंच आलें. तें वाचून लोकांच्या आंगावर कांटा उभा राहिला. त्यांतल्या धार्मिक आणि सुजाण लोकांस तर असें वाटलें कीं, ह्या अनर्थापासून त्या लोकांस सोडविणें हें आपलें—धर्मबंधु ह्या नात्यानें—कर्तव्यकर्म आहे. लोक त्याविषयीं पुष्कळ बोलत आणि लिहीत. परंतु मुख्य प्रधान डिझरायली आणि त्यांच्या पक्षाची मंडळी ह्यांस त्या भयंकर बातम्यांचें कांहींच वाटेना. ते त्या गोष्टी थट्टेवर नेत, आणि तो सगळा पोरखेळ समजत. लहानपणीं ते त्या देशांत फिरले होते, त्यामुळें त्या लोकांच्या हातून असें होईल, असें त्यांच्या मनांत येईना. पण, तें पुष्कळ ख्रिस्ती लोकांस बरें वाटेना. ह्या वेळेस लिबरल पक्षाचे पुढारी लार्ड हार्डिंगटन हे होते. त्यांसही ह्याविषयीं पुष्कळ वाईट वाटलें. परंतु ते जात्याच फार थंडे होते. त्यांचे ठायीं चलाखी मुळींच नव्हती. त्यांनीं फार तर पार्लमेंटांत बसल्या बसल्या प्रश्न केले असते, उत्तरें मागविलीं असतीं, आणि सूचना केल्या असत्या. परंतु त्यांनीं कांहींएक होण्यासारखें नव्हतें. हें जाणून, ग्लाडस्टन ह्यांनीं, आपला धर्मशास्त्राचा आवडता वाद आणि ग्रीस व रोम ह्यांच्या इतिहासांचा अभ्यास एकीकडे सारून हा बल्गेरियाचा विषय हातीं घेतला. आणि सगळ्या गोष्टी ग्लाडस्टन ह्यांस कळल्या तेव्हां त्यांस अतिशयित वाईट वाटलें, आणि त्यांनीं जागोजाग व्याख्यानें देऊन, हस्तपत्रकें काढून, आणि लहानमोठीं अनेक पुस्तकें लिहून, त्या विषयाविषयीं लोकांचीं मनें प्रचलित केलीं. तेव्हां लोक फार चवताळले. आतां, हा विषय त्यांनीं हातीं कां घेतला, ह्याचें कारण रसेल ह्या ग्रंथकारांनीं सांगितलें आहे. तें असें आहेः— ग्लाडस्टन हे दयाळु होते, आणि तुर्क लोक निर्दय होते. हे स्वतंत्रतादेवीचे भक्त होते, ते दास्याविषयीं परवा न करणारे होते. ह्यांस शांतता आवडत होती, त्यांना हाणामारीविषयीं कांहींच वाटत नव्हतें. ह्यांस विद्याचारसंपन्नतेची अभिवृद्धि प्रिय होती, त्यांस लोकांची सुधारणा कधीं स्वप्नांतही

दिसत नसे. आणखी ह्या सगळ्याच्या पलीकडचें आणि ह्या सर्वांपेक्षां मोठें कारण असें होतें कीं, ग्लाडस्टन हे ख्रिस्ती धर्माचे मोठे एकनिष्ठ अनुयायी होते, आणि तुर्क ह्मटले ह्मणजे ख्रिस्ती धर्मास अधर्म लेखणारे आणि ख्रिस्ती लोकांचा छळ करणारे होते. आणि ग्लाडस्टन ह्यांस असें वाटे कीं, हे ज्या ठिकाणीं उभे सुद्धां राहूं नयेत, त्या ठिकाणीं हे राजे होऊन आपला अंमल गाजवीत आहेत, आणि ख्रिस्ताची भक्ति करणाऱ्या लोकांचा छळ करीत आहेत,—ह्याचा बंदोबस्त केलाच पाहिजे. तेव्हां मग काय विचारावें? ग्लाडस्टन आणि त्यांचे अनुयायी हे सगळे ह्या संबंधानें लोकमत खवळावयास लागले. जिकडे तिकडे ह्या गोष्टी चालल्या, लंडन शहरांत सेंट जेम्सहाल ह्या ठिकाणीं लोकांची एक मोठी सभा भरली. तींत पुष्कळ लोकांनीं भाषणें केली. त्यांमध्यें ग्लाडस्टन ह्यांचें भाषण फार उत्तम झालें. तें लोकांच्या मनांत ठसलें. जस्टिन मेकार्थी ह्यांनीं ह्मटलें आहे कीं, "ग्लाडस्टन ह्यांचें इतकें उत्तम भाषण मीं पूर्वीं कधीं ऐकिलें नव्हतें." कार्लाइल हे विद्वान् गृहस्थ राजकीय खटपटींत कधीं पडावयाचे नव्हत, ते देखील ह्या वेळीं पुढें सरसावले. आणि त्यांनीं ह्या मोठ्या सभेस असें पत्र पाठविलें कीं, तुर्क सरकार आपल्या राज्यांतल्या आग्नेयीकडच्या प्रजेवर जो कडक अधिकार चालवीत आहे, त्या अधिकारापासून त्यांचें रक्षण करण्यास एवढाच उपाय आहे कीं, तुर्कांस तो अधिकारच चालवूं देऊं नये. त्याचप्रमाणें ह्याच सभेमध्यें, उलट पक्षास लक्षून प्रोफेसर फ्रीमन ह्मणाले कीं, "आमच्या तोंडांतून अन्यायाच्या वतीनें आणि न्यायाच्या विरुद्ध शब्द निघावा, अथवा आमच्या हातून असें एकादें कृत्य व्हावें, त्यापेक्षां इंग्लंडाची सर्वस्वी हानि झाली किंवा हिंदुस्थानांतल्या आमच्या राज्याचें कांहीं झालें तरी पुरवलें." ह्याप्रमाणें इकडे चाललें होतें, इतक्यांत पार्लमेंटाचे सभासद निवडण्याची वेळ जवळ आली. तिची वाटाघाट करतांना जो तो विचारी कीं, डिझरायली हे आतां लार्ड बीकान्सफील्ड झाले आहेत, ह्यांची परराज्यसंबंधाची जी रीति आहे, ती तुह्मांस आवडते काय? बल्गेरियांतल्या लोकांच्या क्लेशांची हे थट्टा करितात, तें

तुह्मांला आवडतें काय? त्याप्रमाणेंच ते तुर्क लोकांस लक्षून ह्मणत कीं, "बल्गेरियापासून तुह्मीं आपली खंडणी घ्यावी; तुह्मी त्यांचे प्रभु आहांत हें कायम राहावें; तुमच्या राज्यावर हल्ला होऊं नये; पण बल्गेरियांतल्या लोकांस तुह्मी छळूं नका." ह्या गोष्टी ऐकविण्याकरितां कान्स्टांटिनोपल येथें सभा भरविली होती. पण, तें ह्मणणें तुर्कस्थानास पसंत पडलें नाहीं. तेव्हां सगळें युरोपखंड तुर्कस्थानच्या विरुद्ध झालें. तिकडून रशियाचें सैन्य आलें, आणि इकडून इंग्लंडचें आरमार तुर्कस्थान आपल्या ह्मणण्याप्रमाणें वागण्यास तयार झाल्यास त्यास साह्य करायास ह्मणून गेलें. ह्या दोहोंच्या कचाटींत तुर्कस्थान सांपडलें. तेव्हां तें घाबरलें. त्यापासून रशियास जो पाहिजे होता तो थोडासा मुलूख मिळाला, आणि इंग्लिशांस सैप्रस बेट मिळालें. शिवाय, ह्या स्वारीकरितां इंग्लिश सरकारानें हिंदुस्थानांतलें सैन्य आणविलें होतें, त्याविषयीं पार्लमेंटांत पुष्कळ चर्चा झाली. हें इतकें झालें, तरी, तुर्कस्थानाच्या अन्यायकृतीचें निवारण तसेंच राहिलें. परंतु, अशा गोष्टी चालतां चालतां, कान्सर्व्हेटिव पक्षाविषयीं लोकांत मनस्वी चीड उत्पन्न झाली, आणि लिबरल पक्षाची सरशी होणार खचीत, असें सर्वांस वाटलें.

ही इकडे अशी तयारी होण्याच्या आधींपासूनच **प्रिन्स बिस्मार्क**, ह्मणजे जर्मनीच्या बादशाहांचे मुख्य प्रधान, ह्यांनीं असा विचार काढिला होता, कीं युरोपांतल्या सगळ्या मोठ्या राष्ट्रांच्या वतीच्या प्रतिनिधींनीं कोठें तरी एका ठिकाणीं जमावें, आणि, युरोपांत शांतता राहील असा एक विचार ठरवून त्याप्रमाणें वागावें. तें जमावें, किंवा न जमावें, जमावें कोठें, अध्यक्ष कोणीं व्हावें, ह्याविषयीं प्रथम पुष्कळ शंका निघाल्या, आणि वाद झाले. परंतु, त्या वेळीं प्रिन्स बिस्मार्क ह्यांचें प्रस्थ युरोपांत एवढें वाढलें होतें कीं, त्या संबंधाची जी योजना त्यांनीं केली, तीस ना ह्मणण्याची छाती कोणास नव्हती. सगळ्यांनीं त्यांची योजना मान्य केली. तींत असें ठरलें कीं, ती सभा इ० स० १८७८ ह्या वर्षाच्या जुलै महिन्याच्या १३ व्या तारखेस बर्लिन येथें भरावी, आणि तिचे अध्यक्ष प्रिन्स

बिस्मार्क हे व्हावे. तींत चार पांच विषय मुख्यत्वेंकरून निघावयाचे होते.



प्रिन्स बिस्मार्क.

तुर्कस्थानच्या अमलाखालीं केवळ नामधारित्वानें, जे प्रांत होते, त्यांच्या स्थितीचा विचार करणें, हा एक. तुर्कस्थानच्या खास अमलांत परधर्मी आणि परराष्ट्री लोक असतात त्यांच्या संबंधाचा विचार करणें, हा दुसरा विषय होता. ग्रीस देशाची सरहद्द वाढत चालली होती, तिच्या संबंधाचा विचार करणें, हा तिसरा विषय होता. त्याप्रमाणेंच ग्रीक लोक तुर्कस्थानच्या अमलांत होते, त्यांच्या संबंधाचा विचार हा चौथा विषय होता. आणि तुर्कस्थानाचा जो मुलूख आशिआखंडांत होता, त्याच्या स्थितीचा विचार करावयाचा, हा पांचवा विषय होता. ह्मणजे, एकंदर हेतु असा होता कीं, युरोपाच्या आग्नेयीकडे जी ख्रिस्ती प्रजा आहे, तिचें संरक्षण व्हावें, आणि तिची उन्नति व्हावी असें करावयाचें.

त्याप्रमाणें ती सभा प्रिन्स बिस्मार्क राहात होते त्या वाड्यांत भरली. तीस इंग्लंडच्या वतीचे प्रतिनिधि लार्ड बीकान्सफील्ड हे गेले होते. इकडे पार्लमेंट सभेचें काम चालू असतां मुख्य प्रधानांनीं बाहेर देशीं जाऊं नये, असा समज बहुत दिवसांपासून होता. तो ह्यांनीं ह्या वेळेस मोडिला.

त्यांच्या बरोबर त्या सभेस लार्ड साल्सबरी हेही गेले होते. मार्गामध्यें जागोजाग त्यांचा पुष्कळ सन्मान झाला. सभेमध्यें पुष्कळ राष्ट्रीय प्रकरणांचा विचार झाला. त्यांत बल्गेरियाचें प्रकरण निघालेंच होतें. त्याविषयीं सगळ्या सभासदांस ग्लाडस्टनांच्या लेखांवरून आणि भाषणांवरून माहिती झाली होती. आणि तेथल्या लोकांस संकटांतून काढायाचें, असा त्यांचा निश्चय झाला होता. त्याच्या योगानें, फार वादविवाद न होतां असें ठरलें कीं, १. बल्गेरिया हें राज्य वेगळें स्वतंत्र असावें, आणि तें तुर्कस्थानच्या सुलतानांचें मांडलिक असावें. तें राज्य ख्रिस्तीधर्मी असावें, आणि त्याचें लष्कर वेगळें असावें. २. बल्गेरियाच्या राजाची निवड लोकांनीं करावी, आणि तीस तुर्कस्थानच्या सुलतानांची संमती मिळावी, ती युरोपांतल्या इतर राजांच्या अनुकूलतेनें मिळावी. ३. युरोपांतल्या सध्याच्या दंडधारी कोणत्याही राजकुलांतला राजा निवडितां कामास नये. ४. गादी रिकामी पडल्यास, पूर्वीं सांगितल्याप्रमाणेंच निवड होऊन, तिला संमति आणि अनुकूलता मिळाली पाहिजे. ह्याप्रमाणें व्यवस्था झाली. आणि आतां बल्गेरियाचे प्रजानन स्वस्थपणें व्यापारधंदे करून आनंदांत कालक्रमणा करीत आहेत. त्याप्रमाणेंच रोमानिया, सर्व्हिया आणि मौंटिनीग्रो हीं संस्थानें एरव्हीं स्वतंत्र असावीं, पण त्यांचे धर्मसंबंधीं हक्क बरोबरीचे असावे, असें ठरलें. मौंटिनीग्रोला एक बंदर आणि त्याच्या भोंवतालचा कांहीं प्रदेश मिळाला. पूर्वरोमेनियावर गव्हरनर ख्रिस्ती असावा, आणि सरहद्दीवरच्या बंदोबस्तास सुलतानांनीं सर्कासियन वगैरे लोक ठेवूं नयेत. तुर्कस्थान आणि ग्रीस ह्यांच्या मधला सरहद्दीचा वाद जो होता तो, तुर्कस्थानचे सुलतान आणि ग्रीसचे राजे ह्यांनीं सौम्यपणें एकमेकांशीं विचार करून मिटवावा. पण, तसा जर तो त्यांस मिटवितां आला नाहीं, तर, युरोपांतल्या मोठ्या राष्ट्रांनीं बहुमतानें काय योग्य तें ठरवावें, आणि त्याप्रमाणें उभयपक्षांनीं वागावें. ह्मणजे, एकंदरीनें, युरोपाच्या आग्नेयीभागीं जी ख्रिस्तीधर्मी प्रजा आहे, तिचें स्वातंत्र्य—आणि त्यांत विशेषेंकरून धर्मस्वातंत्र्य—ह्यांचें रक्षण व्हावें, आणि स्वतंत्रपणें उन्नतीच्या मार्गात त्यांचें पाऊल पुढें पुढें पडत जावें, हा



ग्लाडस्टन, इ० स० १८७८.　　　　　पृ. ९०.

हा मुख्य रोख ह्या सभेचा होता, असें दिसतें. हें सगळें फल ग्लाडस्टन ह्यांच्या उद्योगाचें होतें. हा विषय त्यांनीं हातांत घेतला, ह्मणूनच त्याची अशी चांगली तड लागली. हिच्या योगानें बल्गेरियावर त्यांचे केवढे उपकार झाले आहेत बरें!

ह्या सभेमध्यें एक गोष्ट इंग्लिश राष्ट्रास भूषणावह अशी झाली. ती ही कीं, ह्या सभेच्या कामास प्रिन्स बिस्मार्क ह्यांनीं आरंभ केला, तो इंग्रजींत बोलून केला. वास्तविक ह्मटलें असतां, अशा सगळ्या युरोपियन राष्ट्रांतल्या प्रतिनिधींच्या सभेंत फ्रेंच भाषेंत अवलपासून अखेरपर्यंत काम चालावयाचें. परंतु, पुष्कळांचा अजमास असा झाला कीं, त्या वेळेस लार्ड बीकान्सफील्ड ह्यांचें फ्रेंच भाषेचें अवलोकन जरा कमी झालें होतें, ह्मणून, त्यांच्या सोईकरितां प्रिन्स बिस्मार्कांनीं हा प्रकार केला असावा. हा एकंदर इंग्लंडाच्या लौकिकास भूषणावह आहे. असो.

ह्याप्रमाणें तिकडे बर्लिनचा तह आटोपल्यावर, तिकडची मंडळी परत आली. त्या वेळीं लार्ड बीकान्सफील्ड ह्यांचा फार मोठा सन्मान लंडनच्या लोकांनीं केला. कां कीं, त्यांनीं त्या सभेंत फार मोठें आणि फार चांगलें काम केलें, असें त्यांस वाटलें. स्वतः लार्ड बीकान्सफील्ड ह्यांसही आपण कृतकार्य झालोंसें वाटलें, तें साहाजिकच होतें. त्यांनीं सरकारच्या कचेरीच्या खिडकींत उभें राहून, खालीं जमलेल्या हजारों लोकांस लक्षून एक मोठें भाषण केलें. त्यांत त्यांनीं ह्मटलें कीं, ह्या ठरावांच्या योगानें आह्मीं "**शांति आणि सन्मान**" हीं बरोबर आणिलीं आहेत. आणि तें खरें होतें. एकंदरींत, त्या सभेमध्यें लार्ड बीकान्सफील्ड ह्यांच्या शब्दांस इतरांच्या पेक्षां पुष्कळ मान मिळाला. एवढा प्रताप त्यांनीं पूर्वीं कधीं केला नव्हता. आणखी ह्या वेळीं सगळ्या जगांत असें झालें कीं, प्रिन्स बिस्मार्कांच्या खालोखालचे राजकार्यधुरंधर पुरुष ह्मटले ह्मणजे लार्ड बीकान्सफील्ड हे आहेत. इतर लोकांस असें वाटलें ह्यांत कांहीं विशेष नव्हतें. स्वतः प्रिन्स बिस्मार्क ह्यांस कोणीं एकदां असें विचारिलें कीं, बर्लिनच्या राजकारणसभेंत पहिल्या प्रतीचा राजकारणी पुरुष कोण होता. त्यास

त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, "पहिल्या प्रतीचा कोण होता, हें मी सांगत नाहीं. पण लार्ड बीकान्सफील्ड हे दुसऱ्या प्रतीचे होते खचीत." असो. पुढें लागलीच पार्लमेंटाच्या सभासदांची निवड झाली. तींत, ग्लाडस्टन ह्यांच्याविषयीं जो उत्तम ग्रह लोकांत झाला होता, त्याच्या योगानें लिबरल पक्षाची मंडळी इतकी निवडली गेली कीं, तिच्या पुढें कान्सर्व्हेटिवपक्षाची मंडळी मुळींच निस्तेज झाली—ती मुळींच निर्बल झाली ह्मटल्यासही चिंता नाहीं. तेव्हां अर्थातच, लार्ड बीकान्सफील्ड ह्यांचा पक्ष अगदीं लंगडा पडला. त्याकरितां, त्यांनीं पार्लमेंट भरण्याच्या आधींच मोठ्या शाहाणपणानें आपल्या मुख्य प्रधानकीच्या जागेचा राजीनामा देण्याचा विचार मनांत आणिला. त्याशिवाय त्यांस दुसरा उपायच नव्हता. त्यांनीं राजीनामा दिल्याबरोबर, नियमित रीतीप्रमाणें, महाराणी सरकारांनीं लार्ड हार्टिंगटन ह्यांस मुख्य प्रधान होण्याकरितां बोलावून नेलें. ते ह्मणाले कीं, लार्ड ग्रानव्हिल ह्यांस विचारून येतों. नंतर, ते उभयतां, ह्मणजे लार्ड हार्टिंगटन आणि लार्ड ग्रानव्हिल हे तारीख २३ एप्रिल रोजीं, महाराणी सरकारांकडे विंडसर किल्ल्यांत गेले. त्या दोघांनींही त्यांस असें सांगितलें कीं, ह्या वेळेस सगळा विजय काय तो ग्लाडस्टन ह्यांचा आहे. लिबरल पक्षास ते पुढारी मिळाल्यावांचून त्यास बरें वाटावयाचें नाहीं. तेव्हां अर्थात् मुख्य प्रधानही तेच झाले पाहिजेत. तेथून निघून ते तिसऱ्या प्रहरीं लंडन शहरीं आले, आणि ग्लाडस्टन ह्यांस जाऊन भेटले. तेव्हां ते त्यांची आणि राणी सरकारांच्या निरोपाची वाटच पाहत होते. ते लागलेच त्याच दिवशीं सायंकाळीं महाराणी साहेबांच्या दर्शनास गेले, आणि मुख्य प्रधानाचीं वस्त्रें मिळवून आले. ही मुख्य प्रधानकीची त्यांची दुसरी कारकीर्द होती. आणि हीस मुख्य कारण ग्लाडस्टन ह्यांचा बल्गेरियासंबंधाचा उद्योग होता. अथवा, ह्यांचे प्रतिपक्षी डिझरायली ह्यांच्या मांद्यानें ह्यांस ह्या उच्च पदावर पुनः येणें भाग पडलें असें ह्मणावें.

---



# भाग साहावा.



## ऐरलंडाच्या संबंधाचीं कामें.

साधु प्राणी पाहुनि संसारी तापले असुख पावे
व्हावें जग मुदित ह्मणे तद्दुःखे आपुले असु खपावे.

**मोरोपंत.**

परोपकारा शरिर झिजावें जैसा मैलागिरि चंदन.

**अनंतफंदी.**



ऐरलंड हें बेट ग्रेटब्रिटनाच्या पश्चिमेस आहे. ह्या दोहोंच्या मध्यें एक लहानशी खाडी मात्र आहे. मागचा इतिहास फारच लांबट आहे. तो सांगण्याच्या भरीस आह्मी पडत नाहीं. परंतु, एवढेंच सांगतों कीं, इ० स० १८०१ ह्या वर्षी ऐरलंड आणि ग्रेटब्रिटन ह्यांचीं पार्लमेंटें एक झालीं. त्याच्या योगानें ऐरलंडाला कांहीं सुख वाटलें नाहीं. एवढेंच केवळ नव्हे, तर ग्रेटब्रिटनाच्या राज्याधिकारास ऐरलंड त्रासल्यासारखें झालें. तें कोणत्या कारणानें ह्याचें थोडें दिग्प्रदर्शन केलें पाहिजे.

ऐरलंडांत तीन प्रकरणांच्या संबंधानें घोंटाळा चालला होता. **धर्मखातें, जमीनबाब,** आणि **शिक्षणपद्धति.** ह्यांपैकीं धर्मखात्याची गोष्ट अशी होती कीं, ऐरलंडांतल्या लोकांतले पांचषष्ठांश लोक रोमन क्याथोलिक पंथाचे आहेत, आणि अवघे एकषष्ठांश लोक प्राटेस्टंट पंथाचे—ह्मणजे इंग्रज सरकारचा जो पंथ आहे, त्या पंथाचे आहेत. असें असतां, तेथलें मोठें थोरलें सगळें धर्मखातें प्राटेस्टंट पंथाचें ठेविलें होतें. त्याला लक्षावधि रुपये खर्चास लागत, ते देशाच्या उत्पन्नांतून देत; ह्मणजे, पैसा खरचे क्याथोलिकपंथाच्या

लोकांचा, पण त्यांला लाभ कांहींएक होत नसून, सगळा फायदा कायतो प्राटेस्टंटांचा होत असे. हें क्याथोलिक लोकांस सहन होत नसे. ते सरकारापाशीं नेहमीं तक्रार करीत असत—अर्ज पाठवीत असत—आणि प्रसंग आले ह्मणजे हा अन्याय बोलून दाखवीत असत. परंतु त्यांच्या बोलण्याकडे कोणी लक्ष देईना. त्यामुळें लोक सरकारावर नाखूष असत.

जमीनबाबींत तर विलक्षण जुलूम होता. ऐरलंडांत शेतकी हा धंदा फार मोठा आहे. त्या देशांत मोठमोठे जमीनदारच पुष्कळ आहेत. ते आपल्या जमिनी, कांहीं मक्ता ठरवून कुळांस लावून देत असत. आणखी शेतकी हें निर्वाहाचें मुख्य साधन तेथें असल्याकारणानें जमिनीवर उडी फार असे. पण, त्या संबंधाचें सगळें सूत्र जमीनदारांच्या हातीं असे. ह्मणजे, जमीनदार मागेल ती रकम द्यावी एक, किंवा शेत सोडून देऊन निघून जावें एक, अशी स्थिति कुळांची होती. जमीनदारापासून कुळानें अगदीं ओसाड पड जमीन कांहीं मक्ता ठरवून घ्यावी, तींत मेहेनत करून, आणि पैसा खरचून चांगलें पीक येईल असें त्यानें करावें, आणि जमीनदारानें मक्ता पाहिजे इतका चढवावा, आणि तो कुळानें न दिल्यास झालेल्या मेहेनतीबद्दल आणि खर्चाबद्दल कांहींएक मोबदला न देतां, त्याला जमिनींतून हुसकून लावावें—असे प्रकार चालत असत. सरकार ह्यांत मुळींच हात घालीत नसे. त्यामुळें कुळांस उपासमारीची पाळी येई. तेव्हां जमीनदार आणि कुळें ह्यांचे तंटे होत. कधींकधीं मोठमोठे दंगे होत. सगळा घोंटाळा होऊन जाई, व्यापारधंदा चालेना, लोकांस उद्योग सुचेना, आणि त्यामुळें त्यांस अतिशयित विपत्ति भोगावी लागे. नाहीं ह्मणायास अल्स्टर जिल्ह्यांत मात्र असा प्रकार नाहीं. तेथें कुळाला बराच अधिकार आहे. जोंपर्यंत कूळ ठरलेला धारा देत आहे, तोंपर्यंत त्यास त्याच्या जमिनींतून काढण्यास जमीनदारांस अधिकार नाहीं, आणि मक्ता चढविण्यास अधिकार नाहीं. शिवाय त्यानें आपली जमीन, जमीनदारांच्या सल्ल्यानें, दुसऱ्या एखाद्या कुळास विकण्यास हरकत नसते. ह्मणजे, तें नवें कूळ जमीनदारास ठरलेला मक्ता देतें. आणखी, कारणपरत्वें कुळास

जमीन सोडावी लागल्यास, त्या जमिनींत त्यानें ज्या काय सुधारणा पदरचा पैसा खरचून केल्या असतात, त्यांचा मोबदला त्यास जमीनदारांकडून मिळतो. अशी वहिवाट आज कितीएक वर्षांपासून चालली आहे. ती लोकांस फार सुखावह झाली आहे. तिच्या योगानें तेथें इतर व्यापारधंदेही फार उत्तम रीतीनें चालून देशाची आबादानी आहे. तसें इतर जिल्ह्यांत नव्हतें.

ह्या प्रकरणीं देशामध्यें जबरदस्त वाद असे. कोणी असें ह्मणत कीं, जमीनदार हे आपल्या जमिनींचे मालक आहेत; त्यांनीं त्या जमिनी, पाहिजे त्यांस, पाहिजे त्या मक्त्यानें, पाहिजे तेव्हां द्याव्या, त्यांत सरकारच्या कायद्याचें काम नाहीं. दुसऱ्याचें मत असें होतें कीं, जमीनदार जरी आपल्या जमिनींचे मालक झाले, तरी त्या मालकीस कांहीं मर्यादा पाहिजे आहे. खाणींचे मालक, गिरण्यांचे मालक, आगगाड्यांचे मालक, हे सगळे आपापल्या कारखान्यांचे मालक असतात—धनी असतात—तरी, त्यांच्या धनीपणास मर्यादा असते, आणि त्यांस सरकारच्या कांहीं नियमांस मान्य होऊन चालावें लागतें. त्याप्रमाणें ऐरलंडच्या कामांतही कांहीं नियम पाहिजेत आहेत, आणि ते त्यांनीं पाळिले पाहिजेत. कां कीं, हा सार्वजनिक खटला आहे. हेंच मत बरोबर आहे.


पार्नेल.

असें असतां, सरकार तिकडे लक्ष पुरवीत नाहीं, असें पाहून तो जुलूम नाहींसा करण्यास कांहीं पुढारी लोक तयार झाले. त्यांनीं त्याकरितां एक सभा काढिली. तिच्या मुख्यांत प्रमुख **पार्नेल** हे एक होते. त्या सभेनें कुळांस असें शिकविल्याचा आरोप होता कीं, तुह्मी जमीन सोडूं नका, आणि कांहीं खटले चालले होते त्यांचे निकाल होतपर्यंत मक्ता देऊं नका, जमीनदार काय करतात पाहूं. तशी मंडळी तयार झाली. जमी-

नदारांस कुळें मुळींच जुमानीनात. पण जीं कुळें मागच्या वहिवाटीप्रमाणें चालत—ह्मणजे त्या सभेचें मत मानीनात, त्यांस त्या सभेचे लोक त्रास देत—त्यांचीं घरें जाळीत, आणि गुरें ठार मारीत, आणि त्या लोकांस धान्य, कपडा किंवा दुसरें कांहींएक सामान व्यापाऱ्यांनीं विकत देतां कामास नये, अशी बंदी करीत. तेणेंकरून पूर्वींच्या रीतीनें वागणाऱ्या कुळांचे मनस्वी हाल होत असत. आणि देशांत सगळा धुमाकूळ माजत असे. तो इतका कीं, सरकारास त्यांत मध्यें पडावें लागून, चौकशीशिवाय कोणाही माणसास चोवीस तासांपेक्षां अधिक वेळ प्रतिबंधांत ठेवायाचें नाहीं असा जो **हीबियस कार्पस** ह्मणून एक कायदा आहे, तो एकीकडे ठेवून लोकांस एकदम धरून कितीएक दिवसपर्यंत तसेंच तुरुंगांत ठेवावें लागत असे. ह्या सभेचे पुढारी पार्नेल होते, तरी, अशी दांडगाई करावी, असें त्यांचें मत मुळींच नव्हतें. ते पार्लमेंटाचे सभासद होते. आणि त्यांच्या मनांत असें होतें कीं, कायदेशीर रीतीनें पार्लमेंटांत काम चालवून त्यांजकडून कायदा करून घ्यावा. त्यांची वक्तृत्वशक्ति चांगली होती. तीविषयीं ग्लाडस्टन ह्यांनीं एकदां असें ह्मटलें होतें कीं, "जें काय बोलावयाचें असतें, तें अगदीं थोडक्यांत बोलावें, एक शब्दही अधिक बोलूं नये, असें बोलण्याचें सामर्थ्य पार्नेल ह्यांस आहे." त्याप्रमाणेंच, ते स्वदेशाच्या हितासाठीं कायावाचामनेंकरून झटत होते, तें त्यांस फार पसंत वाटत होतें. आणखी ऐरलंडचा कळवळा लोकांच्या मनांत जास्त भरण्यास त्यांचे प्रयत्न कारणभूत झाले होते. तरी, त्या दांडगाईंत त्या सभेचें आंग असावें, अशा संशयावरून पार्नेल आणि त्यांचे दोन मित्र ह्यांजवर खटले झाले होते, आणि इ० स० १८८१ च्या आक्टोबरांत त्यांस धरून तुरुंगांत ठेविलें होतें. तें प्रकरण पुष्कळच आहे. त्याचें कथन करण्यास येथें जागा नाहीं. असो.

तिसरा गोंधळ लोकशिक्षणाचा होता. ह्मणजे, ऐरलंडांत मुख्य विश्वविद्यालयें दोन होतीं; एक डब्लीन युनिव्हर्सिटी, आणि एक क्वीन्स युनिव्हर्सिटी. हें दुसरें विद्यालय आलीकडे स्थापित झालेलें होतें. डब्लीनचें

विश्वविद्यालय जें होतें, तें फक्त प्राटेस्टंटपंथाच्या लोकांस मात्र परीक्षा घेऊन पदव्या देत असे; आणि ह्मणून तें क्याथोलिकांच्या मुळींच उपयोगीं पडत नसे. आणि क्वीन्स युनिव्हर्सिटीमध्यें धर्मशिक्षण मुळींच नव्हतें, त्यामुळें तेंही क्याथोलिक पंथाच्या लोकांच्या उपयोगीं पडत नव्हतें. ह्मणजे एकंदरींत, ऐरलंडांतल्या पांचषष्ठांश लोकांच्या शिक्षणाची एकसारखी आबाळ चालली होती. तीमुळें त्या लोकांस अतिशयित वाईट वाटत होतें.

अशा प्रकारें ऐरलंडाची विपत्ति कितीएक वर्षांपासून चालली होती. तिचें निवारण करण्याचे प्रयत्न पुष्कळ चांगल्या चांगल्या लोकांनीं पुष्कळ केले. परंतु, कांहीं उपयोग झाला नाहीं. तें दुःख निवारण्याचें यश ग्लाडस्टन ह्यांच्याकरितां राखून ठेविलें होतें, असें दिसतें. ह्या अरिष्टांचें निवारण त्यांनीं कसें केलें, तें आतां थोडक्यांत सांगतों.

प्रतिनिधींच्या सभेमध्यें हा विषय एकदां पुढें येऊन त्याच्या संबंधानें पुष्कळ भवति न भवति झाली. ग्लाडस्टन ह्यांचें भाषण फार उत्तम झालें. त्याच्या शेवटीं ते ह्मणाले, "जर आपण खरोखर न्यायवर्ती आहोंत, तर आपण सत्य आणि सत्कर्म ह्यांची कांस दृढ धरिली पाहिजे, आणि अंतःकरणांत नेहमीं असें वागविलें पाहिजे कीं, सिद्धता परिपूर्ण होऊन समय प्राप्त झाला असूनही, न्यायाचें आवश्यक कृत्य आपण केलें नाहीं—तें कानामागें टाकिलें—तर आपण न्यायानें वागण्यास कबूल नाहीं, असें होतें." नंतर इ० स० १८६८ च्या मार्च महिन्याच्या तिसाव्या तारखेस ग्लाडस्टन ह्यांनीं अशी सूचना केली कीं, ऐरलंडांतलें धर्मखातें हें तेथल्या प्रजाजनांच्या उपयोगीं पडत नाहीं, ह्याकरितां, तें ह्यापुढें सरकारी खर्चानें बिलकूल चालवूं नये. त्यास कांहीं दिवस जाऊं देऊन शेवटीं मतें घेतलीं. तेव्हां ३३१ मतें ग्लाडस्टन ह्यांच्या पक्षाकडे पडलीं, आणि २७० त्यांच्या विरुद्ध पडलीं. ह्मणजे त्यांना ६१ मतें अधिक मिळालीं, तेव्हां अर्थात्‌च सभेच्या बहुमतानें ऐरलंडांतलें सरकारी खर्चाचें धर्मखातें बंद झालें. त्याचें पुष्कळ लोकांस फार वाईट वाटलें. स्वतः महाराणीसरकारास देखील तें आवडलें नाहीं. त्या बिशप विलबरफोर्स ह्या धर्माध्यक्षांपाशीं त्याविषयीं ह्मणाल्या,

"काय करावें! ग्लाडस्टनांनीं ऐरलंडाच्या धर्मसंस्थेचें असें करून टाकलें. ह्याचें फार वाईट वाटतें." इतर कितीएक लोकांनीं तर त्यांवर अपशब्दांची लाखोलीच वाहिली!

हें धर्मखात्याचें प्रकरण शेवटास लावल्यावर ग्लाडस्टन ह्यांनीं ऐरलंडाच्या जमीनबाबीचें प्रकरण हातीं घेतलें. त्यांत काय जुलूम होत होता, तें वर सांगितलेंच आहे. हें प्रकरण चांगलें समजून घेण्यास त्यांना पराकाष्ठेचे श्रम पडले. तो विषय त्यांनीं पार्लमेंटांत काढून त्याविषयीं भाषण केलें. तेव्हां तो जुलूम लोकांच्या मनांत भरला. त्या विषयाच्या विरुद्ध फारसें कोणी बोलले नाहींत. त्याविषयींच्या कायद्याचा मसुदा ग्लाडस्टन ह्यांनीं इ० स० १८७० च्या फेब्रुआरी महिन्याच्या दाहाव्या तारखेस पार्लमेंटांत सादर केला. त्यावर पुष्कळ भवति न भवति होऊन, दोन्ही सभांत तो मंजूर होऊन, आगष्टच्या पहिल्या तारखेस त्याला राणीसरकाराची संमति मिळाली. त्या कायद्यावरून कुळास बरेच हक्क मिळाले. त्यांत हा हक्क मुख्य होता कीं, कुळानें शेतामध्यें आपल्या श्रमांनीं आणि आपल्या खर्चानें कांहीं सुधारणा केली असल्यास, आणि तें शेत त्याला सोडावयाचा प्रसंग आल्यास, त्या सुधारणेकरितां त्याचा जो खर्च झाला असेल, त्याचा अंश त्याला मिळावा. त्या एवढ्या एका कायद्यानें त्या प्रकरणाची पूर्णता झाली नाहीं, आणि त्या संबंधाचा गोंधळ तसाच चालू राहिला. त्याविषयीं विचारी आणि न्यायी इंग्लिश लोकांस फार वाईट वाटे, आणि त्यांतलें खरें काय तें समजून घेण्याविषयीं ते प्रयत्न करीत. जनरल गार्डन—ह्मणजे जे गृहस्थ चैनीज गार्डन ह्मणून प्रसिद्ध होते—ते ऐरलंडांतली लोकस्थिति पाहाण्यास इ० स० १८८० च्या अखेरीस त्या देशांत गेले होते. त्यांनीं आपल्या पत्रांत लिहिलें आहे कीं, "ऐरलंडाचा नैऋत्य भाग मीं पाहिला, आणि ऐरलंडांत स्वस्थता राहाण्याच्या संबंधानें विचार केला. त्यावरून मला असें वाटतें कीं, जमीनदारांचें ह्मणणें कुळांनीं ऐकलें पाहिजे, अशा प्रकारच्या अर्धवट कायद्यांनीं कांहींएक व्हावयाचें नाहीं." ह्यांचें ह्मणणें असें होतें कीं, ऐरलं-

डाच्या त्या भागांतली जमीन सरकारानें विकत घ्यावी, आणि ती नियमित धाऱ्यानें कुळांस वाहायास द्यावी, ह्मणजे सगळी बंडाळी मोडेल. आणखी बाकीच्या ऐरलंडाच्या भागांविषयीं सूचना अशी होती कीं, “सरकारच्या कामदारांच्या सल्ल्यानें जमिनीची किंमत ठरवून, त्या किंमतीच्या मानानें जमीनदारांनीं कुळांस जमिनी द्याव्या, असें करावें. मीं वर सांगितला आहे, त्या भागांतल्या लोकांची स्थिति फार वाईट आहे. मला वाटतें, ते लोक आमच्यासारखेच आहेत. ते इतके सोशीक आहेत कीं, त्याविषयीं सांगितलें तर कोणास खरें वाटायाचें नाहीं. तसे ते राजनिष्ठ आहेत. परंतु, आपण गुरें सुद्धां बांधणार नाहीं, अशा जागीं राहून उपासमरीनें ते इतके वैतागले आहेत कीं, त्याचें वर्णन करवत नाहीं. अशा विषयाची थट्टा करणें किंवा तो हंसण्यावर नेणें हें फार वाईट आहे.” हें त्यांचें ह्मणणें लोकांच्या मनांत भरलें होतें, आणि ऐरलंडाची कांहीं व्यवस्था लावण्यास जनरल गार्डन ह्यांस त्या देशावर कांहीं दिवस नेमावें, अशी सूचना पार्लमेंटांत देखील कोणीं केली होती. परंतु, तिकडे कोणीं लक्ष दिलें नाहीं. पुढें सरकारानें इ० स० १८८१ ह्या वर्षी दुसरा एक कायदा केला. त्या वेळीं ग्लाडस्टन ह्यांनीं आपल्या भाषणाच्या शेवटीं पार्लमेंटांत ह्मटलें, “महाराज, न्याय हा आपला मार्गदर्शक आधार असावा. श्रद्धा ही मृत्यूपेक्षां बलिष्ठ आहे ह्मणतात, त्याप्रमाणें न्याय हा लोकांच्या आवेशापेक्षां बळकट आहे, प्रासंगिक क्रोधापेक्षां बळकट आहे, आणि मनांत भरलेल्या


जनरल गार्डन.

पुरातन दंतकथांपेक्षां बळकट आहे. ह्या न्यायाच्या मार्गांत आपण चाललों ह्मणजे आपलें कांहीं चुकावयाचें नाहीं. न्याय हा देवाकडचा प्रकाश आहे. त्या प्रकाशांत चाललों ह्मणजे आपणांस कशाचें भय नाहीं. ह्या मार्गांत आपण एकएक पाऊल पुढें पुढें जाऊं, तसतसे आपण कार्यसिद्धीच्या जवळ जवळ भिडूं. त्यांतल्या विघ्नांनीं जरी एकादे वेळीं आपल्या गतीस थोडाबहुत प्रतिबंध केला, तरी, तो क्षणिक होणार आहे. त्याच्यानें कार्यसिद्धीस तिळमात्रही आड येववावयाचें नाहीं." ह्या भाषणाचा ठसा सभासदांच्या मनावर चांगला वठला. आणि तेणेंकरून ह्या कायद्यास कोणी आड आला नाहीं. त्या कायद्यानेंही कुळाचा पुष्कळ फायदा झाला. त्यांत विशेष हा झाला कीं, शेताचा मक्ता कुळानें काय द्यावा, हें ठरविण्याकरितां एक वेगळें कोर्ट स्थापिलें. त्याप्रमाणेंच शेतांचे धारे ठरविले. आणि ती धाऱ्यांची रकम कूळ जमीनदारास देत आहे तोंपर्यंत त्या कुळाच्या हातून ती जमीन काढण्याचा अधिकार जमीनदारास नाहीं, असें करून टाकलें. त्याप्रमाणेंच कुळाच्या मनांत ती जमीन दुसऱ्या कोणास विकायाची आल्यास, त्यानें ती खुशाल विकावी, आणि त्या दुसऱ्या माणसास आपलें कूळ ह्मणून, तो त्या शेताचा ठरलेला धारा देईपर्यंत, जमीनदारानें कबूल केलेंच पाहिजे, असें झालें.

आतां राहिला विषय एक, विश्वविद्यालयांचा. त्यांतली अडचण काढून टाकावी, असें ग्लाडस्टन ह्यांच्या मनांत फार होतें.—आणि त्याची त्यांनीं खटपटही पुष्कळ केली. त्यांच्या मनांत असें आलें कीं, ह्या संबंधाचा जो बखेडा आहे, तो केवळ धर्मपंथांतल्या भेदावरून पडलेला आहे. त्या पक्षीं धर्माच्या संबंधाचे सगळे वादग्रस्त विषय त्या विश्वविद्यालयांच्या शिक्षणक्रमांतून अजीबात काढून टाकावे, आणि ज्यांविषयीं वादाचा गंधही नाहीं, असे मात्र विषय त्यांनीं हातीं घेऊन आपलें काम चालवावें; आणखी, सगळ्या ऐरलंडास एक मुख्य विश्वविद्यालय असून बाकीचीं विद्यालयें त्याच्या शाखा अशा चालाव्या, असा त्यांचा बेत होता. तो त्यांनीं पार्लमेंटांत प्रगट केला. परंतु त्याचा चमत्कार असा झाला कीं, तो बेत कोणासच पसंत

पडला नाहीं. जो तो त्याला नांवें ठेवूं लागला, आणि त्यावरून ग्लाडस्टन ह्यांच्या विरुद्ध पुष्कळ लोक भलभलतें बोलूं लागले. तेव्हां, अद्याप त्याचा वेळ आला नाहीं, असें मनांत आणून, ग्लाडस्टन ह्यांनीं तो उद्योग तितकाच राहूं दिला. तेव्हां त्याविषयीं त्यांस फार वाईट वाटलें. तरी त्याचा पिच्छा त्यांनीं अगदींच सोडून दिला नाहीं. नाना प्रकारच्या युक्तींनीं ती अडचण दूर करण्याचा विचार त्यांच्या मनांत मधून मधून घोळतच असे. त्यापुढें त्यांच्यानें दुसरें कांहीं झालें नाहीं; तरी, डब्लीनच्या विश्वविद्यालयामध्यें धर्मसंबंधीं विषयांची जी परीक्षा होत असे, ती, फासेट यांजकडून उद्योग करवून बंद केली. तेव्हां त्यांना असें वाटलें कीं, सगळें काम करायाचें होतें तें नाहीं साधलें, पण त्यांतलें थोडेंतरी साधलें, तेवढेंच. सत्कार्य, मग तें अल्प कां होईना, त्यापासून परोपकारी माणसांस आनंद झाल्यावांचून राहात नाहीं.

ह्या सगळ्यांपेक्षां एक मोठें ऐरलंडाचें काम ग्लाडस्टन ह्यांनीं हातीं घेतलें होतें. तें कोणतें तर त्यास **होमरूल** देण्याचें. त्यांत होमरूल ह्मणजे काय हें आधीं सांगितलें, ह्मणजे पुढचें सगळें प्रकरण सहज कळेल. होमरूल ह्मणजे देशाचा राज्यकारभार स्वतंत्रपणें चालविण्याकरितां वेगळें पार्लमेंट देणें. ऐरलंडांत धर्मखातें, लोकशिक्षण, जमीनबाब इत्यादिकांच्या संबंधानें लोक असंतुष्ट आहेत. त्यांचे दंगे नेहमीं चालत असतात. ते, सरकारास नानाप्रकारचे सक्तीचे कायदे करून मोडावे लागतात. त्यामुळें उभयपक्षीं अतिशयित त्रास होतो. आणि तो त्रास दिवसानुदिवस वाढत चालला आहे. असें पाहून, ऐरलंडांतल्या कांहीं लोकांनीं असें मनांत आणिलें कीं, आपल्या देशास वेगळें पार्लमेंटच मागून घ्यावें, ह्मणजे हा त्रास चुकेल. कां कीं, ह्या पार्लमेंटाचे सगळे सभासद ऐरलंडांतले असतील, आणि ते ऐरलंडांतल्या लोकांच्या इच्छेप्रमाणें राज्यव्यवस्था चालवितील. तेणेंकरून लोकांस तक्रारीचें कारण राहाणार नाहीं. त्या कार्याकरितां एक मंडळी स्थापित झाली, आणि तिनें आपलें ह्मणणें इंग्लंडांतल्या पार्लमेंटास ऐकविलें. तें त्यांतल्या ऐरिश सभासदांस तर मान्य झालेंच, पण, कितीएक

दुसऱ्या उदार आणि थोर मनाच्या सभासदांसही तें पटलें. तेव्हां, पार्लमेंटांत एक लहानसा होमरूलपक्ष तयार झाला. त्याला बाकीची मंडळी विरुद्ध होती. तिचें ह्मणणें असें होतें कीं, ऐरलंडाला अशी वेगळी पार्लमेंटसभा दिल्यानें तितकें इंग्लिश राज्याचें महत्व आणि श्रेष्ठत्व कमी होईल, ह्मणून तें सर्वथैव होऊं द्यावयाचें नाहीं. ह्या पक्षाचे ग्लाडस्टन असावे, असा पुष्कळ लोकांचा समज पुष्कळ दिवसपर्यंत होता. परंतु, हा ग्रह बरोबर नव्हता. ऐरिश लोक निकरावर आले आहेत, त्यांच्या पक्षाचे लोक पार्लमेंटांत चढत चालले आहेत, आणि त्यांची कांहीं चांगली तजवीज लाविली नाहीं तर त्यांची कृति त्यांच्या स्वतःच्या नाशास आणि इंग्लंडाच्या अपकीर्तीस खचीत खचीत कारणीभूत होणार आहे, असें त्यांस कितीएक वर्षांपासून वाटत होतें, तें त्यांनीं तसेंच गुह्य ठेविलें होतें. तरी, इ. स. १८८४ ह्या वर्षीं पार्लमेंटाचे सभासद निवडण्याच्या संबंधानें कांहीं नियम करून, ह्या पुढच्या कार्यास त्याचें फल उपयोगीं पडावें, अशी योजना त्यांनीं केली होती; आणि पार्लमेंटांत तत्पक्षी सभासद वाढले होते, हें त्याचेंच फल होतें ह्मणतात. अशी सगळी सिद्धता झाल्यावर स्वराजनिष्ठापूर्वक इंग्लिश राज्याच्या औदार्याचा लौकिक वाढविण्याकरितां, आणि विपत्तिग्रस्त ऐरलंडास संकटांतून मुक्त करण्याकरितां, ग्लाडस्टन ह्यांनीं, मोठमोठे मित्र नको नको ह्मणून सांगत असतां, सिंहासनारूढांची, लोकांची, इष्टमित्रांची, आपल्या लौकिकाची, किंबहुना आपल्या जीविताचीही परवा न करतां, इ. स. १८८४ ह्या वर्षीं आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. त्यांनीं, सगळ्या लोकांस संबोधून, एक लेख प्रसिद्ध केला. त्यांत आरंभीं पुष्कळ कोटिक्रम करून, शेवटीं असें ह्मटलें कीं, "इंग्लंडच्या गादीचें श्रेष्ठत्व राखणें, राज्यांत ऐक्य ठेवणें आणि त्या ऐक्याच्या संरक्षणार्थ पार्लमेंटाचा अधिकार कायम ठेवणें, हें लोकांच्या प्रत्येक प्रतिनिधीचें अत्यंत आवश्यक आणि मुख्य कर्तव्य आहे. हें लक्षांत ठेवून, ह्या कर्तव्यास मनापासून जागून, जर ह्या राज्याच्या कांहीं भागांस स्वतःचे कारभार चालविण्याचे अधिकार दिले, तर त्यांपासून भय तर कांहींच नाहीं, पण तें भयनिवारणाचें




एडिनबरोतील ग्लाडस्टन ह्यांचीं स्वारी, १८८३. पृ. १०३.

एक मोठें उत्तम साधन होईल. आणि त्याच्या योगानें राज्यामध्यें ऐक्य, सुख आणि बल ह्यांची अभिवृद्धि होईल. आणखी मी खचीत सांगतों कीं, हें कर्तव्य करण्याचें सामर्थ्य आंगीं असतां, जो कोणी माणूस, ग्रेटब्रिटन आणि ऐर-लंड ह्यांच्यामध्यें न्यायनीतीचें ऐक्य करण्याचा प्रयत्न करणार नाहीं, अथवा तसें ऐक्य मुळींच हाणून पाडण्यास किंवा मागें हटविण्यास खटपट करील, त्याच्या नांवास इतिहासामध्यें कालिमा लागल्याशिवाय राहाणार नाहीं." ह्याप्रमाणें ग्लाडस्टन हे प्रसिद्धपणें होमरूलपक्षाचे झाले. आणि त्यांनीं, ऐरलंडास होमरूल देण्याविषयीं कायद्याचा मसुदा इ० स० १८८६ च्या एप्रिलच्या ८ व्या तारखेस कामन्ससभेंत सादर केला. त्यांत असें होतें कीं, ऐरलंडास पार्लमेंट वेगळें असावें. त्यांत दोन भाग असावे. वरचा भाग ह्मणजे लार्डांची सभा. तींत २८ सरदारमानकरी असावे, आणि पंचाहत्तर सभासद, दाहा वर्षांच्या मुदतीनें नेमलेले लोकांनीं निवडलेले असावे. खाल-च्या ह्मणजे कामन्ससभेंत, पूर्वींच्या कायद्यांत ठरल्याप्रमाणें १०३ सभासद असावेच, आणि शिवाय आणखी १०१ सभासद, पांच वर्षांच्या मुदतीचे, लोकांनीं निवडावे. आणखी, एकंदर सगळ्याच्या खर्चाचा एकद्वादशांश ऐरलंडकडून घेत असत, तो पुढें एक पंध्रांश घ्यावा.

त्या दिवशींच्या सारखी कामन्ससभा पूर्वीं कधीं भरली नव्हती. त्या सभेविषयीं साधारण सर्व लोक आणि पार्लमेंटाचे सभासद फारच उत्सुक झाले होते. सभास्थानांत जागा धरण्याकरितां सभासद पांच साहा तास आधीं येऊं लागले. कितीएक तर दरवाजे उघडण्याच्या आधींच त्यांस पाठ लावून बसले होते. आणि ज्यांस बांकावर जागा मिळाली नाहीं, त्यांनीं, मध्यें मध्यें खुर्चा मांडून जागा धरून ठेविल्या. पन्नास पाउणशें लोकांनीं तर आपलीं जेवणें तेथें आणविलीं. सज्जे, पडव्या, इत्यादिकांवर मंडळीची इतकी गर्दी झाली कीं, तेथें पाऊल ठेवण्यास जागा नव्हती. सभागृहाबाहेर सहस्रावधि तमासगीर जमा झाले होते. ग्लाडस्टन आले, तेव्हां त्यांस पाहून लोकांनीं त्यांच्या नांवानें मोठा जयशब्द केला. ते आपल्या

जागीं येऊन बसल्यावर कांहीं लोक खेरीज करून लिबरलपक्षी सभासदांनीं, उभें राहून संतोषशब्दानें पुनः पुनः त्यांचें अभिनंदन केलें. त्या वेळचें ग्लाडस्टनांचें भाषण त्या समयास योग्य असेंच उत्कृष्ट झालें. आपले विचार त्यांनीं सभेस उत्तम प्रकारें स्पष्ट करून सांगितले. ते एकसारखे साडेतीन तास बोलत होते. त्यांत, ऐरलंडाच्या राज्यकारभाराकरितां डब्लीन येथें वेगळी पार्लमेंटसभा कशी असावी, तिचा अधिकार ऐरलंडावर किती चालावा, ऐरलंडावर अधिकार इंग्लंडाचा किती असावा, आणि त्याच्या योगानें ऐरलंडास स्वास्थ्य कसें प्राप्त होईल, आणि इंग्लंडाचें आधिपत्य कायम राहून त्यास मोठेपण कसें मिळेल, हें सगळें उत्तम रीतीनें प्रतिपादन केलें. त्यांत मुख्य गोष्ट ही होती कीं, इंग्लंडांतल्या पार्लमेंटाशीं ऐरलंडाचा कांहींएक संबंध ठेवावयाचा नाहीं. आणि ऐरिश लोकांस हेंच पाहिजे होतें. ह्मणून त्या भाषणानें ते फार संतुष्ट झाले, आणि तत्पक्षी सभासदांच्या मुद्रा टवटवीत दिसूं लागल्या. तें भाषण चाललें होतें तोंपर्यंत सगळी सभा आश्चर्यचकित होऊन चित्रासारखी बसली होती. नंतर उभयपक्षीं भाषणें झालीं. त्यांत लिबरलपक्षी कितीएक लोकांस तो विचार आवडला नाहीं. ह्मणून ते लागलेच उलट पक्षाचे होऊन, त्याच्या विरुद्ध बोलले. त्यांचे सगळेच आक्षेप कांहीं पोरकट नव्हते. ऐरलंडाला पार्लमेंट वेगळें दिल्यावर, इंग्लंड, स्काटलंड आणि वेल्स ह्या देशांत ऐरिश प्रजा आहे, तिच्या वतीचें बोलणें कोठल्या पार्लमेंटांत व्हावयाचें ? तसेंच ह्या तीन देशांतल्या रोमन क्याथोलिकपंथाच्या लोकांचा कैवार कोणत्या पार्लमेंटानें घ्यावयाचा ? ऐरलंडावर कर बसविण्याचा अधिकार इंग्लंडांतल्या पार्लमेंटाच्या हातीं राहावयाचा, आणि त्यांत ऐरलंडाच्या वतीचे सभासद मुळींच नसावयाचे—कर बसविणें आणि लोकमत हीं सख्खीं भावंडें बरोबर जोडीनें चालावयाचीं, त्यांची फाटाफूट होऊं द्यावयाची नाहीं—हें इंग्लिश राज्यव्यवहाराचें मुख्य सूत्र कसें कायम राहावयाचें ? अशा अनेक आक्षेपांवर अनेकांचीं पांडित्यें झालीं. त्यांत जान ब्रैट हे होते. त्यांनीं त्या वेळीं असें भाषण केलें कीं, त्याच्या योगानें पुष्कळ

सभासदांचीं मनें ग्लाडस्टन ह्यांविषयीं अगदीं दूषित होऊन गेलीं. मध्यरात्रीच्या सुमारास ग्लाडस्टन हे उत्तरें देण्याकरितां उभे राहिले, आणि शेवटीं मोठ्या गंभीर स्वरानें सभासदांस लक्षून ह्मणाले, "महाराज, आह्मांला वाटतें कीं लोकांचीं मनें आमच्याकडचीं आहेत, आणि आमचा असा विश्वास आहे कीं, आमचे हेतु पुरविण्याचें अभिवचन भविष्यकाळानें आह्मांस दिलें आहे. आपणांकडे ओहोट वळत चालला आहे, आणि आह्मांकडे भरती येण्यास आरंभ झाला आहे. महाराज, ऐरलंड आपणांपुढें उभें राहिलें आहे. तें हात जोडून आपणांपाशीं एक मागणें मागत आहे, आणि तें आपण त्यास द्याल अशी त्याला फार आशा लागली आहे. आशेची निराशा करूं नका. त्याचें जें ह्मणणें आहे, तें अगदीं खरें आहे, आणि मोठ्या नेमस्तपणाचें आहे. त्याचें ह्मणणें असें आहे कीं, कृपा करून, माझे सगळे अपराध पोटांत घाला, आणि मला पदरीं घ्या. ह्या ह्मणण्यांत ऐरलंडाचें जें काय हित आहे, त्यापेक्षां इंग्लंडाचें हित अधिक आहे, असें मला वाटतें. एक वरप्रसाद तें मागत आहे तो वरप्रसाद दिल्यानें आपला मोठा लौकिक जगामध्यें होऊन कोणाचीही हानि न होतां, ऐरलंडास शांतीची, उन्नतीची आणि सुखाची प्राप्ति होणार आहे, ही त्याची प्रार्थना आहे. मी आपणांस हात जोडून एवढीच विनंति करितों कीं, आपण सुज्ञ आहांत, तर, हा मसुदा नामंजूर करण्याच्या आधीं, सगळ्या गोष्टी मनांत आणून, शाहाणपणानें, पुरता विचार करा, पुरता विचार करा. हा विचार क्षणिक नव्हे आहे; तर हा विचार वर्षानुवर्षांचा किंवा युगानुयुगांचा आहे, हें विसरूं नका. महाराज, चांगला विचार करा." इतका कंठशोष करून ग्लाडस्टन ह्यांनीं त्या सभेस नानाप्रकारें समजून सांगितलें, पण त्याचा कांहींएक उपयोग झाला नाहीं. मंडळीच्या मनांत जी आढी पडली होती, ती कांहीं निघाली नाहीं. शेवटीं, तो मसुदा दुसऱ्यानदां वाचण्याच्या मंजुरीविषयीं जुलैच्या सातव्या तारखेस मतें घेतलीं. तेव्हां ३१३ अनुकूल पडलीं आणि ३४३ प्रतिकूल पडलीं. तेव्हां अर्थातच, तो मसुदा बहुमतानें—३० मतें अधिक प्रति-

कूलाकडे पडल्यामुळें—नामंजूर झाला. ३४३ प्रतिकूलांमध्यें त्र्याण्णव सभासद लिबरलपक्षाचे होते. इतके हे लोक ग्लाडस्टनांचा पक्ष सोडून ह्या मसुद्यापुरते, प्रतिपक्षास जाऊन मिळाले. त्याचें ग्लाडस्टनांस मोठें आश्चर्य मात्र वाटलें, परंतु वाईट वाटलें नाहीं. कां कीं, त्यांची दृष्टि नेहमीं कर्तव्याकडे असे; आणि त्यांतलें यशापयश ते देवावर सोंपीत असत. सत्कर्म करावयाचें, परंतु कर्मफलाशा ठेवायाची नाहीं, असें त्यांचें व्रत होतें. असो.

ह्या सगळ्याचा परिणाम असा झाला कीं, ग्लाडस्टन आणि त्यांचे अनुयायी ह्यांनीं पार्लमेंटसभा बरखास्त केली, आणि नवी निवड करण्याविषयीं सगळ्या राष्ट्रास प्रार्थना केली. त्या वेळीं, ह्या मसुद्याच्या संबंधानें लिबरलपक्षाविषयीं लोकमनें दूषित झालीं होतीं, त्याच्या योगानें, लिबरलपक्षाकडची मंडळी ऐरलंडाच्या संबंधानें तेवढी, कान्सर्व्हेटिव पक्षास अनुकूल होऊन, नव्या पार्लमेंटाकरितां, ३९३ कान्सर्व्हेटिव आणि २७५ लिबरल—ह्मणजे लिबरलांपेक्षां कान्सर्व्हेटिव ११८ अधिक—अशी निवड झाली. तेव्हां, अर्थात्च लिबरलपक्षास जयाची आशा नाहींशी होऊन, त्यांनीं दरबारच्या कामाचे राजीनामे दिले. ह्याप्रमाणें ग्लाडस्टन हे आपलें मुख्य प्रधानगिरीचें काम आणि त्यांचे अनुयायी आपापलीं दुसरीं कामें सोडून मोकळे झाले. आणि त्यांच्या जागीं कान्सर्व्हेटिव प्रधानमंडळ विराजमान झालें.

ग्लाडस्टन ह्यांनीं आपल्या मुख्य दिवाणगिरीच्या कामाचा राजीनामा दिला, तेव्हां महाराणी सरकारांनीं लार्ड साल्सबरी ह्यांस बोलावून त्यांस मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें दिलीं. ह्याप्रमाणें, लिबरलपक्षी प्रधानमंडळ जाऊन कान्सर्व्हेटिवपक्षी प्रधानमंडळ पुनः दरबारांत प्रबळ झालें; आणि ग्लाडस्टन विरुद्ध पक्षाचे अग्रगण्य झाले.

असें झालें, तरी, पार्लमेंटांत ऐरंलडाच्या वतीचा पक्ष चांगला प्रबल होता, आणि त्याचें काम, पार्नेल ह्यांच्या प्रमुखत्वानें, चांगलें चाललें होतें. परंतु, त्या पक्षाच्या दुर्दैवानें ह्मणा कीं कसेंही ह्मणा, एक विलक्षण गोष्ट घडून, त्या फळींत फूट पडली, आणि ती त्या पक्षाच्या अतिशयित अश-

क्ततेस कारणभूत झाली. तिची हकीकत अशी. ओशिआ ह्मणून एक गृहस्थ पार्नेल ह्यांचे मित्र होते. त्यांच्या पत्नीच्या संबंधानें पार्नेल ह्यांवर लोकापवाद आला. तो विकोपास जाऊन त्याचें सरकारदरबार झालें. त्यांत तो आरोप पार्नेल ह्यांवर शाबीद होऊन, त्या बाईनें आपल्या पहिल्या नवऱ्याशीं घटस्फोट करून, पार्नेलांशीं विवाह केला. ह्याविषयीं लोकांत अतिशयित चर्चा झाली. तींत, पार्नेलपक्षपाती कांहीं लोक असें धरून बसले कीं, हा सगळा प्रकार खासगत वर्तणुकीचा आहे, ह्याचा विचार सार्वजनिक कामांत करूं नये, आणि चाललें आहे तसें त्यांजकडे प्रमुखत्व चालूं द्यावें. दुसऱ्यांचें ह्मणणें पडलें कीं, झालेल्या प्रकाराचें विस्मरण लोकांस होईपर्यंत पांच चार महिने तरी पार्नेल ह्यांनीं पार्लमेंटापासून दूर राहावें, हें आवश्यक आहे. ह्यांतल्या पहिल्यानें सांगितलेल्या पक्षाकडे स्वतः पार्नेल होते. पण तो पक्ष अगदींच लहान होता. आणि दुसरा चांगला मोठा होता. तीच दुफळी माजली, आणि ऐरलंडाचें काम एके बाजूस राहून, ते पोटपक्षच एकमेकांशीं झगडूं लागले. पार्नेल हे रागीट होतेच, आणि त्यांत ह्या अपवादानें ते फार चिडले होते. त्यांनीं एक मोठा थोरला जाहीरनामा आपल्या सहीनें काढिला, आणि त्यांत प्रतिपक्षाच्या लोकांस–ग्लाडस्टनांसुद्धां सर्वांस–शिव्यांची लाखोली वाहिली. ती पाहून सगळ्या चांगल्या मंडळीस पराकाष्ठेचें वाईट वाटलें. आणि तितकेंच पार्नेल ह्यांचें माथें फिरून जाऊन, ते, पिसाळल्यासारखे होऊन, हिंड सगळ्या देशभर, भरीव सभा, दे व्याख्यानें, छाप हस्तपत्रकें, आणि लिही पुस्तकें असें करीत सुटले. हें चांगलें नव्हे, ह्याचा परिणाम कोणत्याही प्रकारीं चांगला व्हावयाचा नाहीं, असें त्यांच्या मित्रांनीं त्यांस पुष्कळ सांगितलें, आणि आतां तुह्मी थोडी विश्रांति घ्या असें पुष्कळ आग्रहानें ह्मटलें. त्यावर त्यांनीं ह्मणावें आतां "विश्रांति, शेवटीं!" असे जीवापाड श्रम केल्याच्या योगानें त्यांची प्रकृति अतिशयित क्षीण झाली, त्यांस दुखणें झालें, आणि त्यानें ते इ. स. १८९१ च्या आक्टोबरांत मरण पावले. तेव्हां ते अवघे ४५ वर्षांचे होते. त्यांच्या मरणाची वार्ता ऐकून ग्लाडस्टन ह्यांस

फार वाईट वाटलें. कां कीं, ते कर्ते पुरुष होते, अशी त्यांची पक्की खातरी झाली होती. ह्मटलें आहे कीं,

**कामेंचि बुडविलें जग तें ऐकावेंहि न व्यसन कानें.**

**मोरोपंत.**

तरी ग्लाडस्टन आणि त्यांची कांहीं निवडक मंडळी ह्यांनीं त्या विषयाचा पिच्छा सोडिला नाहीं. देशांत फिरून, जागोजाग सभांमध्यें भाषणें करून, आणि लहानमोठीं पुस्तकें लिहून, त्या विषयाच्या ग्राह्यत्वाविषयीं लोकांचीं मनें वळविण्याचें त्यांचें काम एकसारखें चाललेंच होतें. त्यांत त्यास बराच त्रास सोसावा लागला. तरी त्यांनीं त्यास न जुमानितां, तो उद्योग एकसारखा साहा वर्षें चालविला. तेव्हां ऐरलंडाविषयींचा न्याय लोकांच्या मनांत उतरून, त्यास होमरूल देणें आवश्यक आहे, असें त्यांस वाटूं लागलें.

पुढें अशाच कांहीं उलटापालटी होऊन ग्लाडस्टन पुनः महाराणीसरकाराचे मुख्य प्रधान झाले. आणि त्यांनीं इ. स. १८९३ च्या फेब्रुवारी महिन्याच्या १३ व्या तारखेस **होमरूल**चा मसुदा थोडा सुधारून पार्लमेंटापुढें आणून त्याविषयीं दोन तास भाषण केलें. त्या सभेस नामदार प्रिन्स आफ् वेल्स, ड्यूक आफ् यार्क, परकीय दरबारांचे अनेक वकील, लार्ड असे मोठमोठे लोक आले होते. आणि ग्लाडस्टन काय ह्मणतात तें ऐकण्यास उत्सुक झाले होते. ह्या नव्या मसुद्यांत आणि इ० स० १८८६ च्या मसुद्यांत मुख्य अंतर एवढेंच होतें कीं, इ० स० १८८६ च्या मसुद्याप्रमाणें इंग्लंडांतल्या पार्लमेंटांत ऐरलंडाच्या वतीचे सभासद मुळींच ठेवण्याचे नव्हते, आणि ह्या नव्या मसुद्यांत, ऐरलंडाच्या वतीचे ८० सभासद इंग्लंडच्या पार्लमेंटांत राहूं द्यावयाचे होते. पण, केवळ ग्रेटब्रिटनाच्या संबंधाचे जे विषय असतील, त्यांच्या विषयीं त्यांचीं मतें मुळींच घ्यावयाचीं नाहींत, असें केलें होतें. हा मसुदा २१ एप्रिलच्या दिवशीं दुसऱ्यानदां वाचला. त्या वादाच्या शेवटीं ते मोठ्या उंच स्वरानें सभेस ह्मणाले, "महाराज, इकडे पहा, ह्या बेटांत राहाणाऱ्या एका प्रकार-

च्या लोकांच्या हिताचें नव्हे, तर सगळ्या प्रकारच्या लोकांचें हित ज्या कृत्यांत आहे असें माझें मन मला सांगतें, तें कृत्य मला साध्य असतां तें करण्यास जर ह्या माझ्या उतारवयांत टाळिलें असतें, तर, त्यानें माझ्या मनाला टोंचटोंचून खाल्लें असतें. आणखी हे सगळ्या प्रकारचे लोक सत्ता आणि सुख ह्यांच्या संपादनार्थ ऐक्यानें प्रयत्न करीत आहेत. त्या सर्वांच्या वतीनें मी असें ह्मणतों कीं, महाराज, मागचें आतां कांहीं मनांत आणूं नका, मागचें सगळें विसरून जा. अंतःकरणांत प्रेम ठेवा, आणि पुढें आपणां माणसांच्या व्यवहारांत जीं काय संकटें येतील, त्यांत परस्परांस हात देण्याविषयीं आणि एकमेकांस सांभाळण्याविषयीं सद्बुद्धि धरा. त्यांत उभयपक्षांचें कल्याण आहे." तेव्हां लोकमत वळून त्याला प्रतिकूलांपेक्षां अनुकूल मतें ४३ अधिक मिळालीं. तो मसुदा ३१ आगष्ट रोजीं तिसऱ्यानदां कामन्ससभेंत वाचला जाऊन मंजूर झाला. परंतु, ८ व्या सप्तंबरास त्या मसुद्यास ४१ अनुकूल आणि ४१९ प्रतिकूल अशीं मतें पडून, तो लार्डांच्या सभेंत नामंजूर झाला. ह्याप्रमाणें होमरूलाच्या संबंधाच्या उद्योगाचा परिणाम झाला.

ह्या मसुद्याचा असा परिणाम झाला हें ग्लाडस्टनांच्या मनास फार वाईट वाटलें. पुढें त्यानीं आपल्या मुख्य दिवाणगिरीच्या कामाचा शेवटचा राजीनामा इ० स० १८९४ च्या मार्च महिन्यांत दिला. पण त्यास मुख्य कारण हें नव्हतें. तर, त्यास कारण असें झालें कीं, इंग्लंडाचें आरमार वाढविण्याकरितां पुष्कळ मोठी रकम पार्लमेंटाशीं मागावी, असा विचार त्यांच्या हाताखालच्या प्रधानमंडळीच्या मनांत आला. तो त्यांस मुळींच संमत नव्हता. परंतु, त्यांच्या मंडळींत बहुमत होऊन ती रकम मागण्याचें अगदीं ठरलें. आणखी, आरमाराची विशेष तयारी ह्मणजे लढाईची तयारी—दांडगाईची तयारी—रक्तपाताची तयारी—ती त्यांच्या साधुवृत्तीस पहिल्यापासून अगदीं नको होती. पण ती, बहुमतबलार्थ कबूल करण्याची पाळी आली. आणि शिवाय त्यांची प्रकृति दिवसानुदिवस थकत चालली होती. तेव्हां एकंदर सगळ्या स्थितीचा विचार करून, आपल्या कुटुंबाच्या

माणसाच्या व मित्रमंडळीच्या सूचनांस मान देऊन, त्यांनीं आपल्या कामाचा राजीनामा महाराणीसरकारच्या हातीं दिला, आणि सगळ्या सार्वजनिक कामांतून आपलें आंग काढून घेतलें.तरी, त्यांस ऐरलंडाचा विसर पडला नव्हता. त्याविषयीं त्यांच्या मनांत विचार घोळत असत. त्यांनीं आपल्या हातानें जी अगदीं शेवटची सही केली, ती, जान डिलन ह्या ऐरिश गृहस्थांस बोर्नमथ येथून ता० ९ मार्च १८९८ च्या लिहिलेल्या पत्रावर केली. तें पत्र त्यांनीं तोंडानें सांगून आपल्या मुलीकडून लिहविलें. त्यांत अवघ्या साहा ओळी आहेत. त्यांचें तात्पर्य असें आहेः—"तुमच्या कार्याची सिद्धि केवळ तुमच्या हातांत आहे. ऐरलंडांतल्या लोकांत जोंपर्यंत फुटाफूट राहील, तोंपर्यंत त्यांनीं निराश होऊन स्वस्थ बसावें, परंतु, आपणांस ओळखून जर ते सगळे एकचित्त होतील, तर त्यांच्या कार्याची सिद्धि दुर्निवार आहे-ती झालीच पाहिजे." ह्यावरून ह्या सत्पुरुषांस ऐरलंडाचा कळवळा शेवटपर्यंत किती होता, हें स्पष्ट दिसतें.

लिबरल पक्षाच्या पुढाऱ्यांस ऐरलंडाविषयीं महाप्रयत्न करून जें काय साधावयाचें होतें, तें हेंः—हीं दोन बेटें आणि इंग्लिश, स्काच व ऐरिश हीं तीन राष्ट्रें ह्यांचा एक जीव करून इंग्लिश राज्याचा पाया भक्कम करावयाचा. सध्या ऐरलंडास धाकानें ताब्यांत ठेवावें लागत आहे, तें ऐरलंड, सगळ्या पृथ्वीवरच्या अवाढव्य इंग्लिश राज्याशीं—ह्मणजे ज्या राज्यामध्यें प्रजेचें कल्याण हेंच काय तें ब्रीद गाजत आहे—त्या राज्याशीं एकचित्त होऊन मिळून जाई असें करावयाचें. आणि ऐरलंडांतले लोक, त्रासानें स्वदेश सोडून बाहेरच्या देशीं एकसारखे जात आहेत आणि तेणेंकरून तेथले प्रदेश ओसाड पडत आहेत, तो सगळा प्रकार बंद होऊन, तेथल्या सगळ्या सुपीक भागांत उत्तम प्रकारची शेतकी व्हावी, सगळें ऐरलंड धनधान्यानें परिपूर्ण भरावें, नानाप्रकारचे मोठमोठे उद्योग यंत्रादिकांच्या साह्यानें पुष्कळ चालावे. आणि लोकांचें सुख वाढून त्यांची संख्या दिवसेंदिवस वाढत जावी, असें करावयाचें होतें. होय. ह्यांत सगळें आलें. आणि हें साधावें ह्मणूनच ग्लाडस्टन ह्यांनीं जीवापाड प्रयत्न केले.

ह्यानंतर ग्लाडस्टन हे हार्डन गांवीं आपल्या घरीं मुलांमाणसांमध्यें, कालक्रमणा करीत स्वस्थ राहिले. ह्मणजे, मोठी हजारपांचशें कोसांवरची यात्रा करून एखादा पुण्यपुरुष विश्रांति घेण्यास घरीं येतो, तसे ते सगळीं सार्वजनिक कामें आटोपून, अवशिष्ट आयुष्य शांतपणानें घालविण्यास स्वकुटुंबांत गेले. तेथलाही त्यांचा वृत्तांत श्रवणीय आहे. त्याचें कथन पुढच्या भागीं करूं.





# भाग सातवा.

## विश्रांति आणि उपांत्यकाल.

काव्यशास्त्रविनोदेन कालो गच्छति धीमताम्.

**सुभाषित.**

विद्याभ्यसनं व्यसनं अथवा यदुनाथसेवनं व्यसनं.

**मुद्गलाचार्य.**



तुह्मी उद्योग करा किंवा रिकामे राहा, आयुष्य चाललेंच आहे. तें कांहीं थांबायाचें नाहीं. त्याचा कांहीं उपयोग केला तर तें सार्थकीं लागतें; नाहीं केला, तर फुकट जातें, राहात नाहीं, असें आहे. ह्मणजे वामनपंडितांनीं द्रव्याविषयीं जें ह्मटलें आहे कीं,

**द्रव्यास हे गमनमार्ग यथावकाश**
**कीं दान भोग अथवा तिसरा विनाश**
**जो घे न भोग जरि पात्रकरीं न देही**
**त्याच्या धनास मग केवळ नाश पाहीं.**

तोच नियम आयुष्यास लागू आहे. मग तें आयुष्य तरुणपणचें असो, कीं ह्मातारपणचें असो. आजपर्यंत जीं कोणी थोर ह्मणून माणसें होऊन गेलीं, तीं वृद्धापकालीं देखील निरुद्योग राहिलीं नाहींत. तत्त्ववेत्ता साक्रेतीस अगदीं ह्मातारपणीं वाद्यें वाजवायास शिकला. केटो हा ऐंशीं वर्षांचा झाल्यावर ग्रीक भाषा शिकला. थिओफ्रातस ह्यानें आपल्या वयाच्या नव्वदाव्या वर्षीं एक ग्रंथ लिहिला. फ्रान्सदेशाचा बादशाहा चौदावा लुई ह्याचा प्रधान लेतियर हा वृद्धापकालीं तर्कशास्त्र शिकला. ल्युदोव्हिको मोनादलेस्को ह्यानें आपल्या

वयाच्या ११५ व्या वर्षीं स्वचरित्र लिहिलें. सारांश, थोर माणसें, वृद्ध झालीं, थकलीं, व्यंग झालीं, तरी उद्योग सोडीत नाहींत. कीं, उद्योग करणें हीच जीवंत असल्याची मुख्य खूण आहे, असें त्यांस वाटत असतें. तेंच ग्लाडस्टन ह्यांच्या चरित्रांत दिसून आलें. त्यांनीं आपल्या वयाच्या २५ व्या वर्षापासून ८४ व्या वर्षापर्यंत स्वदेशसेवा कायावाचामनेंकरून पराकाष्ठेचे श्रम करून एकनिष्ठेनें केली. आणि जीव थकल्यासारखा झाला, डोळ्यांनीं धड दिसेनासें झालें, कानांनीं धड ऐकूं येईनासें झालें, रोगांनीं पछाडलें, चौथ्या पिढीची गांठ पडून, मतभेदानें त्रास होऊं लागला, इच्छा असावी एक आणि मान्य करावें लागावें दुसरें, असें होऊं लागलें. ह्मणून त्यांनीं इ० स० १८९४ ह्या वर्षीं सरकारी काम सोडून सगळ्या सार्वजनिक कामांतून आपलें आंग काढून घेतलें. आणि ते आपल्या हार्डन गांवीं आपल्या वाड्यामध्यें, आपल्या कुटुंबाच्या माणसांत जाऊन राहिले. हा जमीनजुमला एकंदर सुमारें चार चौरस मैल आहे. त्यांत सुमारें पांचशें कुळें राहतात. तेथें एक भजनालय आहे. एक शाळा आहे. एक अनाथबालकगृह आहे. शिवाय ग्लाडस्टनांच्या वाड्यांत त्यांचें मोठें पुस्तकालय आहे. त्यांत ५०,००० ग्रंथ आहेत. तेथें ते, प्रपंचाचा आणि इतर उद्योगाचा सगळा बाजार विसरून, उत्तम ग्रंथांच्या सहवासामध्यें शांतिसुखाचा उपभोग घेत असत. किंबहुना तें त्यांचें तपोवन होतें ह्मटलें तरी चालेल, भजनालयामध्यें नेमलेल्या वेळीं नेमल्या जागीं उभे राहून, ख्रिस्ती पवित्रशास्त्र वाचून ते आपल्या गंभीर वाणीनें चित्तवेधक बोध करीत, आणि प्रेमळ प्रार्थना करीत. शिवाय, घरीं आपल्या पत्नीशीं, मुलांशीं, चाकरांशीं आणि इतर आप्त जनांशीं बोलण्यांत आणि बोधाच्या गोष्टी सांगण्यांत कालक्रमणा करीत. हें सगळें काम सुयंत्र चाललें होतें. तरी, त्यांचें एवढाले उद्योग केलेलें हाड स्वस्थ राहिलें नाहीं. त्यांच्यानें स्वस्थ राहावलेंच नाहीं. दरबारच्या आणि देशांतल्या प्रत्यक्ष गडबडींतून निघून जरी ते आपल्या एकांताच्या घरीं जाऊन बसले होते, तरी, वर्तमानपत्रांवरून त्यांस त्या सगळ्या गडबडी कळत असत. आणि त्यांच्या

विचाराकडे त्यांचें मन आपोआप वळे आणि त्यांविषयीं बोलल्याशिवाय त्यांची जीभ राहातच नसे. शिवाय नानाप्रकारच्या सार्वजनिक कामांच्या संबंधानें ते जरी आपण होऊन बोलत नसत, तरी, त्यांस मसलत विचारायास लोक येत; त्यांपाशीं ते मनापासून बोलत. आणखी, त्यांचें ग्रंथावलोकन, आवडत्या विषयांवर लेखन हें चाललेंच होतें. ह्मणजे, पंतांनीं स्वतःविषयीं जें ह्मटलें आहे कीं—

हरिभजनीं वेंचावें आयू न पुरेचि भरंवसा याचा
झालों जीर्ण तरि मनीं आहे रसिकांत भर वसायाचा.

त्याचें स्मरण होतें.

मेकार्थी हे त्यांचे चरित्रकार स्वतःच्या माहितीवरून त्यांविषयीं असें सांगतात कीं, ते पढून पढून कधीं कधीं दररोज दाहादाहा तास उद्योग करीत असत. ते अनेक प्रकारच्या विषयांवर पत्रें, निबंध आणि ग्रंथ लिहीत असत. त्यांत धर्म हा विषय त्यांचा फार आवडता होता. ह्या विश्रांतीच्या वेळांत त्यांनीं बटलर ह्याच्या धर्मविषयक व्याख्यानांवर एक मोठा ग्रंथ लिहिला. तो सर्वश्रेष्ठमान्य झाला आहे. शिवाय ख्रिस्ती धर्मांतल्या निरनिराळ्या पंथांतल्या लोकांत ऐक्य असावें, ह्याविषयीं त्यांनीं पुष्कळ निबंध आणि पत्रें लिहिलीं. तींही फार लोकप्रिय झालीं आहेत. ह्याशिवाय, लोकांत विशेष मान्य झालेला असा त्यांचा ह्या वेळचा निबंध ह्मणजे **शेर्डन** ह्या कवीवरचा होय. त्यांत त्या कवीच्या गुणांचें वर्णन फार मार्मिकपणानें केलें आहे.

ह्या उपांत्यकालामध्यें त्यांच्या संबंधाचा एक सभारंभ अत्यंत संतोषकारक आणि अत्यंत वर्णनीय झाला. तो इ० स० १८९६ च्या जून महिन्याच्या २६ व्या तारखेस वेल्सप्रांतांत अबेरीस्थिथ येथें झाला. त्याचा प्रकार असा. नामदार प्रिन्स आफ् वेल्स ह्यांस तेथल्या विश्वविद्यालयाचे चान्सलर नेमिलें होतें. त्या अधिकाराच्या स्वीकारार्थ ते तेथें आपल्या पत्नीसहवर्तमान गेले होते, आणि त्या समारंभांतच ग्लाडस्टन ह्यांस आणि प्रिन्सेस आफ् वेल्स ह्यांस पदव्या देण्याचा समारंभ झाला. तो समारंभ

एकंदरीनें फारच वर्णनीय झाला. नामदार प्रिन्स आफ् वेल्स पदव्या



प्रिन्स आफ् वेल्स.

अर्पण करणारे, आणि ग्लाडस्टन आणि नामदार प्रिन्सेस आफ् वेल्स हीं पदव्यांचा स्वीकार करणारीं ! मग काय विचारावें ! "आधींच सोन्याचें वरी जडावाचें लेणें श्रीमंताचें शोभिवंत" असें झालें. त्या प्रसंगीं नामदार प्रिन्स आफ् वेल्स ह्यांनीं भाषण फार उत्तम केलें. त्यांत असें ह्मटलें– "ग्लाडस्टन एवढे मोठे राज्यकारभारी आणि एवढे मोठे विद्वान्, वार्धक्यानें इतके थकले असतांही, ह्या विश्वविद्यालयाचा मान करण्याकरितां आणि चान्सलर ह्या नात्यानें माझा मान करण्याकरितां, एवढे मोठे श्रम घेऊन,

एवढा प्रवास करून येथपर्यंत आले आहेत, हा त्यांचा मोठा उपकार झाला आहे, ह्याबद्दल आपण सर्वांनीं त्यांचे आभार मानिले पाहिजेत. ग्लाडस्टनांसारख्यांस पदवी देण्याचा प्रसंग मला आज प्राप्त झाला आहे, हा माझ्या सगळ्या जन्मांत मला अत्यंत संतोषप्रद आणि अत्यंत भूषणावह असा वाटत आहे. ग्लाडस्टन हे कांहीं सामान्य गृहस्थ नाहींत. हे आमच्या राष्ट्रांतल्या राज्यकार्यधुरंधरांतल्या उत्तमांतले उत्तम आहेत, तसे तिकडे विद्वान् मंडळींतल्या उत्तमांतले उत्तम आहेत. ज्या इतर कृत्यांनीं ग्लाडस्टनांचें नांव चिरस्मरणीय केलें आहे, तीं कृत्यें जरी त्यांनीं केलीं नसतीं, तरी, त्यांनीं हॉरेस कवीच्या काव्याचें जें भाषांतर केलें आहे, त्या एकट्या भाषांतरानें त्यांचें नांव चिरस्मरणीय केलें असतें. त्याप्रमाणेंच, ग्लाडस्टनांच्या सगळ्या जन्माच्या सुखदुःखांच्या वांटेकरी ज्या भाग्यवान् बाई आहेत, त्यांचेंही तितकेंच मला अभिनंदन केलें पाहिजे." हें प्रिन्स आफ् वेल्स ह्यांचें भाषण ऐकून ग्लाडस्टन ह्यांस अत्यंत समाधान वाटलें. तरी, आपण ह्मणजे कांहीं विशेष मोठे झालों, असें त्यांच्या मनाला शिवलें नाहीं. ह्यापूर्वीं त्यांस अशा विद्वत्तेच्या अनेक पदव्या मिळाल्या होत्या, पण त्यांस त्यांचें कांहींच मोठें भूषण वाटलें नाहीं. ह्या पदव्या ज्या ज्या मानानें मिळत गेल्या, त्या त्या मानानें ते अधिक नम्र होत गेले. ह्या पदव्यांच्या योगानें त्यांस प्रौढी वाटली नाहीं. परंतु, ज्यांनीं त्यांस त्या दिल्या, त्यांस ती मोठी प्रौढी वाटली—मोठें भूषण वाटलें—मोठा लाभ वाटला.

ह्यानंतर लवकरच ग्लाडस्टन हे लंडनास आले. ते नामदार प्रिन्स आफ् वेल्स ह्यांच्या मुलीच्या विवाहोत्सवाकरितां आले. तो समारंभ मोठ्या थाटानें, जुलैच्या बाविसाव्या तारखेस झाला. त्याचें पुष्कळ वर्णन करण्याच्या ऐवजीं एवढें सांगणें बस आहे कीं, त्या आनंदाच्या प्रसंगीं लोकांचें लक्ष जितकें महाराणी व्हिक्टोरिआ, नवरा मुलगा, आणि नवरी मुलगी ह्यांजकडे होतें, तितकेंच, ह्या वृद्ध, सन्मान्य, आणि पूज्य महापुरुषांकडे होतें. ग्लाडस्टनांसारखे थोर पुरुष आपणांत आहेत, असें मनांत येऊन

त्यांविषयीं लोकांस मोठें भूषण वाटत होतें—मोठा अलभ्य लाभ वाटत होता—असें त्यांच्या मुखचर्यावरून स्पष्ट दिसत होतें. ते राज्यकारभारांत होते, त्या वेळीं पक्षाभिमानाच्या योगानें जनांचीं मनें द्विधा झालेलीं होतीं. ग्लाडस्टनांस देव मानणारी मंडळी होती, तशी त्यांस नांवें ठेवणारीही कांहीं मंडळी होती. परंतु त्या कामांतून ते निघाल्यापासून, तो सगळा मतभेद नाहींसा झाला होता. आणि त्यांची विद्वत्ता, त्यांची धर्मशीलता, त्यांचें अत्यंत पवित्र आचरण, त्यांचा परोपकारीपणा, त्यांची स्वदेशहिताची उत्कट इच्छा, आणि त्यांची परमार्थपरता ह्यांविषयींचें शुद्ध प्रेम आणि शुद्ध भक्ति हीं मात्र लोकांच्या अंतःकरणांत राहिलीं होतीं. त्यांच्या प्रभावानें सर्वांचे डोळे त्या उत्सवांत त्यांच्याकडे लागावे, हें अगदीं साहाजिकच होतें.

ह्या स्थितींतला त्यांचा बहुतेक वेळ वाचनांत आणि लेखनांत जात असे. निदान रोजचे दाहाबारा तास तरी त्या व्यवसायांत ते घालवीत असत. त्यांची वाचनाची खोली ही त्यांस विश्रांतीची मोठी जागा वाटत असे. तिला ते **शांतिमंदिर** ह्मणत असत. वाचावें, ल्याहावें, विचार करावा, आणि दमल्यासारखें वाटल्यावर विश्रांति घ्यावी, निजावें, असा त्यांचा काळ फार सुखांत जात असे. ते ह्या शांतिमंदिरांत आल्यावर प्रपंचाच्या सगळ्या भानगडी अगदीं विसरून जात असत, आणि मोठमोठे तत्वज्ञानाचे ग्रंथ हेच जिवलग मित्र समजून, त्यांशीं मनःसंगम करण्यांत अगदीं गढून जात असत. त्याच्या योगानें त्यांस अतिशयित सुख होत असे असें दिसे. तें सुख अमोलिक आहे. तें सहज प्राप्त होत नाहीं. ज्यांचें दैव मोठें, ज्यांवर देवाची कृपा मोठी, त्यांसच तें प्राप्त होतें. त्यांतले ग्लाडस्टन हे एक होते. "विद्याभ्यसनं व्यसनं अथवा हरिपादसेवनं व्यसनं" हें महत्‌भाग्य त्यांचे ठायीं पूर्णपणें दृश्यमान होतें.

ग्लाडस्टनांच्या कुटुंबस्थितीचें थोडेंसें कथन करण्यास जागा हीच योग्य वाटते. त्यांस भार्या अत्यंत सुशील मिळाली होती, ह्यांचें वर्णन पूर्वीं आलेंच आहे. ह्यांस चार पुत्र झाले. त्यांतले वडील पुत्र विलियम हेनरी हे चांगले विद्वान् झाले होते, आणि पार्लमेंटाचे सभासद झाले होते. ते पुष्कळ

दिवस आजारी पडून इ० स० १८९१ त मरण पावले. दुसरे चिरंजीव स्टीफन एडवर्ड ते चांगले शिकलेले असून हार्डन येथें रेक्टर आहेत. तिसरे चिरंजीव हेनरी नेव्हिले हे आहेत. आणि चौथे हर्बर्ट जान हे पार्लमेंटाचे सभासद आहेत. ग्लाडस्टन ह्यांस चार मुली झाल्या. त्यांतली दुसरी मुलगी १८५० ह्या वर्षीं वारली. बाकीच्या यथास्थित आहेत. हीं सगळीं मुलें अत्यंत सुशील, आणि अत्यंत पितृभक्त आहेत. आणि ह्यांतल्या कितीएकांस मुलें झालीं आहेत. तीं सगळीं माणसें चांगलीं विद्याविनयसंपन्न असून ग्लाडस्टनांस देवासारखीं भजत होतीं. त्यांच्या सहवासानें त्यांस फार संतोष वाटत असे. त्यांच्या कुटुंबस्थितीचा विचार केला ह्मणजे—

**सानंदं सदनं सुताश्च सुधियः कांता न दुर्भाषिणी**
**सन्मित्रं सधनं स्वयोषिति रतिश्चाज्ञापराः सेवकाः**
**आतिथ्यं शिवपूजनं प्रतिदिने मिष्टान्नपानं गृहे**
**साधोः संगमुपासते हि सततं धन्यो गृहस्थाश्रमः**

ह्याचें स्मरण होतें. त्याप्रमाणेंच—

**यदि रामा यदि च रमा यदि तनयो विनयधीगुणोपेतः**
**तनये तनयोत्पत्तिः सुरवरनगरे किमाधिक्यम्.**

ह्याचें चित्र डोळ्यांपुढें उभें राहतें.

सगळ्या प्रकारच्या सार्वजनिक कामांतून ग्लाडस्टन हे निघाले होते, तरी, त्या संबंधाचे त्यांचे परिचय जशाचे तसे कायम होते. एवढेंच केवळ नव्हे, उलट पक्षांच्या मंडळीच्या मनांतला पक्षपात नाहींसा होऊन, सगळेच त्यांचे भक्त बनले होते. आणि तीं सगळीं माणसें मोठीं होतीं. त्यांशीं त्यांच्या योग्यतानुरूप ग्लाडस्टन वागत असत, आणि त्यांचा आदरसत्कार करीत असत. मोठमोठे उमराव त्यांच्या दर्शनास जात. नामदार प्रिन्स आफ् वेल्स हे आपल्या पत्नीसहवर्तमान इ० स० १८९७ च्या मे महिन्यांत त्यांस भेटण्याकरितां हार्डन येथें गेले होते. तो आदरातिथ्याचा थाट अत्यंत प्रेक्षणीय झाला. ग्लाडस्टन, त्यांची पत्नी, आणि त्यांचीं मुलें ह्यांनीं ह्या राजकुलोत्पन्नांचें जें आदरातिथ्य केलें, तें जसें त्या पाहुण्यांस



ग्लाडस्टन आणि त्यांची पत्नी, इ० स० १८९६. पृ. ११८.

आनंददायक झालें, तसें यजमानांस अत्यंत भूषणावह झालें. उभयपक्षीं अत्यानंद झाला. ह्या भेटीच्या वेळच्या पुष्कळ प्रेमाच्या गोष्टी सांगितलेल्या आहेत. त्यांत एक अशी आहे कीं, नामदार प्रिन्स आफ् वेल्स ह्यांची पत्नी जेव्हां हार्डेन येथून त्यांचा निरोप घेऊन निघाली, तेव्हां, मोठ्या प्रेमानें ग्लाडस्टनांच्या पत्नीस ह्मणाली, "**आई, येतें बरें.**" तें कानीं पडतांच ग्लाडस्टनांच्या पत्नीनें, मोठ्या आदरबुद्धीनें खालीं लवून, तिचें चुंबन केलें!

ग्लाडस्टन आणि त्यांच्या कुटुंबांतलीं माणसें हीं सगळीं आपल्या ताब्यांतल्या कुळांशीं फार ममतेनें वागत असत. आणि तीं कुळें त्यांस फार भजून असत. त्या कुळांच्या घरांत आणि झोंपड्यांत ग्लाडस्टनांची एक एक तसबीर असावयाची. आणि केव्हांहीं जावें तेव्हां तीं सगळीं कुळें त्यांस दुवा देत असावयाचीं.

आपल्या मोठ्या वाड्यामध्यें ग्लाडस्टनांनीं, एका लहानशा खोलींत आपला सगळा पत्रव्यवहार फार जपून लावून ठेविला आहे. त्यांत त्यांस आलेलीं मोठमोठ्या लोकांचीं पत्रें मोठ्या महत्त्वाच्या विषयावरचीं आहेत. तीं पुढें जेव्हां एकाद्या चतुर इतिहासकाराच्या हातीं लागतील, तेव्हां त्यांतून तो, इंग्लंडाच्या इतिहासांत भर पडण्यासारखे पुष्कळ लेख लिहील, ह्यांत कांहीं संशय नाहीं.

हार्डेन येथें शेवटच्या शेवटच्या वर्षांमध्यें त्यांची दिनचर्या अगदीं नियमित होती. जरी ते अगदीं थकत आले होते, आणि डोळ्यांस इजा होती, तरी ते, प्रातःकाळीं आठ वाजतां वाचायास बसत. ते दाहा वाजतपर्यंत. नंतर फराळ होई. आणि मग पोषाक वगैरे केल्यावर, पुनः आपल्या शांतिमंदिरांत ग्रंथावलोकनास किंवा ल्याहावयास बसत. ते चांगले चारपांच तासपर्यंत बसत. त्यांचीं उत्तरें लोकांस वेळचे वेळीं जात असत. आणखी, वाचण्याच्या संबंधानें त्यांची पद्धति फार लक्षांत ठेवण्यासारखी असे. ते नेहमीं अगदीं वेगळ्या वेगळ्या तीन विषयांचे ग्रंथ जवळ ठेवीत, आणि ह्याचा कंटाळा वाटला ह्मणजे तें, ह्याप्रमाणें

ते आळीपाळीनें ग्रंथावलोकन करीत. त्याच्या योगानें प्रत्येक विषयाच्या अभ्यासांत ताजेपणा वाटून, उद्योगाची हौस राही. आणखी, जें काय वाचावयाचें तें आपलेंसें करावयाचें, असा त्यांचा नेम असे. त्याच्या योगानें वृद्धापकाळीं देखील त्यांच्या ज्ञानाची वृद्धि एकसारखी चालली होती. ते जन्मभर विद्यार्थी होते. त्यांच्या चरित्रामध्यें एक गोष्ट विशेष लक्षांत ठेवण्यासारखी ही दिसते कीं, अठ्यायशीं वर्षांच्या वयांत त्यांचे शरीरास अशक्तता आली, आणि नेत्रकर्णादिकांचें सामर्थ्य हटलें, परंतु मनाचें सामर्थ्य तिळमात्रही कमी झालें नाहीं. विषयाचें ग्रहण होणें, त्यांत यथार्थ काय आणि अयथार्थ काय हें लक्षांत येणें, त्याविषयीं आपलें मत प्रगट करणें, आणि त्या सगळ्याचें स्मरण राहाणें, ह्यांतलें त्यांचें कांहींएक कमी झालें नव्हतें. ह्मणजे वार्धक्याचा परिणाम त्यांच्या देहावर मात्र झाला होता, मनावर झाला नव्हता. ह्याविषयीं एवढेंच सांगावयाचें कीं, ग्लाडस्टन ह्यांनीं आपलें शरीर आणि आपलें मन हीं दोन्ही एकसारख्या आस्थेनें जन्मभर बाळगिलीं होतीं. त्यांतल्या मनानें त्यांस अधिक चांगली सोबत दिली. तीच त्यांच्या आत्म्याच्या सुखास आणि उद्धारास पुष्कळ साधनभूत झाली.





# भाग आठवा.



## शेवटचें दुखणें आणि अंतकाल.

मृत्यु हरितसे समयीं अमरांसहि कोण मृत्युला चुकवी.

**मोरोपंत.**

मृत्यु न ह्मणे हा बलाढ्य मृत्यु न ह्मणे हा धनाढ्य.
मृत्यु न ह्मणे हा आढ्य सर्व गुणें.

**रामदास.**

जब तुम पैदा भये जग हांसे तुम रोय
अब तोभी ऐसा करो के पीछे हांसे ना कोय.

**तुळसीदास.**



मनुष्यास जगांतल्या सगळ्या वस्तूंमध्यें अगदीं सन्निधची अशी वस्तु ह्मटली ह्मणजे त्याचें शरीर होय. परंतु त्याविषयीं चमत्कार असा आहे कीं, त्यांत काय चाललें आहे, हें त्याला लवकर कळत नाहीं. तें चांगलें वाढल्यावर मग कळतें. त्यांत ग्लाडस्टन ह्यांची शरीरप्रकृति तर पहिल्यापासून अगदीं दगडासारखी होती. दुखणें असें त्यांस सहसा कधीं आलें नाहीं. त्यांचे वैद्य सर आंन्ड्र क्लार्क हे त्यांच्या शरीराच्या सुदृढतेकडे पाहून एकदा ह्मणाले कीं, "शेवटीं ह्यांच्या शरीरांतून जीव निघून जावयाचा, त्यास निसटून जाण्यास मला कोठें एवढीशी देखील चीर दिसत नाहीं." ग्लाडस्टन ह्यांस सत्यायशीं वर्षें होतपर्यंत फारसें कधीं दुखणेंबाणें आलें नाहीं. प्रकृति चांगली धडीखडी राहिली. परंतु. इ० स० १८९६ त त्यांना अशक्तपणा जाणवूं लागला. आणि इ. स. १८९७ च्या सप्तेंबर महिन्यांत त्यांच्या नाकांत फार दुखूं लागलें, आणि तें दुःख तों-

ह्यांत पसरत चाललें. तो रोग फार घातुक होता. तरी, घरच्या माणसांस धक्का बसूं नये ह्मणून, वैद्यांनीं ती गोष्ट एकाएकीं प्रगट केली नाहीं. तरी थारेपालटाकरितां ते त्या वर्षीच्या हिंवाळ्यांत फ्रान्साच्या दक्षिणभागीं क्यानीज येथें जाऊन राहिले होते. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. मग ते नोवेंबरमध्यें इंग्लंडास परत आले. पुढें त्यांनीं कांहीं दिवस बोर्नमथ येथें काढिले. तरी रोगाचें पाऊल पुढेंपुढेंच पडत चाललें.

इ० स० १८९८ च्या मार्च महिन्याच्या २२ व्या तारखेस ते वोर्नमथ येथून निघाले. तेव्हां त्यांचा आजार बराच वाढला होता, आणि सर्वांस तेव्हां असें वाटलें कीं, ह्यापुढें ग्लाडस्टन ह्यांचे पाय त्या ठिकाणास लागावयाचे नाहींत. ह्मणून मोठ्या कळवळ्यानें त्यांस पोंचविण्याकरितां तेथील पुष्कळ मंडळी स्टेशनावर आली होती. तिजकडे पाहून, आगगाडीच्या डब्यांतून ग्लाडस्टन मोठ्या गहिंवरानें ह्मणाले—

"परमेश्वर तुमचें कल्याण करो, परमेश्वर तुमचें कल्याण करो."

त्यांचें स्वतःचें राहाण्याचें गांव हार्डन तेथें ग्लाडस्टन परत आले, तेव्हां दुखण्याचा जोर फारच वाढला होता, आणि त्यांच्या जगण्याविषयीं लोकांची आशा अगदीं सुटत चालली होती. आणखी त्यांच्या वैद्यांनींही त्यांस, मध्यें पडदा न ठेवतां, तें स्पष्ट कळविलें. पण त्यापासून ग्लाडस्टन ह्यांस तिळभरही वाईट वाटलें नाहीं कीं भय वाटलें नाहीं. कां कीं, त्यांस त्या दुःखाच्या ज्या मनस्वी वेदना होत होत्या, त्यांपासून एकदांचें मुक्त व्हावें असें त्यांस वाटत होतें. आणि ते परमेश्वराचे निःसीम भक्त होते, त्याच्या योगानें, आपण एकदा केव्हां देवाकडे जाऊं, असें त्यांस झालें होतें. ह्या वेळापासून त्यांचें मन इहलोकच्या विचारांपासून अगदीं सुटून परलोकच्या विचारांकडे लागलें. त्यांस कोणा एका गृहस्थानें ह्मटलें कीं, "आणखी दहा वर्षें आपण जगलां तर बरें होईल, आणि कां न जगावें?" त्यावर त्यांनीं उत्तर दिलें, "नको नको नको, आतां तो विचार मुळींच नको. देवा, मला आतां लवकर सोडीव." पुढें कांहीं वेळानें ते ह्मणाले, "माझ्या एकशें शाहात्तर साहामाह्या कांहींएक न दुखतां खुपतां जर गेल्या आहेत, तर, एक साहामाही दुःख सोसण्याविषयीं मीं कां कुरकुरावें बरें!"

मे महिन्याच्या मध्याच्या सुमारास त्यांच्या कुटुंबाच्या माणसांस आणि इष्टमित्रांस त्यांच्या जगण्याविषयींची आशा मुळींच नाहींशी झाली. तेव्हां, तीं त्यांची शेवटची भेट घेण्यास येऊं लागलीं. त्यांस ग्लाडस्टन ह्यांची सहनशीलता आणि धर्मावरचा दृढ विश्वास हीं पाहून फार कींव येई, आणि फार दुःख वाटे. लार्ड रोजबरी, सर आर्थर गाडले, जान मोर्ले, जी. डब्ल्यू. ई. रसेल, इत्यादि त्यांची मोठ्या प्रेमांतली मंडळी त्यांची भेट घ्यावयास गेली. त्या सर्वांस त्यांनीं आशीर्वाद दिले, आणि त्यांपाशीं ते थोडथोडें बोलले. त्यांत इहलोकाविषयीं कांहींएक नव्हतें. सगळें परलोकाविषयीं आणि परमार्थाविषयीं होतें. दुःखाच्या वेदना अतिशयित होत, तरी त्या ते शांतपणें सोशीत; कधींही तळमळ करीत नसत, कीं त्रासत नसत. त्यांच्या मुखावाटे वैतागाचा शब्द निघाला नाहीं. मधूनमधून वारंवार ''माझा विश्वास दृढ आहे, माझा विश्वास दृढ आहे'' असें मात्र ते ह्मणत असत. आणखी, जवळच्या मंडळीस ह्मणत असत कीं, मरणोत्तर आपणां सर्वांस जिणें आहे, आणि जे कोणी पश्चात्तापानें आणि भक्तिभावानें साश्रु होऊन हें जग सोडतील, ते ह्या जगापेक्षां चांगल्या जगांत पुनः परस्परांस भेटतील, ह्याविषयीं माझी खातरी आहे. हें त्यांच्या तोंडांतून निघे तेव्हां त्यांस समाधान वाटेसें दिसे.

**ह्मणे दास विश्वासतां मुक्ति भोगी**

ह्याचें हें एक उदाहरण दिसतें.

ग्लाडस्टन ह्यांचें दुखणें बळावलें, त्यांच्या बरेपणाची आशा राहिली नाहीं, आणि त्यांस वेदना अतिशयित होत असून ते त्या फार शांत चित्तानें, तिळभरही त्रास न दाखवितां, परमेश्वराची इच्छा ह्मणून सोशीत आहेत, असें बाहेर लोकांत कळलें, तेव्हां त्यांस फार वाईट वाटलें, आणि त्यांच्या जीवाची मुक्तता त्या क्लेशांतून लवकर व्हावी, ह्मणून ते देवाची प्रार्थना करूं लागले. सेंटपाल ह्या भजनालयांत, उपदेश करतांना, कानन स्काट हालंड हे मंडळीस ह्मणाले, ''सध्या एक थोर गृहस्थ संकटांत आहेत, ते मृत्यु लवकर यावा अशी इच्छा करून आहेत, तरी त्यांस मृत्यु

येत नाहीं, त्यांच्याकरितां तुह्मीं प्रार्थना करावी. जन्मभर मोठमोठे पराक्रम करून, एकदा मोठा सिंह, वृद्धापकालानें, जखमांनीं आणि दुखण्यानें अति पीडित होऊन, पराधीन होऊन पडावा, तसे हे गृहस्थ हार्डन येथें पडले आहेत. त्यांस सगळ्या राष्ट्रांच्या प्रार्थनेची गरज आहे. कां कीं, त्यांस एक एक पळ एका एका वर्षासारखें कठिण चाललें आहे. त्यांस जें सहन करवत नाहीं, तें त्यांस सहन करावें लागत आहे. तरी, ते आपला वेळ भोंवतालच्या मंडळीस आशीर्वाद देण्यांत घालवीत आहेत. त्यांच्याकरितां प्रार्थना करा, आणि त्यांस जें पाहिजे आहे, तें त्यांस देवानें शांतपणानें सहज द्यावें, अशी त्यास विनंती करा–त्यांची सुटका शांतीनें होवो, असें देवाजवळ मागा."

दुखणें फार झालें होतें, क्लेश मनस्वी होत होते, देहाचें ओझें नकोसें झालें होतें, तरी त्यांची शांति तिळभरही ढळली नाहीं. ते एकदां आपल्या जांवयास ह्मणाले, "परमेश्वराच्या कृपेवर आणि भक्तवत्सलतेवर माझा पूर्ण विश्वास आहे. तो तिळमात्र ढळावयाचा नाहीं. मी दुःखी आहें असें समजूं नका. समाधान आश्चर्यकारक आहे. मजकरितां ज्या प्रार्थना होत आहेत, त्या माझ्या सुखास फार साधनभूत होत आहेत."

त्यांचा सोशिकपणा विलक्षण होता. "केवळ भट्टी पेटली आहे." असें ते आपल्या वेदनांविषयीं एकदा निसुटतें बोलले. पण, त्यांच्या तोंडांतून तळतळीचे किंवा दुःखाचे उद्गार कधीं निघाले नाहींत. वेदना परम दुःसह होत होत्या, तरी ते त्या निमूटपणें सोशीत होते. त्याचें लोकांस मोठें नवल वाटे, आणि त्यांची फार कींव येई. त्यांचें सगळें लक्ष परलोकाकडे लागलें होतें. त्यांस ठेविलें होतें, त्याच्या समोरच्या भिंतीवर, चांगल्या ठळक अक्षरांनीं, "स्थिर मनाला तूं पूर्ण समाधानानें राखशील, कारण, तें तुजवर भाव ठेवितें," हें त्यांच्या पवित्र शास्त्रांतलें वचन लिहिलें होतें. तें असें कीं, तें सहज त्यांच्या दृष्टीस पडावें. त्याजकडे त्यांची दृष्टि असे, आणि त्याच्या योगानें त्यांच्या मनास स्थिरता येई असें दिसे.

सोळाव्या तारखेच्या रात्रीं त्यांच्या जवळच्या एका माणसानें त्यांस विचारिलें कीं, "आपणांस फार क्लेश होत आहेत काय?" त्यास त्यांनीं उत्तर दिलें, "नाहीं, नाहीं, मला आतां क्लेश होत नाहींत. मला पुष्कळ बरें वाटत आहे. मी आतां मृत्यूची वाट पाहात आहें, दुसरें कांहीं नाहीं." खरोखर, ग्लाडस्टन मोठ्या उत्कंठेनें मृत्यु लवकर यावा, अशा प्रार्थना करीत होते, आणि त्याची वाट पाहात होते. मधून मधून ते आपणांभोंवतीं पाहात, आणि आकाशाकडे डोळे करून मोठ्या कृतज्ञतामुद्रेनें ह्मणत, "अहाहा! अहाहा! केवढी तरी देवाची कृपा ही! केवढी तरी देवाची कृपा ही! कृपा! कृपा! कृपा! सगळी कृपा आहे!" ह्मणजे भोंवतालचीं माणसें आपली सेवा करीत आहेत, आणि एवढ्या क्लेशांमध्यें आपली बुद्धि स्थिर असून आपलें लक्ष देवाकडे लागलें आहे, ही सगळी त्याची कृपा आहे, असें त्यांच्या मनांत वारंवार येत असे. निस्सीम परमेश्वरभक्तांस नेहमीं असेंच वाटत असतें. तुकाराम महाराजांनीं ह्मटलें आहे:—

**भय हरिजनीं कांहीं न धरावें मनीं. १.**
**नारायण ऐसा सखा काय जगाचा हा लेखा. २.**
**चित्त वित्त देवा समर्पुनी राहा देवा. ३.**
**तुका ह्मणे मन असों द्यावें समाधान. ४.**

**भयाची तों आह्मां चित्तीं राहों खंती सकेना. १.**
**समर्पिलों जीवें भावें कशा भ्यावें कारणें, २.**
**करील तें कवतुकें अवघें निकें शोभेल. ३.**
**तुका म्हणे माप भरूं दिवस सारूं कवतुकें. ४.**

शेवटीं मृत्यूची वेळ जवळ जवळ येऊं लागली. अठराव्या तारखेची रात्र मंडळींनीं दिवेवातींनीं काढिली. त्या रात्रीं समाचाराकरितां पुष्कळ मोठमोठ्यांकडून तारा आल्या. त्यांत नामदार प्रिन्स आफ् वेल्स ह्यांचेकडची तार ग्लाडस्टनांच्या चिरंजीवांस अशी होती.—"ह्या भयंकर दुःखसमयीं सगळें मन तुमच्याकडे, तुमच्या मातुश्रीकडे आणि कुटुंबाच्या इतर माणसांकडे लागलें आहे. तुमच्या तीर्थरूपांस क्लेश होऊं नयेत, एवढेंच

देवापाशीं मागणें आहे." तीन वाजून गेले. तेव्हां जवळच्या धन्वंतऱ्यांनीं सांगितलें कीं मरणसमय अगदीं सन्निध आला आहे. त्यासरशीं ग्लाडस्टन ह्यांच्या कुटुंबाचीं सगळीं माणसें, त्यांच्या बिछान्याभोंवतीं जमा झालीं. ग्लाडस्टन ह्यांस एका मोठ्या खोलीमध्यें कोचावर ठेविलें होतें. त्यांचें मस्तक उंच उशीवर ठेवून, गळ्यापर्यंत पांघरूण घातलें होतें. चार वाजण्याच्या सुमारास मृत्यु अगदीं नेटलासें दिसलें. हातपाय गार पडत चालले, श्वास कमजोर होत चालला, आणि मुखचर्या फिरली. तेव्हां, सगळ्या माणसांनीं गुडघे टेंकून, मोठ्या दीनवाणीनें देवाची प्रार्थना केली, आणि, ग्लाडस्टन ह्यांस जीं भजनगीतें फार आवडत होतीं तीं गाइलीं. त्यांची पत्नी, त्यांच्या डाव्या बाजूस त्यांचा हात आपल्या हातांत धरून, त्यांच्या मुखाकडे पाहात बसली. त्यांचे मुलगे, मुली आणि सुना हीं त्यांच्या भोंवतीं उभीं राहिलीं. सगळ्यांचे डोळे ग्लाडस्टन ह्यांच्या मुखाकडे लागले. त्यांतून अश्रुधारा चालल्या. आपला आधार चालला, आपला पोशिंदा चालला, आपल्या सगळ्या वैभवाचा स्तंभ मोडला—असें सर्वांच्या चर्यांवर मूर्तिमंत दिसूं लागलें. जों जों ग्लाडस्टन ह्यांचें देहावसान जवळ जवळ येत चाललेंसें दिसूं लागलें, तों तों भोंवतालच्या मंडळीच्या मुखचर्यांवर प्रियविरहदुःख अधिकाधिक दृश्यमान होऊं लागलें. शेवटीं सगळी हालचाल राहिली. जीवात्मा देहास टाकून मे महिन्याच्या १९ व्या तारखेस प्रातः सुमारें पांच वाजतां निघून गेला. ग्लाडस्टन हे निजधामास गेले. त्या वेळीं एक गृहस्थ जवळ होता त्यानें त्यांचें वर्णन केलें आहे:—"एकादें अगदीं लहान मूल हळूहळू शांतपणानें झोंपीं जातें, त्याप्रमाणें ग्लाडस्टन ह्यांस अगदीं स्वस्थपणें महानिद्रा लागली. तळमळ यत्किंचितूही नव्हती." नंतर, ग्लाडस्टन मरण पावले असें स्पष्टपणें जवळच्या तिघां वैद्यांनीं समाचारपत्रिकेवर लिहून प्रगट केलें. तेव्हां तर तेथें दुःखाचे डोंगर कोसळले. सर्व माणसें माना खालीं घालून आणि आपल्या अश्रुधारा पुसून शोक करीत जागच्याजागीं थिजल्यासारखीं राहिलीं! त्यांच्या पत्नीची जी अवस्था त्या वेळीं झाली, तिचें वर्णनही करवत नाहीं. गेले—ग्लाडस्टन गेले—असें ह्मणून, तेथलीं माणसें, हळूहळू एकामागें एक निघून दूर जाऊन बसलीं.

तेथें आधींच कितीएक वर्तमानपत्रांचे बातमीदार आणि चित्रकार येऊन बसले होते. त्यांनीं ही झालेली दुःखकारक गोष्ट लागलीच तारांनीं सगळ्या जगभर पाठविली, आणि तेथल्या त्या देखाव्याचीं चित्रें काढून घेतलीं. ही मंडळी तेथें इतकी जमली होती कीं, त्यांस उभें राहण्यास जागा मिळेना.

ग्लाडस्टन हे गृहस्थ किती थोर होते, आणि केवळ इंग्लंडासच नव्हे, तर सगळ्या विद्याचारसंपन्न जगास ते किती वंद्य वाटत होते, हें सगळें तपशीलवार सांगायाचें ह्मटलें ह्मणजे त्यास एक मोठा ग्रंथ ल्याहावा लागेल ह्मणून त्या भरीस न पडतां, त्यांच्या मरणाची वार्ता ऐकून लोकांत काय काय गोष्टी झाल्या, त्या तरी सगळ्या नव्हत, पण त्यांतल्या ठोकळ ठोकळ तेवढ्या येथें सांगतों. ह्मणजे त्याविषयीं थोडेंसें तरी अनुमान करितां येईल.

ग्लाडस्टनांचें देहावसान झाल्याचें कळल्याबरोबर १९ व्या तारखेस लार्डांची सभा आणि कामन्सांची सभा ह्यांचीं कामें बंद ठेविलीं, आणि दुसऱ्या दिवशीं ह्मणजे विसाव्या तारखेस लार्डांच्या सभेंत आणि कामन्सांच्या सभेंत त्यांविषयीं भाषणें झालीं, तीं अत्यंत हृदयद्रावक होतीं. त्यांत लार्डांच्या सभेंत लार्ड सालसबरी ह्मणाले—"ह्या देशांतल्या महाराजकारणी पुरुषांच्या यादींतलें एका इंग्लिश गृहस्थाचें नांव आज कमी झालें आहे. त्यांच्या चरित्राचा ठसा सध्याच्या काळच्या पिढीच्या राजकीय आणि सामाजिक विचारांवर पुष्कळ राहील, तो ते ज्या कामांत गुंतले होते, किंवा ज्या कामांचा बेत करून ते होते, त्यांवरून इतका राहाणार नाहीं; तर, ह्यांच्यासारखा ख्रिस्ती धर्मी पुरुष अलीकडे दुसरा कोणी झाला नाहीं, ह्यावरून त्यांचें नांव चिरस्मरणीय होईल." लार्ड किंबर्ले ह्मणाले, "आपणांतले एक मोठे शक्तिमान् आणि मोठे कीर्तिमान् राजकारणी गृहस्थ मरण पावले एवढेंच नव्हे, तर ह्या देशांतल्या उच्च पदावरच्या माणसांस ज्यांनीं वर्तनाचा उत्तम कित्ता दाखवून दिला आहे, असे गृहस्थ गेले आहेत." ड्यूक आफ् डेव्हनशायर हे ह्मणाले, "आपल्या प्रतिपक्ष्यांस त्यांचे दोष दाखविण्यास ग्लाडस्टन हे जरी कधीं कचरत नसत, तरी स्वतांच्या

अनुभवांवरून मी सांगतों कीं, विनाकारण असा एक देखील शब्द त्यांच्या तोंडांतून कधीं बाहेर पडला नाहीं. ग्लाडस्टन आणि त्यांचे अनुयायी ह्यांच्यामध्यें फूट पडली, ह्याचें आह्मांस फार वाईट वाटतें. परंतु, ज्या कामावरून ती फूट पडली, त्या कामांत हात घालण्यामध्यें, आपलें स्वतःचें कर्तव्य, आणि आपल्या राष्ट्रांचें हित, ह्यांच्या पलीकडे दुसरें कांहीं एक त्यांच्या मनांत नव्हतें, ह्याविषयीं कोणासही शंका नाहीं." लार्ड रोजबरी ह्मणाले, "आपण सगळे ग्लाडस्टनांच्या अगदीं जवळ असल्यामुळें, ते गेल्याच्या योगानें जगांत किती जागा रिकामी पडली आहे, आणि सध्याच्या मन्वंतरावर त्यांच्या कृतीचा परिणाम किती होता, हें ठरविण्याच्या पलीकडे आपणांस कांहीं करतां यावयाचें नाहीं. भूतदया हा त्यांचा फार मोठा गुण होता. कार्य लहान असो, मोठें असो, तसेंच माणूस लहान असो मोठें असो, तें सत्पक्षी असलें ह्मणजे त्यास जीवेंभावेंकरून साह्य करण्यास ते तयार असत, हें सर्वांस ठाऊक झालें होतें, त्याच्या योगानें त्यांचें देव्हारें चोहींकडे होत असे....उद्योग करण्यास उत्तेजन कसें द्यावें, संकटसमयीं धैर्य कसें धरावें, उत्तम ख्रिस्ती धर्मी कसें व्हावें, आणि सदाचरणावर निष्ठा ठेवून, आणि सत्परिणामावर आशा धरून कसें वागावें, ह्याचें उत्तम उदाहरण, ह्यापुढच्या कितीएक पिढ्यांतल्या माणसांस, ग्लाडस्टनांच्या चरित्रांत चांगलें सांपडेल, अशी माझी खातरी आहे."

त्याप्रमाणेंच कामन्ससभेमध्यें पुष्कळ भाषणें त्याच दिवशीं झालीं. त्यांत आर्थर बालफोर हे ह्मणाले—"वादविवाद करणारे आणि भाषण करणारे पुष्कळ असतात. पण हे दोन्ही गुण एकत्र असणें हें क्वचित् सांपडतें. तें ग्लाडस्टन ह्यांच्या ठायीं होतें. ग्लाडस्टनांनीं एक काम फार मोठें केलें आहे. तें इतकें मोठें आहे कीं, त्याचें यथार्थ वर्णन करतां यावयाचें नाहीं. तें काम हें कीं, त्यांनीं पार्लमेंटांतल्या कामास मोठी वजनदारी आणिली—मोठें श्रेष्ठत्व आणिलें—पार्लमेंटांतले विचार ह्मणजे कांहीं एक गंभीर विवेचनाचें फल आहे—असें स्थापित केलें आहे." सर विलियम हार्कोर्ट ह्मणाले—"ग्लाडस्टन जें काय करीत तें जीवेंभावें—अगदीं मनापासून—

खरोखर चांगलें वाटे ह्मणून करीत. त्याविषयीं कधीं कोणास संशय आला नाहीं. एकदा विश्वास ह्मटला ह्मणजे विश्वास, काम करायाचें ह्मणजे काम करावयाचें, त्यांत काडीइतकें कमी करावयाचें नाहीं, अशी त्यांची वृत्ति होती. कामन्ससभेविषयीं त्यांचे ठायीं विलक्षण पूज्य बुद्धि होती. आणि ती सभा ह्मणजे एका मोठ्या स्वतंत्र राष्ट्राची मनोदेवता आहे, असा तिचा लौकिक राखण्याविषयीं ते नेहमीं प्रयत्न करीत असत. ते स्वतः मोठ्या सन्मानानें वागत, आणि दुसऱ्यांसही मोठ्या सन्मानानें वागवीत. ते मोठे राजकारस्थानी पुरुष होते एवढेंच नव्हे, तर ते अत्यंत सभ्य होते. त्यांचा धार्मिकपणा आणि त्यांचें पावित्र्य ह्यांचे जे उत्तम परिणाम लोकस्थितीवर झाले आहेत, त्यांचा गौरव करावा तितका थोडाच वाटतो. लोकांची नीति सुधारण्यास ते परिणाम पुष्कळ साधनभूत झाले आहेत. पुष्कळ लोक जें काय करावें ह्मणून सांगत आले, तें हे करीत आले. त्यांचें चरित्र हा एक मोठा बोध आहे. तो कधीं कोणी विसरणार नाहीं. ह्यांचें नांव निघत नाहीं, असें एक देखील झोंपडें ह्या देशांत आढळावयाचें नाहीं. सर्वांस ठाऊक होतें कीं, अनाथ, दीन आणि दुःखी ह्यांच्या साह्यास ग्लाडस्टन हे वाहलेले आहेत. ते अतिशयित दयाळ, अतिशयित क्षमाशील, आणि अतिशयित शांतिप्रिय होते. हीं सत्पुरुषांच्या थोरपणाचीं लक्षणें होत. पुष्कळ वर्षेंपर्यंत आपल्या देशाची आणि राणीसरकाराची उत्तम प्रकारें सेवा करून, मोठ्या लौकिकानें ह्यांनीं आपली ऐहिक यात्रा संपविली आहे. ह्यांचें देव्हारें आह्मीं आणि सगळ्या मनुष्यजातीनें करावें, असें आपलें सगळें आयुष्य ह्यांनीं घालविलें आहे. आणि ह्यांनीं आह्मां सर्वांस, उत्तम असा वर्तनाचा नमुना दाखविला आहे." ऐरलंडाचे कैवारी डिलन हे ह्मणाले—"अतिशयित वेदना होत होत्या, आणि मृत्यूची छाया पडली होती, अशा स्थितींत देखील, अडचणी, पराजय, इत्यादिकांचा प्रादुर्भाव त्यांच्या अप्रतिम धैर्यावर तिळप्रायही झाला नाहीं. आजपर्यंत जे थोर पुरुष मीं पाहिले आहेत, आणि ज्या थोर पुरुषांचीं चरित्रें मीं वाचिलीं आहेत, त्या सर्वांत, वृद्धापकाळामुळें, बुद्धीला भ्रंश झाला नाहीं, भूतदया

उणावली नाहीं, आणि सत्कार्यें आणि दुःखित माणसें ह्यांच्या हाका व्यर्थ गेल्या नाहींत, असे काय ते एक ग्लाडस्टनच मला आढळले. हे सगळ्या इंग्लिश राष्ट्रांत अत्यंत थोर होते —ह्यांच्या वेळीं ह्यांच्या बरोबरीचा दुसरा एकही गृहस्थ नव्हता—ही गोष्ट सगळे इंग्लिश लोक कबूल करीत आहेत."

अशीं अनेक भाषणें इंग्लंडांतल्या पार्लमेंटांत झालीं. शिवाय, कानड्याच्या पार्लमेंटांत तेथले मुख्य प्रधान सर विलफ्रेड लारियर हे ह्मणाले —"ग्लाडस्टनांनीं राष्ट्राच्या विद्याचारसंपन्नतेचें मान पुष्कळ वाढविलें आहे, आणि त्यांच्या बोधानें आणि वर्तनाच्या नमुन्यानें जगाचें पुष्कळ कल्याण झालें आहे, असें ह्मणणें ही कांहीं अतिशयोक्ति नव्हे. सगळ्या विद्याचारसंपन्न राष्ट्रांमध्यें त्यांचें नांव हें न्यायाचा जीवंत अवतार होतें. नेपोलियन बोनापार्टाच्या वेळेपासून असा महाबुद्धि पुरुष दुसरा एकही झालेला नाहीं. अत्यंत भूतदया, अखंड न्यायाची आवड, आणि कोठेंही होत असलेल्या छलाचा विरोध, हे त्यांचे मुख्य गुण होते. ऐरलंडांतल्या विपत्तिग्रस्त जनांस न्याय मिळवून देण्याकरितां ह्या माहात्म्यांनीं स्वतःचे मित्र सोडिले, अधिकाराचा त्याग केला, आणि लोकप्रीतीवर पाणी सोडिलें....आज इंग्लंडाच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहात आहेत. परंतु, ग्लाडस्टनांसारखा महात्मा त्यांत उत्पन्न झाला, हें त्याचें मोठें भाग्य होय. त्या माहात्म्यांचें काम अद्याप संपलें नाहीं. तें चाललेंच आहे. त्यांनीं जगाला जो वर्तनक्रमाचा कित्ता घालून दिला आहे, तो निरंतर राहावयाचा आहे, आणि त्यांनीं आपल्या हातांनीं ज्या वृक्षाची लागवड केली आहे, तो वृक्ष, परमेश्वराच्या कृपेनें, चांगला मोठा वाढून त्यास, यथाकालीं पुष्पें आणि फलें खचीत खचीत येणार आहेत."

अमेरिकेंतल्या संस्थानांचे प्रेसिडेंट माकिनले हे ह्मणाले—"ह्या शतकांत ग्लाडस्टन हे सर्वांत मोठे पुरुष होते. त्यांच्यासारखा पुरुष पुढें कधीं होईल कीं नाहीं ही मोठी शंका आहे. निरक्षेप स्वदेशाभिमानाच्या संबंधानें ते जार्ज वाशिंग्टनांसारखे होते."

न्यूयार्क टैम्स पत्रानें ह्मटलें आहे—"इंग्लंडानें नीतिमान् असावें, अशी ग्लाडस्टनांची इच्छा मनस्वी होती. ह्मणूनच, इंग्लंडाची कशी तरी चलती राहावी असें इच्छिणाऱ्या इंग्लिश लोकांत त्यांस फार शत्रु झाले होते.

ग्लाडस्टन परलोकवासी झाल्याचें कळल्याबरोबर त्यांच्या कुटुंबातल्या माणसांस, मोठमोठ्या माणसांकडून आणि संस्थांकडून दुखवट्याच्या तारा आणि पत्रें हीं इतकीं आलीं कीं, त्यांची जणुं काय वृष्टि झाली. त्यांच्या राशींच्या राशी पडल्या. त्या सर्वांस उत्तरें देणें हें, रीतीप्रमाणें आवश्यक होतें, परंतु अगदीं अशक्य होतें. ह्मणून ग्लाडस्टन ह्यांच्या पत्नीनें, वर्तमानपत्रद्वारें मोघमपणें त्या सर्वांचे आभार मानिले. दुसरा उपायच नाहींसा झाला. त्या तारांपैकीं कांहींची छाया येथें मासल्याकरितां देतोंः—

**महाराणी विक्टोरिआ ह्यांजकडून पत्नीस**—तुमचे पति समाधिस्थ झाले आहेत, त्यामुळें आमचें सगळें मन तुह्मांकडे लागलें आहे. आजचा त्यांचा प्रेतसंस्कार तुह्मांस अत्यंत दुःखप्रद होणार आहे. तथापि, आमच्या कारकीर्दीमध्यें ते अत्युत्तम सदाचारी आणि अत्युत्तम बुद्धिवान् ह्मणून नामांकित होऊन गेले, ह्मणून त्यांस आमच्या सगळ्या प्रजाजनांकडून जो मोठा मान मिळत आहे, आणि त्यांच्या मृत्यूमुळें जें फार दुःखप्रदर्शन होत आहे, तो मान आणि तें दुःखप्रदर्शन पाहून तुमच्या जीवास किंचित् समाधान वाटेल. आमच्या स्वतःच्या आणि आमच्या कुटुंबाच्या कल्याणाविषयीं ते फार काळजी वाहत असत आणि फार श्रम करीत असत. हे उपकार आह्मांस निरंतर आठवतील.

**लार्ड सालसबरी** ह्यांजकडून **चिरंजीवांस**—आपल्या तीर्थरूपांस फार वेदना होत होत्या, आणि आमचें सगळें राष्ट्र त्या पाहून दुःखी होत होतें. त्या वेदनांपासून ते मुक्त झाले आहेत, हें मनांत आणून त्यांच्या मरणाचें दुःख मी करीत नाहीं. तुह्मांप्रमाणें आणि तुमच्या मातुश्रीप्रमाणें ह्या अनर्थापासून मला फार दुःख झालें आहे.

**फ्रान्सांतल्या प्रजासत्ताक राज्याच्या अध्यक्षांकडून पत्नीस**—आपली झालेली हानि मला आतांच समजली. आपणाबरोबर जीं माणसें

दुःख करीत आहेत, त्यांतच मी एक आहें. आपल्या आचरणाच्या अत्युच्च औदार्यानें आणि राजकारस्थानाच्या अत्यंत उदात्त अशा आपल्या विचारानें ग्लाडस्टन ह्यांनीं आपल्या स्वतःच्या देशावर आणि सगळ्या मनुष्यजातीवर मोठे उपकार केले आहेत.

**चीनच्या बादशाहाच्या मुख्य प्रधानांकडून पत्नीस**—आपणांवर दुःखाचा डोंगर कोसळला आहे, त्याचा विभागी मी आहें. आपले यजमान हे जुलुमापासून रक्षण करणारे एक मोठे बुरूज होते, आणि न्याय आणि दया ह्यांची केवळ मूर्ति होते.

**अमेरिकेंतल्या स्वतंत्र संस्थानांच्या अध्यक्षांच्या** वतीनें त्यांच्या वकीलाकडून.—वयोवृद्ध होऊन आणि सगळे मानपान मिळवून, ग्लाडस्टन हे निजधामास गेल्याचें जें आपणास दुःख झालें आहे, त्याचे वांटेकरी अमेरिकेंतले लोक झाले आहेत. अलीकडच्या राजकारणांत त्यांची मूर्ति ही खरोखर अत्यंत उदात्त होती.

**लार्ड लेफ्टनेंट आफ् ऐरलंड** ह्यांजकडून चिरंजीवांस—ग्लाडस्टन ह्यांच्या पत्नीस आणि कुटुंबांतल्या बाकीच्या सर्व माणसांस जें ह्या प्रसंगीं दुःख झालें आहे, त्याचा वांटेकरी मी होतों. आपणांस दुःख झालें आहे, ह्याचें मला फार वाईट वाटतें.

**जस्टिन मेकार्थी** (इतिहासकार) ह्यांजकडून **चिरंजीवांस**— आपल्या वडिलांच्या मृत्यूच्या योगानें मला पराकाष्ठेचें दुःख झालें आहे! तुमच्या सर्वांच्या दुःखाचा वांटेकरी मी होतों. इंग्लडांतला सर्वांत मोठा राजकारस्थानी पुरुष गेला. ऐरलंडाचा मोठा पुरस्कर्ता गेला.

**ड्यूक आफ् कनाट** ह्यांजकडून **चिरंजीवांस**—मोठे महात्मे आपले कीर्तिमान् तीर्थरूप परलोकवासी झाले, त्यानें आपणां सर्वांस फार दुःख झालें आहे, आणि सगळ्या राष्ट्रांची मोठी हानि झाली आहे, त्याबद्दल मला आणि डचेस आफ् कनाट ह्यांस फार वाईट वाटत आहे. आम्ही आपल्या दुःखाचीं वांटेकरी होतों.

**रशियाच्या बादशाहाकडून—पत्नीसः**—ग्लाडस्टन साहेब निवर्तल्याचें वर्तमान मला आतांच समजलें. त्याच्या योगानें मला फार वाईट वाटतें आहे. हा मृत्यूनें फार मोठा आणि अपरिहार्य असा घात केला आहे. हें दुःख सगळ्या विद्याचारसंपन्न जगास होणार आहे. कां कीं, ग्लाडस्टनसाहेबांचें मनच तसें भूतदयापरिप्लुत आणि शांतिप्रसारक होतें.

**बेलजियन लोकांच्या राजाकडून पत्नीस**—ग्लाडस्टन ह्यांच्या मरणामुळें मला आणि आमच्या राणीसाहेबांला फार दुःख झालें आहे. बेलजियन लोकांचा कळवळा त्यांस किती होता, तें आह्मी जाणतों. त्या कळवळ्याचें प्रमाण पुष्कळ वेळां पटलें आहे. असो.—आह्मी तुमच्या दुःखाचीं वाटेकरी होतों.

**नामदार प्रिन्स आफ् वेल्स** ह्यांजकडून **चिरंजीवांसः**—तुह्मां सर्वांविषयीं मन अतिशयित दुःखित झालें आहे. तुमच्या मातुश्रींस हें दुःख सहन होवो, एवढीच आशा आहे.

**नामदार प्रिन्स आफ् वेल्स** ह्यांजकडून **पत्नीस**—दुस्सह दुःख सोसण्यास आपणांस देवानें सामर्थ्य द्यावें, एवढेंच मागणें आहे. परंतु, ते आतां ह्या जगाच्या त्रासांपासून सुटले आहेत—शांतींत गेले आहेत—हें आपल्या मनाला केवढें समाधान आहे!

**ग्रीसच्या राजाकडून**— ग्लाडस्टन हे फार मोठे राजकारस्थानी पुरुष होते. ह्यांचे उपकार ग्रीसदेशावर फार झाले आहेत, ते ग्रीस निरंतर आभारपूर्वक आठवील. कधीं विसरणार नाहीं. प्रजाजनांच्या इच्छा पूर्ण होण्यास त्यांचा मोठा आधार होता. ह्या देशांत त्यांचें नांव नेहमीं प्रिय आणि स्मरणीय राहील.

**इटालींतले मुख्य प्रधानांकडून**—जी मोठी हानि सध्या इंग्लंडाची झाली आहे, तिजबद्दलच्या दुःखाचा वांटा, ज्यांना ह्मणून स्वातंत्र्याची आवड आहे, तीं सगळीं राष्ट्रें घेत आहेत. ग्लाडस्टन ह्यांनीं इटालीवर जे उपकार केले आहेत, ते इटाली विसरली नाहीं, आणि कधीं विसरणार नाहीं. त्या उपकारांनींच इटालीस स्वातंत्र्य मिळालें आहे.

ग्लाडस्टनांचें प्रेत वेस्ट मिनिस्टर आबेमध्यें ठेविलें होतें. त्याच्या दर्शनास एका दिवसांत १७०००० माणसें गेलीं होतीं, आणि प्रेतसंस्कार एकाद्या मोठ्या बादशाहाच्या प्रेतसंस्कारासारखा सरकारच्या खर्चानें झाला. त्यास ३००००० लोक आले होते. त्यांत इंग्लंडांतलीं तर सगळीं मोठीं माणसें होतींच, परंतु त्यांस शेवटचा मान देण्याकरितां आणि त्यांच्या देहावशिष्टाचें दर्शन घेण्याकरितां मोठमोठ्या देशांच्या राजांचे वकील आले होते. ते देश ह्मणजे रशिआ, इटाली, डेन्मार्क, बेलजम, आणि स्वीडन हे होत.

ह्यांचें प्रेत वेस्टमिनिस्टर आबे ह्या देवालयांत पुरलें, तेव्हां त्यांची वृद्ध पत्नी त्याजकडे पाहात जवळ बसली होती, आणि तिचीं मुलें जवळ होतीं. प्रिन्स आफ् वेल्स, प्रिन्सेस आफ् वेल्स, ड्यूक आफ् यार्क, लार्ड साल्सबरी, लार्ड रोजबरी, अशीं मोठमोठ्या योग्यतेचीं मोठीं मोठीं माणसें भोंवतीं, अत्यंत दुःखित होत्सातीं अश्रु ढाळीत होतीं, आणि मृताच्या परलोकसुखार्थ परमेश्वरप्रार्थना त्यांच्या अंतःकरणांत चालली होती, असें त्यांच्या चर्यांवर स्पष्ट दिसत होतें. शवगर्तेमध्यें पेटी उतरल्यावर नामदार प्रिन्स आफ् वेल्स, नामदार ड्यूक आफ् यार्क इत्यादि सगळी मंडळी दुःखसागरांत बुडालेल्या त्या विधवा बाईजवळ जाऊन, मोठ्या प्रेमानें आणि सन्मानानें त्यांच्या हस्ताचें चुंबन करून, आणि त्यांस सांत्वनाचे दोन शब्द बोलून, हळू हळू तेथून निघून चालली, आणि मग त्या खरोखर अनाथ झालेल्या विधवा बाईला, त्यांच्या उभयतां मुलांनीं हात देऊन उठविलें आणि बाहेर नेलें. ह्या वेळचें वर्णन इंग्लिश वर्तमानपत्रांत फारच हृदयद्रावक केलें आहे.





# भाग नववा.

## स्वभावाचें वर्णन.

सदा प्रीती चित्तीं विनय मधुरा वाणिहि सदा
स्वभावें कल्याणी मतिपरिचया भेद न कदा
पुढें किंवा मागें मनिं रसविपर्यास नसती
चरित्रें साधूंचीं अकपट विशुद्धेंचि असती.

**भर्तृहरि.**

वांच्छा सज्जनसंगमीं गुरुकुळीं वंदारुता नम्रता
निंदेचें भय तुष्टता परगुणीं स्वस्त्रीसुखीं लुब्धता
विद्याभ्यास महेशभक्ति खलसंसर्गीं अनासक्तता
चित्ताचा जय या गुणांस निधि जे त्यां वंदिजे तत्वतां.

**वामन.**

एकाद्या अंधेराच्या जागीं दिवा आणिल्यावर तेथें प्रकाश आणण्यास वेगळे श्रम करावे लागत नाहींत. अथवा, परमेश्वराची कृपा झाल्यावर त्यापाशीं सुख मागण्याची वेगळी प्रार्थना करावी लागत नाहीं. त्याप्रमाणें, मनुष्याच्या कृत्यांचें वर्णन केलें, ह्मणजे, त्याचा स्वभाव कसा होता हें वेगळें सांगावयाचें कारण राहात नाहीं. कां कीं, मनुष्याच्या कृतींत गुप्तत्वानें त्याचा स्वभाव विद्यमान असतो. हें खरें आहे. तरी, इतिहासाचा अत्युत्तम उपयोग ह्मटला ह्मणजे नीतिबोध होय. तो विशेष स्पष्ट रीतीनें वाचकांच्या लक्षांत आणून देण्यास चरित्रनायकाच्या स्वभावाचें वेगळें वर्णन करण्याचा परिपाठ सुज्ञ ग्रंथकारांनीं घातला आहे. तो फार चांगला आहे. त्यास अनुसरून, ग्लाडस्टनांच्या स्वभावाच्या संबंधानें दोन शब्द येथें लिहिणें उचित दिसतें.

तेजस्विता हा गुण ग्लाडस्टन ह्यांच्या स्वभावांत विशेष होता. तो गुण त्यांच्या वयाबरोबर वाढत गेला. तो अखेरपर्यंत टिकला. त्याचें प्रमाण हेंच कीं, हे इटनच्या शाळेंत होते, आक्सफोर्डच्या विश्वविद्यालयांत होते, पार्लमेंटांत एकसष्ट वर्षें होते, त्यांत महाराणी सरकारच्या दिवाणगिरीवर कितीएक वर्षें होते, त्या सगळ्या मुदतींत त्यांनीं आपणांवर कोणाची छाप बसूं दिली नाहीं, एवढेंच केवळ नव्हे, तर ह्या सगळ्या ठिकाणच्या मंडळीवर त्यांनीं आपली छाप ठेविली. हे शाळांत गेल्याच्या योगानें जशी त्या शाळांची नीतिमत्ता वाढली, तशी, इंग्लिश दरबारचीही नीतिमत्ता ह्यांच्या दरबारी कृत्यांच्या योगानें वाढली आहे, असें बहुतेक इंग्लिश लोकांचें ह्मणणें आहे.

ग्लाडस्टन ह्यांच्या चरित्राकडे सूक्ष्म दृष्टीनें पाहून विचार केला ह्मणजे असें दिसतें कीं, त्यांच्या स्वभावास जो काय इतका श्रेष्ठपणा आणि चांगुलपणा प्राप्त झाला होता, त्यास मुख्य कारण त्यांची धर्मनिष्ठा होती. त्यांच्या अंतःकरणांत धर्मनिष्ठेइतकें प्राबल्य दुसऱ्या कोणत्याही वृत्तीचें नव्हतें. त्यांच्या इतर वृत्तींस त्यांची धर्मश्रद्धा आपल्या इच्छेप्रमाणें वागायास लावीत असे. जें काय ते करीत, तें धर्मश्रद्धापूर्वक करीत. त्यांची धर्मश्रद्धा जबरदस्त होती. मोठी बळकट होती. ती आरंभापासून अखेरपर्यंत कधीं एक तिळभर ढळली नाहीं. विद्याभ्यास पुरा झाल्यावर त्यांच्या मनांत धर्मप्रचारक व्हावयाचें फार होतें; परंतु, वडिलांच्या अभिरुचीस्तव त्यांनीं सार्वजनिक देशहिताचा व्यवसाय धरिला,हें वर सांगितलेंच आहे. असा जरी व्यवसायाचा बदल त्यांनीं वडिलांच्या मर्जीखातर केला होता, तरी, त्यांनीं जीं काय कामें केलीं, त्यांत त्यांच्या आवडीच्या व्यवसायाची छाया स्पष्टपणें दृश्यमान होते. आणि असें वाटतें कीं, त्यांस त्यांच्या कार्यांत जें काय यश आलें, आणि त्यावरून त्यांचें जें एवढें देव्हारें लोकांत वाढलें, त्यास कारण त्यांची धर्मनिष्ठा होती. आणखी दुसरें असें वाटतें कीं, ह्यांच्या ठायींची काय आणि त्यांच्या सारख्या दुसऱ्या महापुरुषांच्या ठायींची काय, धर्मश्रद्धा जी असते, ती नेहमीं इतर वृत्तींपेक्षां प्रबल असते, आणि ती इतर वृत्तींस आपल्या अर्ध्या वचनांत

वागविते, ह्याचें मुख्य कारण असें कीं, तीस आधार परमेश्वरी कृपेचा असतो. एके वेळीं डीन चर्च ह्यांनीं एका धर्मोपदेशकास ग्लाडस्टनां-विषयीं असें सांगितलें कीं, "ते कोणतेंही मोठें काम करूं लागतात, तेव्हां देव आपणांसमोर प्रत्यक्ष उभा आहे, असें समजतात." त्याप्रमाणेंच ग्लाडस्टन ह्यांनीं अमेरिकेंतल्या आपल्या एका ओळखीच्या गृहस्थास उत्तर लिहिलें, त्यांत ह्मटलें आहे "जें कांहीं मी लिहितों, आणि ज्याचा मी विचार करितों, आणि ज्याची मला आशा लागलेली आहे, त्या सगळ्यास आधार आमच्या प्रभूच्या देवत्वाचा आहे. आणखी आमच्या ह्या अनाथ पतित मानवजातीस जी काय आशा ह्मणून आहे, ती तेवढीच आहे." ह्यावरून आमच्या ह्मणण्याचा आशय चांगला लक्षांत येण्यासारखा आहे. त्यांनीं एकंदर लहान मोठीं तीनशें पुस्तकें लिहिलीं. त्यांत धर्मसंबंधाचीं पुष्कळ आहेत. त्यांचीं भाषणें ज्यांनीं प्रत्यक्ष ऐकिलीं आहेत, त्यांनीं कितीएक ठिकाणीं असें स्पष्ट लिहिलें आहे कीं, त्यांत धर्मश्रद्धेचा संबंध जेथें जेथें येत असे, तेथें तेथें त्यांचे भाषणास अप्रतिम रस येत असे. तितका आवेश दुसऱ्या कोणत्याही भावनेच्या योगानें आला नाहीं. आणखी त्यांच्या पार्लमेंटाच्या कारकीर्दींत आणि सरकारी कामांत लोकांस जें काय लोकोत्तर दिसलें, आणि ज्याच्या योगानें त्यांच्यांवर कितीएक वेळां संकटें आलीं होतीं, तें सगळें हें धर्मनिष्ठत्व होतें.

धर्मश्रद्धेच्या खालोखाल त्यांची मोठी प्रबल वृत्ति ह्मटली ह्मणजे अधिकाराची आवड होती. त्यांना, साधारण व्यवहारांत, राज्यकारभारांत, आणि धर्मप्रकरणांत देखील, अधिकार फार हवासा वाटे. तो, लोकांत प्रतिष्ठा मिळविण्याकरितां, द्रव्यप्राप्तीकरितां, किंवा आत्मस्तुतीच्या लाभाकरितां हवा असे असें नाहीं. ह्या मनोभावांची छाया देखील त्यांच्या अंतःकरणांत कधीं पडली नाहीं. तर, त्यांना जो अधिकार हवासा वाटे, तो एवढ्याचकरितां कीं, त्याच्या योगानें आपणांस देवाचा गौरव आणि मनुष्यजातीची सेवा, हीं दोन्ही चांगल्या प्रकारें करितां यावीं. आणखी ही त्यांची भावना कितीएक प्रसंगीं प्रगट झाली आहे.

ग्लाडस्टन हे सर्वांत, देशांतल्या दोन गोष्टींस अतिशयित जपत असत. संपत्ति आणि धर्म. आणि खरोखरच, हींच दोन साधनें क्रमशः प्रपंच आणि परमार्थ हे साधण्यास मुख्यत्वेंकरून उपयोगीं पडतात. देशांतल्या संपत्तीला ते किती जपत होते, तें त्यांच्या जमाखर्चाच्या खरड्यांवरून चांगलें व्यक्त झालें. इंग्लंडाच्या जमाखर्चाची व्यवस्था, लोकांवर करांचा बोजा न लादतां, आणि उलटे कर कमी करून ह्यांनीं जितकी केली, तितकी आजपर्यंत कोणासही करितां आली नाहीं, असें मोठमोठ्या अर्थशास्त्र्यांचें मत आहे. त्याप्रमाणेंच, राजकारणी पुरुषांच्या अंतःकरणांत धर्मश्रद्धा दृढ असल्यानें, एकंदर सगळ्या देशाच्या कारभारास, कारभारी लोकांस, आणि तत्संबंधाच्या इतर संस्थांस एक प्रकारचें उच्चत्व कसें प्राप्त होतें हेंही ह्यांच्या कारकीर्दीवरून कळलें आहे. आणखी, ह्या सगळ्या कृत्यांत त्यांच्या अंतःकरणाची पवित्रता ज्ञानचक्षूस दृश्यमान होते. तिच्या योगानें, ज्यांनीं ह्यांना कधीं पाहिलें नव्हतें, त्यांच्या मनांत देखील, केवळ ह्यांच्या लौकिकावरून, अत्यंत पूज्यबुद्धि उत्पन्न झाली होती. ग्लाडस्टन ह्यांस पाहाणें—त्यांचें दर्शन होणें हें देखील मोठें भाग्य आहे, असें लोक मानीत असत. ते खेड्यापाड्यांत जात तेव्हां लोक त्यांचें छबीने काढीत असत. हें महाभाग्य होय !

नम्रता हा गुण त्यांचे ठायीं अप्रतिम होता. लोक जरी त्यांस देवासारखे भजत, तरी ते स्वतः त्यांशीं अति नम्रपणानें आणि प्रेमभावानें वागत. मी कोणी मोठा आहें, असें त्यांच्या मनाला कधीं शिवलेंच नाहीं. त्यांचा पत्रव्यवहार मोठमोठ्या राजांशीं असे. तरी अगदीं गरीबाच्या पत्रास उत्तर देण्यास ते कधीं चुकले नाहींत कीं कंटाळले नाहींत. त्यांच्या एका वाढदिवसाच्या दिवशीं एका गरीब रोगी बाईनें आपली पूज्यता प्रगट करण्याकरितां, लोंकरीची विणून पुस्तकांत घालावयाची एक लहानशी खूण पाठविली. तींत "पवित्र शास्त्र हा आपला वाट दाखविणारा आहे" असें विणिलें होतें. तो नजराणा ग्लाडस्टन ह्यांस मोठा मोलवान् वाटला. त्यांनीं त्याचा स्वीकार मोठ्या आदरानें करून, त्या बाईस, तिच्या उपयोगीं पडण्यासारख्या कांहीं वस्तु बक्षीस पाठविल्या, आणि त्यांबरोबर

स्वदस्तूरचें एक पत्र पाठविलें. त्याचें तात्पर्य असें:—"तुह्मी दुखणाईत असतां मजकरितां पुस्तकांत घालायाची खुणा इतक्या ममताळूपणानें विणिली, ह्याचें मला मोठें नवल वाटतें, आणि त्याबद्दल मी तुमचा फार आभारी आहें. त्या खुणेंत दर्शविल्याप्रमाणें, तुमच्या इच्छेनुरूप, पवित्रशास्त्र हें मला वाट दाखविणारें होवो, तसें तें, ह्या प्रपंचमार्गांत, तुह्मांसही मार्ग दाखविणारें होवो, असें मी मनापासून इच्छितों. ह्या मार्गांत मी जर तुमच्या पुढें गेलों नाहीं, तर तुमच्या मागून मला लवकरच यावयाचें आहे."

ग्लाडस्टन हे विलक्षण बुद्धिवान् होते. त्यांचें अवलोकन अगाध होतें, आणि तें त्यांस पाहिजे तेव्हां पाहिजे तितकें आठवत असे. तरी त्यांस असें वाटे कीं, आपण बाकीच्या माणसांप्रमाणेंच आहोंत. आणि कोणत्याही एकाद्या विषयाचा विचार चाललेला असला ह्मणजे ते त्याविषयीं कोणांशींही बोलत, वादविवाद करीत, आणि त्यांचें मत विचारीत. तेव्हां त्या माणसांस संकोच होई. पण ह्यांस त्याचें कांहीं वाटत नसे. लहान मोठें, जाण, अजाण, कोणत्याही प्रकारच्या माणसाशीं गांठ पडो; त्याशीं अगदीं मोकळ्या मनानें आणि निष्कपटपणानें बोलावयाचें, आणि त्याजपासून कांहींतरी नवी माहिती मिळवायाची, असा त्यांचा नित्याचा परिपाठ असे. इतकें होतें, तरी ते मनुष्य होते. तेव्हां जे कोणी त्यांच्या विरुद्ध बोलत, किंवा त्यांस अडवीत, त्यांपेक्षां त्यांच्या ह्मणण्यास होय होय ह्मणून माना डोलवीत, ते त्यांस अंमळ अधिक प्रिय वाटत, आणि त्यावरून ते त्यांना शाबास ह्मणत. त्याच्या योगानें ते चढत, ह्या त्यांच्या वृत्तीच्या संबंधानें बिशप बिलबरफोर्स हे ह्मणत कीं, "ह्यांना माणसाची पारख नाहीं. त्याच्या पायीं, लबाड लोक आपल्या मतलबाकरितां, जें काय सांगतात, त्यावर हे विश्वास ठेवितात, आणि त्यामुळें फसतात."

ग्लाडस्टन हे मोठे पापभीरु होते. ते स्वतः पाप करीत नसत. आणि दुसऱ्यांस पापकर्मापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न करीत असत. लहानपणीं अविचारानें वांकडें पाऊल पडल्यामुळें ज्या बायका वेश्या झालेल्या आहेत, त्यांस उपदेश करून मार्गावर आणण्याची खटपट हे करीत

असत. त्या कामाविषयीं त्यांना कांहीं हलकेपण वाटत नसे. त्या उद्योगांत पदरचा पैसा खर्चण्यास ते तयार असत.

"दुरून डोंगर साजरे आणि जवळ जातां दरेखोरे" असें पुष्कळ माणसांचें आढळतें, पण ग्लाडस्टनांचें तसें नव्हतें, तर त्याच्या उलट होतें, असें, त्यांचे विशेष परिचित आणि त्यांचें चरित्र लिहिणारे जे रसेल ह्मणून गृहस्थ आहेत, त्यांचें ह्मणणें आहे. त्यांनीं असें सांगितलें आहे कीं, "ग्लाडस्टन ह्यांचीं भाषणें पार्लमेंटांत आणि सभांत ऐकून, त्यांजविषयीं पूज्यबुद्धि उत्पन्न होतेच. पण त्यांच्या घरीं त्यांचें वर्तन पाहावें, त्यांचा साधेपणा पाहावा, आणि त्यांचीं धर्मश्रद्धा पाहावी, ह्याच्या योगानें जी पूज्यबुद्धि उत्पन्न होते, ती कांहीं विलक्षण असते."

धैर्य हा एक फार मोठा गुण ग्लाडस्टन ह्यांचे ठायीं होता. आणि तो गुण त्यांस फार आवडत असे. लार्ड बीकान्सफील्ड ह्मणजे ह्यांचे मोठे प्रतिस्पर्धी, त्यांचें स्मारक सरकारच्या खर्चानें करावें, असें पार्लमेंटास सुचविण्याकरितां बोलत असतां, त्यांच्या राजकीय कामांतल्या धैर्याचें वर्णन त्यांनीं फार केलें. आणि आपल्या सगळ्या कामांत तो गुण त्यांनीं चांगला दाखविला. पार्लमेंटामध्यें ऐरिश प्रकरणांवरून आणि होमरूलावरून त्यांचा कितीदां तरी हिरमोड झाला. तरी त्यांचें धैर्य तिळमात्रही खचलें नाहीं. भयानें मन कचरावें, विघ्नांनीं छाती दडपावी, अथवा पुढचा लांबचा पल्ला पाहून पाय मोडावे, हें त्यांस मुळीं ठाऊकच नव्हतें. सत्कार्य आहे अशी खातरी झाली ह्मणजे तें करायास लागायाचें, मग त्यांत कांहीं होवो, असें त्यांचें असे. त्यांचें ह्मणणें असें असे कीं, त्यांत जर अपयश आलें, तर सत्कार्यांत अपयश आलें असें होणार आहे, त्या कार्यास कोणी असत्कार्य ह्मणणार नाहीं, एवढें पुरे आहे. सत्कार्य ह्मटलें कीं त्यांत येईल तें सगळें यशच, त्यांत अपयश मुळींच असावयाचें नाहीं, असा त्यांचा समज असे. काशीस जाऊन मरण्याकरितां जुनीं भाविक माणसें घराहून निघत, आणि त्यांस कधीं कधीं वाटेंतच मृत्यु गांठी, तरी, त्यांस काशींत मेल्यासारखें समाधान वाटे, तसें सत्कार्या-

विषयीं ग्लाडस्टनांचें ह्मणणें होतें. सत्कार्यांत त्यांस जों जों अधिकाधिक अपयश येई, तों तों त्यांस तें कार्य सिद्धीस नेण्याची उमेद अधिकाधिक चढे.

आणखी एक फार विलक्षण गुण ग्लाडस्टन ह्यांच्या ठायीं होता. त्याच्या योगानें त्यांच्या आंगच्या महाशक्तींचा फार उपयोग झाला. तो गुण हा कीं, कोणत्याही मताच्या अभिमानास पडावयाचें नाहीं. ज्या वेळीं जसें ज्ञान होईल, त्या वेळीं, त्या ज्ञानावरून जें योग्य वाटेल, तें बेलाशक करावयाचें, त्याविषयीं, कोणास लाजावयाचें नाहीं कीं कोणाची भीड धरावयाची नाहीं. किंवा पूर्वीं मी असें ह्मणत होतों, आणि आतां त्याच्या उलट असें कसें ह्मणूं, हें त्यांच्या मनाला कधीं शिवलें नाहीं. इ० स० १८३२ त ते पार्लमेंटाचे सभासद झाले. तेव्हां त्यांस, ख्रिस्ती शास्त्राच्या आधारावर, गुलामगिरी ही योग्य आणि आवश्यक वाटे, त्याप्रमाणेंच, सभासद निवडण्याच्या कामांत लोक लांच खात, तो त्यांस त्यांचा दोष वाटत नसे. कां कीं तें पाप आहे, असें त्या लोकांस कळत नव्हतें, असें ते ह्मणत. तेच पुढें ह्या समजुतींच्या उलट किती झाले होते, आणि होमरूलबिलांत त्याची कशी शिकस्त झाली होती, ह्याचें वर्णन झालेंच आहे. त्यांत कांहीं आह्मांला नवल वाटत नाहीं. जस्टिन मेकार्थी ह्मणतात, "ते निरंतर सत्यसूर्याकडे जाण्यास जीवाची काढाओढ करीत होते." त्यांत जें साहाजिक रीतीनें झालें तें झालें. त्यांत त्यांनीं बुद्ध्या कांहीं केलें नाहीं. हेंच खरें होतें. होमरूलाला ते अनुकूल असतील, अशी शंका देखील प्रथम कोणाला आली नाहीं, आणि मग इ. स. १८८६ ह्या वर्षीं जेव्हां ते त्याचे मोठे पक्षपाती ह्मणून पुढें आले, तेव्हां, त्यांच्या जिवलग मित्रांस विलक्षण आश्चर्य वाटलें. परंतु, वास्तविक पाहिलें असतां, त्यांत नवल वाटण्यासारखें कांहीं नव्हतें. एकाद्या पदार्थावर प्रकाश अंधक पडलेला असतां तो पदार्थ आपणास अमुक एक वाटला, ह्मणून आपण त्याचें तें नांव सांगितलें. परंतु, अधिक प्रकाश पडल्याच्या योगानें तो पदार्थ विशेष स्पष्ट दिसून जर, तो पदार्थ दुसराच कांहीं आहे असें समजलें, आणि तशी खातरी झाली, तर, तसें सांगण्यांत अभिमान धरणें, ह्यांत विचित्र तें काय आहे? मनुष्यस्वभावाच्या सरळत्वास

अत्यंत ग्राह्य आणि योग्य तेंच हें आहे. तें खरोखर साधुपण आहे. पण ह्यांत थोडें उतावळेपण किंवा अल्पधीरपण दिसतें. पण तें भक्तिमान् अंतःकरणास साहाजिक आणि स्वाभाविक असतें, असें वाटतें. कां कीं, त्यांस आयुष्य अल्प वाटत असतें, त्यामुळें जें सत्कर्म सुचेल, तें एकदा लवकर करण्याविषयीं त्यांस अतिशयित उत्कंठा होत असते. पंतांनीं परमेश्वरास ह्मटलें आहेः—

**ह्मणा मज उताविळा गुणचि घेतला घाबरें**
**असो मन असेंचि बा भजकबर्हिमेघा बरें**
**दिसे क्षणिक सर्व हें भरंवसा घडीचा कसें**
**धरील मन आधिनें बहुपरि भ्रमे चाकसें.**

**केका.**

ह्मणून ग्लाडस्टन ह्यांस जसजसें अधिकाधिक ज्ञान होत गेलें, तसतशीं त्यांचीं मतें आणि त्यांच्या कृति हीं पालटत गेलीं, ह्यांत कांहीं विशेष नाहीं, आणि वाईटही नाहीं. अस्थैर्याचा दोष ह्यास कोणी देतात. पण तो सत्यशील आणि भक्तिमान् अंतःकरणास अनिवार्य आहे. त्याविषयीं कोणीं कोणास नांवें ठेवूं नयेत. आणखी—

**शास्त्र ह्मणेल जें सांडावें तें राज्यही तृण मानावें**
**जें घेववी तें न ह्मणावे विषहि विख.**

**ज्ञानदेव.**

अशी त्यांची दृढ वृत्ति होती. त्यांनीं इ० स० १८८७ तल्या आपल्या भाषणांत स्पष्ट ह्मटलें आहे कीं "अगदीं आरंभीं पार्लमेंटांत मीं जीं मतें दिलीं आहेत, त्या सगळ्यांचविषयीं नाहीं, पण त्यांतल्या पुष्कळांविषयीं मला आतां फार वाईट वाटतें. मला त्या वेळीं पुष्कळ शिकायाचें होतें, आणि थोडें बहुत विसरायाचें होतें, हें माझ्या लक्षांत येण्यास फार वेळ लागला नाहीं. आणि पुढें जसजसा माझ्या अंतःकरणांत ज्ञानसूर्याचा प्रकाश पडून मला सुमार्ग दिसूं लागला, तसतसा त्या मार्गानें मी पुढें पुढें जाऊं लागलों." तेव्हां त्यांनीं जो हा क्रम धरिला होता, तो चांगल्या समंजस माणसास शोभण्यासारखा होता, ह्यांत कांहीं संशय नाहीं.

मनुष्याच्या ठायीं जे स्वाभाविक गुण असतात, ते वाढण्यास तशीं माणसें सुदैवानें मिळालीं ह्मणजे त्यांचा फारच गौरव होतो. ग्लाडस्टन ह्यांचा विवाह इ० स० १८३९ ह्या वर्षी झाला. त्या वेळापासून त्यांचें प्राणोत्क्रमण होईपर्यंत त्यांची पत्नी त्यांस जितकी उपयोगीं पडली, तितक्या फारच थोड्या बायका आपल्या नवऱ्यांच्या उपयोगीं पडल्या असतील. ती बायको आधीं चांगली शिकलेली, आणि फार सात्विक होती. ती अत्युत्तम पतिव्रता होती. आपल्या पतीस साह्य करणें ह्याशिवाय ती दुसरें कांहीं जाणत नसे. ग्लाडस्टन ह्यांचें सगळें लक्ष नेहमीं सार्वजनिक कामांत गुंतलेलें असे. आणि तेंच आपलें मुख्य कर्तव्य आहे असें त्यांस वाटत असे. त्याकरितां घराचा पसारा जरी एवढा मोठा होता, आणि त्यांस सात मुलें होऊन त्यांचें संगोपन यथास्थित झालें, तरी तें सगळें काम ग्लाडस्टन ह्यांच्या पत्नीनें उत्तम प्रकारें संभाळिलें होतें. त्याकडे स्वतः ग्लाडस्टन ह्यांस कधीं फारसें लक्ष द्यावें लागलें नाहीं. त्याच्या योगानें ग्लाडस्टन ह्यांस आपलें सगळें मन सार्वजनिक कामास अर्पण करायास सांपडलें. ही गोष्ट त्यांनीं प्रसंगोपात्त मोठ्या आनंदानें आणि कृतज्ञपणानें चार मंडळींत कबूल करावी. पार्लमेंट सभादिकांच्या हंगामांत, सार्वजनिक कामाची झिंबड, ग्लाडस्टन ह्यांच्या मागें एवढी असे कीं, त्यांस आपल्या पत्नीजवळ दोन शब्द बोलायास देखील फुरसत सांपडत नसे. अशा प्रसंगीं ग्लाडस्टन हे कोठें मेजवानीस गेले, तर त्यांची पत्नी त्यांच्या जवळ पान साधीत असे. तें एवढ्याकरितांच कीं, तेव्हां तरी दोन शब्द बोलायाची थोडी संधी मिळावी! पुष्कळ माहीतगार लोक असें ह्मणतात कीं, ग्लाडस्टन ह्यांची पत्नी जर मध्येंच थकती, किंवा तिच्यानें प्रपंच इतका आंवरला नसता, तर, ग्लाडस्टन ह्यांस सरकारचें काम, त्यांनीं सोडलें, त्याच्या पुष्कळ आधीं सोडावें लागलें असतें. एवढेंच केवळ नव्हे, तर ते इतके दिवस कदाचित् जगलेही नसते. आणखी, त्यांच्या कुटुंबामध्यें कधीं भांडणतंटा किंवा फुटाफूट झाली नाहीं. सगळें गाडें सुयंत्र चाललें, ह्यास कारण त्यांच्या पत्नीचेंच कर्तृत्व होतें. ह्या प्रसंगीं येथें—

**कार्येषु मंत्री करणेषु दासी**
**भोज्येषु माता शयनेषु रंभा**
**धर्मानुकूला क्षमया धरित्री**
**भार्या च षाड्गुण्यवतीह दुर्लभा.**

ह्याचें स्मरण झाल्यावांचून राहत नाहीं.

ग्लाडस्टन ह्यांस ग्रंथांचा शौक मनस्वी होता. असें ह्मणतात कीं त्यांजपाशीं नेहमीं कांहीं तरी एक पुस्तक असे. पुस्तक जवळ नाहीं असे ते कधीं कोणास आढळले नाहींत. ते पार्लमेंटांत येण्याच्या आधीं देखील जरा वेळ सांपडला कीं नेहमीं कांहीं तरी पुस्तक वाचीत असत. फार काय सांगावें, बोलतां बोलतां कांहीं कामानिमित्त जवळचा माणूस उठून गेला, तर, तो परत येईपर्यंतच्या वेळांत वाचण्यास त्यांच्या खिशांत लहानसें पुस्तक असे. ते पुस्तकें वाचीत, तीं "नळी फुंकिली सोनारें, आणि इकडून तिकडे गेलें वारें" अशीं वाचीत नसत. तर, त्यांनीं वाचलेल्या सगळ्या पुस्तकांवर, फार चांगलें काय वाटलें, काय आवडलें नाहीं, काय चुकलें, इत्यादि भेद दाखविण्यासाठीं त्यांच्या ठरलेल्या खुणा, स्पष्टपणें केलेल्या दृष्टीस पडतात. आणि ते जें काय वाचीत, तें त्यांस पाहिजे तेव्हां बिनचूकपणें आठवत असे. त्यांत त्यांस कधीं शंका येत नसे. त्यांस नानाप्रकारचे विषय येत असत. आणि तितक्या प्रकारचीं पुस्तकें त्यांस आवडत. तीं विकत घेण्यास, ते नेहमीं उत्सुक असत. पुस्तकें विकणारांत त्यांचा मोठा लौकिक होता. त्यांच्या संग्रहीं हार्डन येथें एके वेळीं ५०००० ग्रंथ होते. ते अशा व्यवस्थित रीतीनें स्वतः आपल्या हातांनीं त्यांनीं ठेविलेले असत कीं, त्यांस पाहिजे तें पुस्तक पाहिजे तेव्हां सांपडत असे. त्या सगळ्या पुस्तकांत धर्मस्तोत्रांचीं पुस्तकें जितक्या प्रकारचीं त्यांच्या जवळ होतीं, तितक्या प्रकारचीं दुसऱ्या कोणाजवळही नव्हतीं. विद्यार्थीस्थितींत ते दाहादाहा बारबारा तास वाचीत असत, त्यांत कदाचित् फारसें विशेष नाहीं; परंतु, उतारवयांत, मुख्य दिवाणगिरीच्या कामावर असतांही, एवढें मोठें काम संभाळून, दररोज चार तास तरी वाचण्यांत ते घालवीत असत.

त्याशिवाय त्यांना चैन पडत नसे. शिवाय कोठें बाहेर गेले तर, त्यांच्या खिशांत लहानसें पुस्तक असावयाचेंच. तें अशाकरितां कीं, गाडी यायला उशीर लागला, किंवा दुसऱ्या एकाद्या ठिकाणीं वाट पाहात बसण्याचा प्रसंग आला, तर तो वेळ फुकट जाऊं नये, त्या वेळांत थोडें तरी वाचायास सांपडावें, अशी त्यांची वेळाची काटकसर असे.

ग्लाडस्टन ह्यांच्या उद्योगीपणाची शर्थ होती. रिकामें बसणें हें त्यांच्या वृत्तीस कसें तें मुळींच ठाऊक नव्हतें. त्यांचा कांहींना तरी उद्योग एकसारखा चालला असे. वृद्धापकाळामुळें आणि डोळ्यांनीं दिसेना ह्मणून ते इ० स० १८९४ ह्या वर्षी महाराणीसरकारच्या मुख्य दिवाणगिरीच्या जागेचा आणि इतर सार्वजनिक संस्थांतल्या कर्तृत्वाचा राजीनामा देऊन मोकळे झाले होते. परंतु, त्यानंतरही, पार्लमेंटांत काय चाललें आहे, लोकांत काय चाललें आहे, परदेशांत काय चाललें आहे, ह्या सगळ्या गोष्टींकडे त्यांचें लक्ष होतें. त्यांविषयींचें आपलें मत ते आपण होऊन कोणास सांगत बसत नसत. परंतु, त्यांच्या भोंवतालची मंडळी त्यांस सहजच त्यांविषयीं विचारी, तेव्हां ते, आळस न करितां, मोठ्या आस्थेनें आपलें ह्मणणें त्यांस सांगत असत, आणि त्याबरोबर त्याचीं कारणेंही देत असत. तेणेंकरून, पर्यायानें, त्यांचीं मतें लोकांत प्रगट होत, आणि त्यांचा उपयोग फार होत असे.

ग्लाडस्टन ह्यांस तोंडपुजेपणा कसा तो मुळींच ठाऊक नव्हता. त्यांच्या बोलण्यांत थट्टाविनोद सहसा कधीं नसे. त्यांचे जिवलग मित्र बहुतेक ख्रिस्ती धर्मोपदेशक होते. राजकार्यधुरंधर थोडे होते. ते आपल्या हाताखालच्या लोकांशीं मोठ्या निष्पक्षपातानें आणि उदारपणानें वागत. तरी, तो संबंध त्या कामापुरता असे. त्याच्या मर्यादेबाहेर ते कधीं गेले नाहींत. ह्यामुळें त्यांजपाशीं भलती एकादी गोष्ट काढण्यास किंवा भलतेंच मागणें मागण्यास कोणाला धैर्य होत नसे. त्यांचीं कांहीं कृत्यें दुसऱ्या माणसांस दुराग्रहाचीं, हट्टीपणाचीं आणि विलक्षण दिसत. परंतु, तीं ते आपल्या स्वीकृत तत्वाच्या अनुरोधानें शास्त्रसंमत ह्मणून करीत असत. रक्तपात होणें, प्राणहानि होणें हें त्यांस वाईट वाटत असे. ह्मणून, ते करवतील तितके प्रयत्न

करून--प्रसंगीं थोडा अपवाद सोसूनही--लढाईचा प्रसंग टाळीत असत. असें वागणें हेंच राजरीतीस अत्यंत उचित ते मानीत असत, आणि ह्याच्या उलट वर्तन ते घातुक समजत असत. आलाबामाच्या प्रकरणांत तर त्यांनीं प्रांजलपणें असें कबूल केलें कीं, अशा प्रकारच्या चुक्या इंग्लंडाच्या हातून झाल्या आहेत, ही गोष्ट मोठ्या दुःखाची आहे.

ग्लाडस्टन हे स्वभावानें मोठे हट्टी आणि दुराग्रही आहेत, असें त्यांच्या मंडळीस कधीं कधीं वाटत असे. कां कीं, एकदां हातीं घेतलेलें काम, त्याचा शेवट लागेपर्यंत, कांहीं झालेंतरी ते सोडीत नसत, आणि जी गोष्ट एकदां मनांत भरली, ती सोडण्यास तशीं बळकट कारणें दिल्याशिवाय ती सोडीत नसत. ह्या प्रकारच्या अनेक उदाहरणांत मोठें उदाहरण ऐरलंडाच्या कामांचें आहे. होमरूलाच्या संबंधानें त्यांना त्यांच्या मित्रांनीं कितीतरी नांवें ठेविलीं, आणि कितीतरी त्यांचें मन वळविण्यास प्रयत्न केले, परंतु, त्याचा उपयोग झाला नाहीं. जिवलग मित्र सोडून गेले, पार्लमेंटांत, एकलकोंड्यासारखें होऊन, ज्यांकडून स्तुति व्हावयाची त्यांजकडून निंदा सोसण्याचे प्रसंग आले, तरी त्यांनीं आपला निश्चय सोडिला नाहीं. हें हट्टीपण किंवा दुराग्रहीपण नव्हे, तर हा सत्कार्याविषयींचा दृढ निश्चय होय. धर्मराजांनीं आपल्या बंधूंचीं आणि प्रत्यक्ष पत्नीचीं--अत्यंत कठोर दुरुत्तरें सोशिलीं, आणि नानाप्रकारचे क्लेश साहिले, परंतु, सत्य सोडिलें नाहीं. त्यास कोणी हट्टीपण ह्मणत नाहीं. सत्कर्माविषयीं दृढनिश्चय ह्मणतात.

ग्लाडस्टन हे इंग्लंडच्या लोकांस अत्यंत पूज्य वाटत असत, आणि ते त्यांचें फार देव्हारें करीत असत. ह्याचें मुख्य कारण ते मोठे विद्वान होते हें नव्हे; तर, ते जें काय करितात, तें सगळें आपणां साधारण सर्व लोकांच्या कल्याणाकरितां, आणि असें करण्याकरितांच परमेश्वरानें आपणास येथें पाठविलें आहे त्याकरितां तें केलें पाहिजे, असें समजून ते आपलीं सगळीं कामें करितात, अशी सर्व लोकांची खातरी झाली होती, हें त्याचें खरें कारण होतें. ह्या वर्तनांत देवाची आज्ञा आणि मनुष्यांची सेवा, ह्या दोन

गोष्टी प्रमुख होत्या, आणि त्या गोष्टी अशा आहेत कीं, त्यांच्या पावित्र्याविषयीं कोणाला कधीं संशय यावयाचा नाहीं. तेव्हां ग्लाडस्टन ह्यांस इंग्लंडांतले सगळे लहान मोठे लोक साधु मानून भजत होते, हें अगदीं साहाजिकच होतें.

त्यांचें नीतिधैर्य फार मोठें होतें. सत्कार्यांत त्यांस भय असें कधींच वाटत नसे. सत्कार्यांत कितीही विघ्नें आलीं तरी ते पाय मागें घेत नसत, आणि दुसऱ्यांच्या साह्यावर अवलंबून राहात नसत. अमकें एक कार्य करायाचें ह्मटलें, ह्मणजे तें करायाचें, तें सिद्धीस जाईल असे प्रयत्न करीत सुटावयाचें, सोडायाचें नाहीं, असें त्यांचें होतें. लिबरल पक्षाचे जे पुढारी ह्यांच्या आधीं होते, ते, ह्मणजे लार्ड जान रसेल, हे मोठ्या कुळांतले होते, त्यांचें वजन मोठें होतें, आणि सर्व गोष्टी अनुकूल होत्या, आणि त्यांनीं, इ० स० १८४९ पासून १८६६ पर्यंतच्या मुदतींत रिफार्मबिल पास करून घेण्याचा प्रयत्न पांच वेळां केला. परंतु, त्यास बहुमत मिळेना, आणि कोणाचें साह्य मिळेना, तेव्हां त्यांनीं तो नाद सोडून दिला. असें ग्लाडस्टन ह्यांचें नव्हतें. एकाद्या सत्कार्यांत–ह्मणजे होमरूल देण्यासारख्यांत ह्मणा–जों जों विरोध अधिकाधिक होत गेला, तों तों त्यांचा उद्योग आणि दृढनिश्चय वाढत गेला—हें त्यांच्या नीतिधैर्याचें फल होय. एके वेळीं राजकवि लार्ड टेनिसन उघडपणें ह्मणाले कीं, "ग्लाडस्टन हे मला फार आवडतात, पण त्यांची राज्यरीति मला आवडत नाहीं." त्याचें त्यांस कांहीं वाटलें नाहीं.

जस्टिन मकार्थी ह्या नामांकित ग्रंथकारांनीं ग्लाडस्टन ह्यांची तुलना दुसऱ्या मुख्य प्रधानांशीं करून त्यांच्या शेवटच्या कारकीर्दीविषयीं एका ठिकाणीं ह्मटलें आहेः—"सरकारचीं हीं वर्षें बहुतेक निराशेंत आणि त्रासांत गेलीं. कां कीं, ग्लाडस्टन हे ग्लाडस्टन होते, आणि ते दुसऱ्या कोणासारखे नव्हते ह्मणून. 'होत आहे तें होऊंद्या ना,' असें ह्मणून स्वस्थ राहणारे जे लार्ड मेलबोर्न, त्यांसारखे ते नव्हते. कामन्ससभेंत आपलेकडचें बहुमत कसें तरी करून घ्यावयाचें आणि काम लोटावयाचें, असें वागणारे लार्ड पामरस्टन त्यांसारखे हे नव्हते. त्याप्रमाणेंच, जें साधलें आहे

तवढा लाभ बस आहे, असें समजून तृप्त राहणारे आणि त्याबद्दल आभार मानीत बसणारे जे लार्ड जान रसेल, त्यांसारखेही हे नव्हते. ते, अत्यंत निर्लोभ, स्वीडनच्या चार्लसासारखे होते. ह्मणजे, त्या चार्लसाप्रमाणें ह्यांस नेहमीं असें वाटत असे कीं, मिळावयाचें पुष्कळ राहिलें आहे, त्या पक्षीं मिळालें आहे हें कांहींच नाहीं. त्यांस नेहमीं असें वाटत असे कीं, जो कोणी राज्यकारभार हातांत घेतो, त्यानें, किती त्रास पडो, आणि किती दुःख होवो, आपल्या देशबांधवांची स्थिति सुधारण्याच्या उद्योगांत नेहमीं मग्न राहिलें पाहिजे. आणि त्याप्रमाणें ते स्वतः वागत असत."

ग्लाडस्टन ह्यांच्या सगळ्या कृत्यांचा, सगळ्या वर्तनाचा आणि सगळ्या हेतूंचा विचार केला ह्मणजे असें दिसतें कीं, त्यांची धर्मशीलता हीच काय ती त्यांची मुख्य चालक शक्ति होती. आणि सगळे व्यवहार तिच्या अनुषंगानें होत असत. ते कोणतेही कामास लागोत, त्यांस त्यांत धर्माची आठवण होई, आणी धर्म लक्षांत ठेवून ते जें काय करावयाचें तें करीत. ग्लाडस्टन मरण पावल्यानंतर दुसऱ्या दिवशीं लंडन शहराच्या मुख्य धर्माध्यक्षांनीं—उपदेश करितांना देवळांत ह्मटलें, ग्लाडस्टन, ह्यांच्या, सगळ्या सार्वजनिक कृत्यांमध्यें ख्रिस्ती धर्मतत्परता विद्यमान होती, आणि त्यांनीं आपल्या एवढ्या मोठ्या कारकीर्दींत, ख्रिस्ती धर्मशील माणसास न शोभण्यासारखें असें एक देखील कृत्य केलें नाहीं, त्यांनीं वर्तनाचा उत्तम कित्ता घालून दिला आहे, त्यांनीं आपलें सर्वस्व आपल्या कर्तव्यास अर्पिलें होतें, आपल्या देशबंधूंच्या अंतःकरणांत जें काय अत्युत्तम होतें, तें त्यांनीं आपल्या उदाहरणानें, सर्व जगास उत्तम प्रकारें प्रगट करून दाखविलें, आणि इंग्लिश स्वातंत्र्य हें एक मोठें अप्रतिम आणि अद्वितीय भूषण आहे, असें सगळ्या जगाच्या प्रत्ययास आणिलें, ह्मणून, अत्यंत नम्रभावें आणि पूज्य बुद्धीनें त्यांस सर्व लोक मान देत आहेत. तो अगदीं यथार्थ आहे." असो.

बहुतांचे मुखीं उरावें बहुतांचे अंतरीं भरावें
उत्तम गुणीं विवरावें प्राणिमात्रांशीं. १.
जो बहुतांस मानला तो जाणावा शाहाणा झाला
जनीं शाहाण्या मनुष्याला काय उणें. २.
जो उपकार करीत गेला पाहिजे तो ज्याला त्याला
मग काय उणें तयाला भूमंडळीं. ३.

रामदास.

तेचि कृतार्थ प्रभुची
सेवा जे प्रेमयुक्त करितात.

मोरोपंत.

यद्यद्विभूतिमत्सत्वं श्रीमदूर्जितमेव वा
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम्.

भगवद्गीता.

ह्मणजे "जी जी वस्तु ऐश्वर्ययुक्त किंवा शोभायुक्त किंवा कांहींतरी प्रभावानें युक्त असेल, ती ती माझ्या तेजाच्या अंशापासून झालेली आहे असें तूं जाण." असें श्रीकृष्णपरमात्म्यांनीं अर्जुनाला सांगितलें आहे.

ह्या सगळ्या पद्यांतल्या आशयाचें प्रदर्शन ग्लाडस्टन ह्यांच्या आचारांत आणि विचारांत उत्तम प्रकारें झालें आहे. ह्मणून त्यांस वंदन करून हें स्वभाववर्णन येथें समाप्त करितों.





# भाग दहावा.

## वक्तृत्व आणि ग्रंथकर्तृत्व.

वक्ता दशसहस्रेषु.

**सुभाषित.**

वक्ता तो वक्ता नोहे श्रोतेविण.

**ज्ञानदेव.**

धर्मन्यायोचित जें तेंचि सुभाषण मनासि उत्सव दे.

**मोरोपंत.**

आतां वंदूं कवीश्वर जे शब्दसृष्टीचे ईश्वर.

**रामदास.**



नुष्यें आपल्या मनाच्या स्वाधीन असतात. आणि मनाला वळविण्यास समर्थ—मनाला आपल्या स्वाधीन करून घेण्यास समर्थ—वक्तृत्वासारखी दुसरी शक्ति नाहीं, ह्मणून, विद्याचारसंपन्न राष्ट्रांत वक्तृत्वाचा महिमा फार मोठा मानितात. पैथागरस हा तत्ववेत्ता ह्मणे कीं वक्तृत्व चांगलें शिकण्यास वक्त्यांच्या सभेंत सात वर्षें मौन धरून बसलें पाहिजे; आणि बुलवर लिटन हा इंग्लिश ग्रंथकार ह्मणे कीं, त्यास निदान तीन वर्षें तरी पाहिजेतच. एवढा मोठा ज्ञाता पार्थ, स्वकुलोत्पन्नांच्या वधास भिऊन, शस्त्रसंन्यास करायास सिद्ध झाला असतां, श्रीकृष्णांनीं त्यास गीता ऐकवून त्याचें मन वळविलें, हें वक्तृत्वाच्या सामर्थ्याचें एक मोठें उदाहरण आहे. अशीं अनेक उदाहरणें ग्रीस आणि रोम ह्यांच्या प्राचीन इतिहासांत आहेत. त्या प्रकारचीं उदाहरणें इंग्लंडाच्या इतिहासांत देखील सांपडतात. एडमंड बर्क ह्यानें पार्लमेंटांत वारन हेस्टिंग्ज ह्यांच्या कारकीर्दीचें

वर्णन केलें, तें ऐकून इतर सभाजनांच्या नेत्रांत अश्रु आले, ह्यांत कांहीं नवल नव्हतें, परंतु स्वतः वारन हेस्टिंग्ज रडला, आणि त्यानें प्रांजलपणें आपला अपराध आपले पदरीं घेतला ह्मणतात. असा वक्तृत्वाचा प्रभाव विलक्षण आहे. तें वक्तृत्व ग्लाडस्टन ह्यांच्या ठायीं उत्तम प्रकारें वसत होतें. त्यांनीं देशहिताचीं जीं काय मोठमोठीं कामें केलीं आहेत, त्यांत त्यांस त्यांच्या लेखणीपेक्षां त्यांची जिव्हा फार अधिक उपयोगीं पडली आहे. अथवा असें ह्मणावें कीं, ग्लाडस्टन ह्यांच्या लेखणीपेक्षां ग्लाडस्टन ह्यांच्या जिव्हेचे उपकार त्यांच्या देशावर फार झाले आहेत.

जस्टिन मेकार्थी हे आज कितीएक वर्षें पार्लमेंटांत आहेत. त्यांच्या योगानें त्यांस कितीएक नामांकित वक्त्यांचीं भाषणें ऐकायास सांपडलीं आहेत. आणि ते स्वतः वक्ते आणि मर्मज्ञ असल्यानें, त्यांचा ह्यांविषयीं जो लेख बाहेर पडला आहे, तो अत्यंत चित्तवेधक आहे. त्यांनीं ह्मटलें आहेः- "मी सध्याच्या मन्वंतरांतल्या पुष्कळ वक्त्यांचीं भाषणें आणि पुष्कळ वादविवाद्यांचे वादविवाद हीं ऐकिलीं आहेत. ब्रौहाम, लार्ड पामरस्टन, लार्ड ज्ञान रसेल, लार्ड डर्बी, काबडेन, ब्रैट, थायर्स, ग्यांबेटा, इत्यादि अनेकांचीं भाषणें आणि वादविवाद हीं मीं ऐकिलीं आहेत. आणि तीं मला चांगलीं आठवत आहेत. परंतु, एकंदरीनें विचार करून पाहिला तर, त्या सगळ्यांपेक्षां ग्लाडस्टन हे फार मोठे वक्ते आणि फार मोठे वादविवादी होते, असें मला वाटतें. त्यांत मी असें ह्मणतों कीं, पार्लमेंट सभेच्या सगळ्या एवढ्या मोठ्या कारकीर्दींत ग्लाडस्टन ह्यांसारखा जबरदस्त वादप्रतिवादी दुसरा एक देखील झाला नाहीं. मी एकदां, विनोदानें नव्हे, पण खरोखर मनापासून ब्रैट ह्यांस ह्मटलें कीं, ग्लाडस्टनांपेक्षां आपण अधिक चांगले वक्ते आहांत. तेव्हां त्यांनीं मान हालवून मला सांगितलें कीं, 'तुह्मी कांहीं तरी वेड्यासारखें बोलतां आहां.' त्यांनीं मला विचारिलें, 'वक्तृत्वाचा उत्तम उपयोग कोणता? चांगलें छानदार डौलदार भाषण करणें हा त्याचा उपयोग आहे काय? छिः! आपल्या मनाची जी खातरी झाली असेल, ती खातरी, कोटिक्रमांनीं लढून झगडून, दुसऱ्यांच्या मनांत

भरविणें—तशी दुसऱ्यांची खातरी करणें—ह्मणजे वक्त्यानें श्रोत्यांस आपले-सारखें करणें—आपले अनुयायी करणें—हा वक्तृत्वाचा खरा उत्तम उपयोग नव्हे काय? फार तर मी एक भाषण करून बसेन. पण, ग्लाडस्टन हे, त्यांना जे कोणी आड येतील त्यांस हतवीर्य करण्यास दिवसभर लढतील, आणि शेवटीं आपलेंसें करतील.' ग्लाडस्टन ह्यांच्या वक्तृत्वाचा चमत्कार असा असे कीं, ते एकाद्या विषयावर बोलावयास उभे राहिले कीं, त्यांस भराभर एकामागून एक गोष्टी सुचत जात. आणि ते कधीं अडत नसत. जणूं काय ते त्या प्रसंगाकरितां आधीं तयार असत. त्यांचा स्वर फार मधुर असे. त्यांच्या भाषेंत विशदत्व फार असे. आणि सभेंत कोठें कोणी बसो, त्यांस त्यांचें भाषण सारखें ऐकूं येई." त्याप्रमाणेंच डेव्हिड विलियमसन ह्या ग्रंथकारांनीं त्यांविषयीं असें ह्मटलें आहे कीं, "श्रोत्यांस सुश्राव्य वाटावें —श्रोत्यांच्या योग्यतानुसार असावें—असें भाषण करण्याचें उत्तम सामर्थ्य ज्या वक्त्यांत होतें, त्यांतले एक वक्ते ग्लाडस्टन होते. राजकारणाची सभा असो, एकाद्या प्राचीन तत्त्वविचाराची सभा असो, राजेरजवाडे बसले आहेत अशी मजलस असो, अथवा धर्मविषयवादासाठीं धर्मप्रचारकांची सभा भरलेली असो, ग्लाडस्टनांचें भाषण ऐकून श्रोतृजन डुलूं लागला नाहीं, असें कधीं झालें नाहीं. त्यांचें भाषण हें नानाप्रकारच्या सूचनांनीं भरलेलें असे, आणि त्यांत अगदीं नवे असे विषय पुष्कळ निघत असत. ते विलक्षण वक्ते होते. एकाद्या विषयावर बोलण्याच्या भरांत आले, ह्मणजे त्यांना आणि त्यांच्या श्रोत्यांना वेळाचें भान मुळींच रहात नसे. त्यांच्या भाषणांत प्रसंगोपात्त अनुप्रास येत असत, ते फार सुरेख असत, त्यांचीं वाक्यें लांब लांब असत. मी तर एकदां त्यांच्या एका वाक्यांत २१७ शब्द मोजिले होते. तरी, त्यांत अर्थाची स्पष्टता चांगली असे." त्याप्रमाणेंच दुसऱ्या एका जुन्या पार्लमेंटरी सभासदानें असें ह्मटलें आहे कीं, "ग्लाडस्टन ह्यांचें भाषण ऐकत असतों तोंपर्यंत आह्मी अगदीं तल्लीन होऊन जातों—आह्माला जणूं काय त्या विषयाची मोहनी पडते. आणि आह्मी जे त्यांच्या विरुद्ध मताचे होतों, ते तें त्यांचें भाषण कानीं पडेनासें झालें

ह्मणजे मग होतों." असो. ग्लाडस्टन हे मोठे वक्ते होते. त्यांच्या भाषणांत प्राचीन श्रेष्ठांचीं वचनें फारशीं येत नसत. त्यांस इपिक्टिटस, सिसरो, टासिटस, लीव्ही, ह्यांचीं सयुक्तिक वचनें पुष्कळ आठवत असत. त्यांचें सार मात्र त्यांच्या बोलण्यांत येई. ते बोलण्यांत कधीं उडी घालीत नसत. दुसऱ्यांचें बोलणें आटोपल्यावर, त्याविषयीं विचार करून, कांहीं वेळ इतरांची वाट पाहिल्यावर मग बोलावयास ते उभे राहात. सभेचें काम चाललें असतां, कोणी कोणी सभासद, थोडे पाय साफ करण्यास, किंवा थोडी विश्रांति घेण्यास, किंवा थोडा उपहार करण्यास, किंवा कोणाशीं थोडें बोलण्यास, किंवा चिटीपाटी लिहिण्यास बाहेर उठून गेलेले असले, आणि तशांत जर ग्लाडस्टन हे बोलायाला उभे राहिले, तर, ती सगळी मंडळी, हातांतलीं कामें एकीकडे टाकून भरा भरा भरा आपापल्या जागांवर येऊन बसत असे, जणूं काय, तें भाषण ऐकायाचें अंतरलें तर आपली मोठी हानि होईल असें त्यांस वाटे. त्यांनीं भाषण केलें नाहीं, असा त्यांच्या वेळीं निघालेला एकही विषय राहिला नाहीं. ते आपलें भाषण कधीं लिहून काढीत नसत. तर, वाचून विचार करून आणि माहिती मिळवून, ते बोलायास उभे राहात. त्यांची स्मरणशक्ति विलक्षण होती. तशी समयस्फूर्तिही अप्रतिम होती. ते पुष्कळ वाचीत. तें सगळें त्यांच्या लक्षांत राही, आणि पाहिजे तेव्हां नेमकें आठवे. आणि ते आपल्या बोलण्यास प्रमाणें देत तीं आंकड्यांचीं आणि प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टींचीं असत. त्यांपुढें कोणास तोंड उघडतां येईना. चूप बसावें लागे. आणि विषय एकदा मनांत भरला ह्मणजे त्याविषयीं किती बोलत ह्याचा नेम नसे. सर राबर्ट पील ह्यांच्या इ० स० १८४२ च्या जमाखर्चाच्या खरड्यावर ते राहून राहून १२९ वेळां बोलले ह्मणतात! त्या वेळेच्या सुमारास ग्रेव्हिल ह्यांनीं असें लिहिलें कीं, "ग्लाडस्टन ह्यांचें असें सामर्थ्य आतां दिसून आलें आहे कीं, त्यांस प्रधानमंडळांत घेतल्याशिवाय गत्यंतरच नाहीं." त्याप्रमाणें ते इ० स० १८४३ ह्या वर्षीं बोर्ड आफ् ट्रेडचे प्रेसिडेंट होऊन प्रधानमंडळांत प्रविष्ट झाले. त्यांच्या वक्तृत्वाची योग्यता पुरतेपणीं लक्षांत येण्यास

त्यांचीं भाषणें प्रत्यक्ष ऐकायासच पाहिजेत होतीं. तें नाहीं, तर निदान तीं मूळांत इंग्रजी ग्रंथांमध्यें वाचलीं तरी पाहिजेत. तें यथाशक्ति सर्वांनीं साधावें. परंतु, ताजमहालाची कल्पना येण्याकरितां कागदावर त्याचें ल्हानसें चित्र दाखवावयाचें, त्याप्रमाणें त्याचा थोडासा मासला कळण्याकरितां त्यांच्या भाषणांतल्या कांहीं प्रसंगांच्या कांहीं चुटक्यांची उगाच थोडी थोडी छाया येथें देतों. हीवरून त्यांच्या भाषणाची पद्धति आणि त्यांच्या अंतःकरणांतली नीतिमत्ता, ह्यांचें उगाच थोडें तरी प्रदर्शन होईल, अशी आशा आहे.

प्रसंग असा होता कीं, ड्यूक आफ् वेलिंग्टन हे थोर गृहस्थ इ० स० १८५२ च्या सप्तंबरच्या १४ व्या तारखेस मरण पावले होते. त्यांच्या सन्मानार्थ पार्लमेंटांत भाषणें झालीं. त्या वेळीं ग्लाडस्टन ह्मणाले, "ह्या तेजस्वी पुरुषांच्या ठायीं गुण फार मोठे होते, आणि त्यांच्या हातून फार मोठीं कृत्यें घडलीं. ते गुण सर्वांस संपादितां यावयाचे नाहींत, आणि तशीं कामें सर्वांस करितां यावयाचीं नाहींत, ही गोष्ट अगदीं निर्विवाद आहे. तरी, त्यांच्या चरित्रापासून आपणांस पुष्कळ गोष्टी शिकतां येण्यासारख्या आहेत. त्यांनीं आपल्या प्रभूच्या जशा मोठमोठ्या कामगिऱ्या केल्या आहेत, तशा कोणास करितां न येवोत; ह्यांनीं आपली तरवार गाजवून सगळ्या युरोपखंडास स्वातंत्र्य दिलें, त्यांत इंग्लंडाच्या यशाचा झेंडा उंच उभारिला, आणि त्याजकडे बाकीचीं राष्ट्रें टकमकां पाहात राहिलीं, तसें इतर कोणास करतां न येवो; मोठमोठे अप्रतिम जय मिळवून, आणि आपल्या नांवाचा डंका वाजवून, एवढें मोठें नांव मिळवित्यावर, देशाचे अंतर्गत आणि बाहेरच्या शांततेकरितां, स्थिर चित्तानें श्रम करणें हें कोणास त्यांच्या सारखें न साधो; त्यांचें जेवढें वजन दरबारांत आणि ह्या सभेंत होतें, तेवढें वजन कोणास न पाडतां येवो; एवढालीं मोठीं कामें केल्यावर, बुद्धि आणि काम करण्याचें सामर्थ्य हीं जशींच्या तशीं कायम राहून तीं, देशाचें एक मोठें कार्य अगदीं नियमित रीतीनें करण्याकरितां अखेरपर्यंत योजायास त्यांस सांपडलीं, तशीं इतरांस न सांपडोत. हे योग जे आहेत,

तसे योग ह्या देशाच्या इतिहासांत पुनः कदाचित् कधीं येणार नाहींत. परंतु, ड्यूक आफ् वेलिंग्टन ह्यांच्या ठायीं दुसरे कितीएक असे सद्गुण होते कीं, आपणां सर्वांस त्यांचें थोडें ना थोडें तरी सहज अनुकरण करितां येईल. ते आपल्या देशाच्या सेवेस कायावाचामनेंकरून वाहलेले होते; सदासर्वकाल आपल्या राष्ट्राच्या हितार्थ सत्य स्मरून मनापासून झटावयाचें, असा त्यांचा निश्चय होता; त्यांची राजनिष्ठा फार मोठी होती, तरी, त्यांच्या अंतःकरणास जें काय सत्य असें वाटलें, तें त्यांनीं आपल्या प्रभूपासून कधीं चोरून ठेविलें नाहीं; ते स्वकर्तव्यास वाहलेले होते—त्यास ते कधीं टळले नाहींत; ते मोठे नेमिष्ठ, व्रतस्थ आणि धर्मपरायण होते अशी त्यांची मोठी आख्या होती; हे गुण कोणालाही संपादतां येण्यासारखे आहेत. ह्यांजकडे आपण दुर्लक्ष करितां कामास नये."

इ० स० १८७० ह्या वर्षी ऐरलंडाच्या जमीनबाबीच्या कामाचा मसुदा पार्लमेंटापुढें विचारास आला होता. त्या वेळीं ग्लाडस्टन हे त्याविषयीं ह्मणाले,—"मला कोणी विचारतात कीं, ह्या कायद्याच्या योगानें तुह्मी काय करणार! त्यांस मी असें सांगतों कीं, ह्या कायद्याच्या योगानें आह्मी ऐरलंडांत पुष्कळ फेरफार करणार आहों. पण ते फेरफार आह्मी फार सौम्य उपायांनीं करणार आहों. ह्या मसुद्यांतल्या प्रत्येक सूचनेची योजना अशी केली आहे कीं, त्या सूचनेप्रमाणें व्यवस्था होऊं लागल्यास ऐरलंडांतल्या लोकांस काडीइतका जुलूम वाटूं नये कीं तिळभर त्रास होऊं नये. पुष्कळ वहिवाटी बंद करावयाच्या आहेत हें खचीत आहे; पुष्कळ सुधारणा करावयाच्या आहेत, हेंही खचीत आहे; पण, हें सगळें, सृष्टींतल्या नैसर्गिक कामांप्रमाणें अगदीं हळहळ करावयाचें आहे. ह्मणजे, मनुष्यें सृष्टींतलीं जंगलें तोडून टाकून जमीन साफ करतात, त्या ठिकाणीं सृष्टिक्रमाप्रमाणें हळहळ झाडें उगवून जसें पूर्ववत् अरण्य होतें—त्यांत जलदी किंवा तीव्रता होत नाहीं—तसें हें ह्या कायद्यानें ऐरलंडांत काम करावयाचें आहे. आमचा समज असा आहे कीं, ह्या कायद्याच्या बजावणीचें काम अगदीं सावकाश आणि शांतपणानें होईल. आह्मांला कोणास भिववावयाचें नाहीं; आह्मांस कोणास दुखवावयाचें नाहीं.

आह्मांला जें काय करावयाचें आहे तें हेंच कीं, सध्या जेथें निराशा आहे, तेथें आशा उत्पन्न करावयाची आहे. जेथें अविश्वास आहे, तेथें विश्वास स्थापित करावयाचा आहे. आणि जेथें परकेपणा आणि द्वेष हे आहेत, तेथें स्वत्व आणि प्रेम हीं नांदतशीं करावयाचीं आहेत. आणखी आह्मांला ठाऊक आहे कीं, हें काम कांहीं एका दिवसांत व्हावयाचें नाहीं. जीं अरिष्टें काढून टाकायाचीं आहेत, तीं फार दिवसांचीं आहेत. त्यांचीं पाळें मुळें फार खोल गेलीं आहेत. तीं एकदम काढून टाकणें हें जसें परमेश्वरी योजनेस विरुद्ध आहे, तसें मनुष्यांच्या हितास फार बाधक आहे. ह्मणून ह्या कायद्याचें काम जर हळहळ होऊं दिलें, त्यांत क्रोधाचें किंवा मत्सराचें विष मिसळूं दिलें नाहीं, तर, परिणामीं हें सगळें चांगलें सुयंत्र होईल, आणि ह्याचा परिणाम हितावह होईल, अशी आह्मांस फार आशा आहे. ह्याप्रमाणें ह्या कायद्यास शेवटीं यश येणार आहे, हिकडे लक्ष ठेवून हा कायदा पसंत करावा. अमक्यावर आपली सरशी करावयाची, किंवा अमक्याचें ह्मणणें हाणून पाडावयाचें, ह्मणून पसंत करूं नये. ह्या हेतूंनीं आणि ह्या विचारांनीं ह्या सभेनें ह्या मसुद्याचा विचार करावा. मला तर खचीत अशी आशा आहे कीं, हा कायदा पसंत झाला आणि अमलांत आला ह्मणजे, इंग्लंड आणि स्काटलंड ह्यांशीं ऐरलंडाचें ऐक्य होईल, त्यांच्या मध्यें प्रेम वाढेल, त्यांचे ठायीं शांति आणि उद्योग ह्यांची अभिवृद्धि होईल, आणि ह्या सगळ्यांची कालक्रमणा आनंदमय होईल.”

ग्लाडस्टन ह्यांनीं इंग्लंडच्या जमाखर्चाची जी व्यवस्था केली, ती सर्वांस सारखी रुचली नाहीं. ते ग्रीनिचच्या वतीचे सभासद होते, तेथल्या लोकांस असें वाटलें कीं, ह्यांच्या व्यवस्थेनें आपल्या शहरच्या कामकरी लोकांचें आणि व्यापाराचें फार नुकसान झालें आहे. ह्मणून ते अगदीं खवळले होते. हें ग्लाडस्टनांस कळलें. तेव्हां त्यांनीं असा विचार मनांत आणिला कीं, आपण काय केलें आहे तें त्या लोकांस चांगलें समजावून दिल्यानें सगळा भ्रम नाहींसा होईल. ह्मणून ते आपल्या पत्नीसहवर्तमान इ० स० १८७१ च्या आक्टोबरमध्यें त्या प्रांताकडे गेले, आणि ब्लाकहीथ येथील

मैदानांत भाषण करण्याचें त्यांनीं प्रसिद्ध केलें. त्यास तेथें वीस हजार लोक आले होते. त्यांच्या एकंदर चर्येवरून आणि वागण्यावरून प्रथमतः असें वाटलें कीं, हे ग्लाडस्टनांस किती त्रास देतील कोण जाणे. त्याप्रमाणें ते बोलण्यास लागल्याबरोबर त्यांनीं असा कांहीं गोंगाट केला कीं, त्याचा एक शब्द देखील कोणाला ऐकावयाला येईना. परंतु, त्यांचा तो गंभीर शब्द, त्यांची अस्खलित मधुर वाणी, आणि त्यांचा कोटिक्रम ह्यांचा पगडा त्या लोकांच्या मनावर घटका दोन घटकांत इतका पडला कीं, ते सगळे चित्रासारखे चप्प झाले. आणि ग्लाडस्टन ह्यांचें भाषण ऐकूं लागले. आणखी पुढें दोन घटकांनीं असें झालें कीं, त्या लोकांनीं ग्लाडस्टनांच्या जयजयकारांनीं दाही दिशा दणाणून सोडिल्या, आणि त्यांचा बहुमान करण्याकरितां त्यांजकडे इतकी मंडळी चालली कीं, तेथें कोणास पाऊल ठेवण्यास जागा नाहींशी झाली. ह्मणजे, ज्या ठिकाणीं ग्लाडस्टनांस अतिशयित पीडा होईल असें भय होतें, त्या ठिकाणीं त्यांची पूजा झाली. हें ब्लाकहीथचें भाषण त्यांच्या उत्तम भाषणांपैकीं एक आहे असें समजतात.

एका ठिकाणच्या वाचनगृहाच्या पुण्याहवाचनाच्या समारंभांत, इ० स० १८७८ ह्या वर्षीं, ग्लाडस्टन हे ग्रंथावलोकनाच्या संबंधानें ह्मणाले, "साक्रेटिसानें तत्त्वज्ञान स्वर्गलोकाहून खालीं आणिलें ह्मणतात. त्याप्रमाणें अलीकडे कितीएक छापखानेवाल्यांनीं गरीब लोकांस सहज घेतां यावीं, अशीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत, आणि त्यांचा उपयोग पुष्कळ होत आहे, ही गोष्ट निर्विवाद आहे—आणि ही गोष्ट फार महत्वाची आहे. मी लहान होतों, तेव्हां पुस्तकें विकत घेण्याकरितां मी दुकानांत वारंवार जात असें. तेव्हां तेथें गरीब मजुरांस सहज विकत घेतां येण्यासारखें एक देखील पुस्तक कधीं दृष्टीस पडलें नाहीं. शेक्सपियराच्या ग्रंथांचें एकच उदाहरण पाहा. मला असें आठवतें कीं, मी त्या कवीच्या ग्रंथांची जी अगदीं प्रथम प्रत विकत घेतली, तिला मला २ पौंड १६ शिलिंग द्यावे लागले. परंतु, त्या पुस्तकापेक्षां पुष्कळ चांगलें तसलें पुस्तक आतां ३ शिलिंगांस मिळतें. जीं पुस्तकें पूर्वीं मिळत नव्हतीं, तीं आतां पाहिजे

तितकीं मिळूं लागलीं आहेत. कोणी ह्मणतात, मुख्यत्वेंकरून करमणूक पाहिजे आहे. होय. आह्मी त्याला कोठें नाहीं ह्मणतों? पण, त्या करमणुकींत सुधारणा नसते—किंवा नसावी—असें कांहीं नाहीं. कांहीं भिकार पुस्तकें करमणुकीकरितां ह्मणून बुद्ध्या छापलेलीं आढळतात. तीं तुह्मीं कधीं हातांत देखील घेऊं नयेत. शेक्सपियर, स्काट इत्यादि ग्रंथकारांचे ग्रंथ वाचावे. त्यांत उत्तम प्रकारची आणि उंच प्रतीची पाहिजे तितकी करमणूक आहे. माणसें अभ्यास करीत असतां तुह्मी पाहातां तेव्हां तो त्यांस आवडत नाहीं, असें तुमच्या मनांत येतें काय? नाहीं. तसें नाहीं. अभ्यास करण्यांत एका प्रकारचे श्रम आहेत, हें अगदीं खरें आहे. ते मानसिक श्रम आहेत. पण त्या श्रमांत अशी कांहीं एका प्रकारची मौज आहे कीं, ती मौज, मला वाटतें, मजूर लोकांइतकी दुसऱ्या कोणासही कळत नाहीं. सध्या जे लोक ग्रंथ लिहितात ते बहुधा चांगले असतात. त्यांचे विषय निवडक असतात. त्यांत फार ज्ञान असतें. ते वाचतांना मोठी मौज वाटते. ते ग्रंथ थोडक्यांत मिळतात. आणि त्यांच्या अवलोकनाच्या योगानें विद्यादेवीच्या अगदीं आंतल्या गाभाऱ्यांत प्रवेश करण्याचा मार्ग माणसांस सांपडतो. मजूर लोकांनीं दमून भागून, घरीं आल्यावर भूमितीसारख्या कठिण विषयांचे अभ्यास करीत बसावें असें आमचें ह्मणणें मुळींच नाहीं. परंतु, आह्मांला जें काय पाहिजे आहे तें हें कीं आमच्या लोकांनीं चांगलीं चांगलीं पुस्तकें वाचून, आपली स्वतःची स्थिति सुधारून आमच्या राष्ट्रास उच्च पदवीस चढण्यास साह्य करावें."

इ० स० १८६० च्या जमाखर्चाच्या अंदाजाच्या प्रकरणीं बोलत असतां, फ्रान्स आणि इंग्लंड ह्यांच्यामध्यें जो व्यापारसंबंधी तह ठरत होता त्या संबंधानें ते ह्मणाले, "पूर्वीं एके वेळीं इंग्लंड आणि फ्रान्स येथील सरकारांच्या मध्यें फार मित्रत्व होतें, हें माझ्या लक्षांत नाहीं असें नाहीं. स्टुअर्ट घराण्याच्या कारकीर्दीच्या उत्तरार्धांत तें फार होतें. तें जें सख्य होतें, तें, एक पक्ष डोयजड आणि दुसरा पक्ष खालावलेला अशा पक्षांतल्या मित्रत्वासारखें होतें. आणखी तें मित्रत्व सरकारासरकारांचें होतें; राष्ट्रा-

राष्ट्रांचें नव्हतें. पण आतांचें जें मित्रपण किंवा सख्य आहे, तें राष्ट्राराष्ट्रांचें आहे. मीं पूर्वीं ह्या सभेंत सांगितलें आहे आणि शिवाय आतां असें सांगतों कीं, हें जें सख्य आहे, तें सगळ्या जगाच्या हितास कारणभूत झाल्याशिवाय कदापि राहाणार नाहीं. कां कीं, ह्या राष्ट्रांतल्या एका राष्ट्रानें केवळ आपल्या लाभाकरितां जरा चळवळ केल्याबरोबर जवळचीं दुसरीं राष्ट्रें लागलींच टवकारतील, मत्सर उत्पन्न होईल, आणि जबरदस्त प्रतिकारास आरंभ होईल. आणि ह्या दोहोंचें सख्य असणें हें अशा स्थितीचें मोठें प्रमाण होईल कीं, जिच्या योगानें सगळ्या युरोपाला दहशत पडण्याचें भय आहे. ह्मणून असे विचार ह्यांतलें एकही राष्ट्र कधीं मनांत आणणार नाहीं."

त्याच विषयावर वाद चालला असतां ग्लाडस्टन आणखी ह्मणालेः—
"आमच्या ह्या सूचनांमध्यें कामासंबंधीं पुष्कळ सुधारणा गर्भित आहेत. पुष्कळ कर कमी व्हावयाचे आहेत. फ्रान्सशीं व्यापाराचा तह व्हावयाचा आहे. त्यास कोणी कोणी हरकत घेतील. परंतु, मी खातरीनें असें सांगतों कीं, तो तह होणें हें नीतिसंबंधानें, सामाजिक संबंधानें आणि राजकीय संबंधानें मात्र चांगलें आहे, एवढेंच कोणीं समजूं नये, तर, व्यापारसंबंधानें—द्रव्यलाभसंबंधानें देखील—अत्यंत इष्ट आहे. पूर्वीं राजांच्या स्वाऱ्या देशांतून चालल्या ह्मणजे प्रजाजन त्यांस सामोरे येऊन, त्यांवर सोन्यारुप्याचीं फुलें उधळीत असत—किंवा त्यांस तीं उधळावीं लागत असत. ती मोठी मौज दिसली असेल खरी. परंतु, आतां काल बदलला आहे. त्याप्रमाणें आमच्या महाराणी साहेब, ह्या पार्लमेंटांत जमलेल्या चांगल्या चांगल्या मंत्र्यांच्या सल्ल्यानें आणि उत्तम कायद्यांच्या योगानें प्रजाजनांवर आनंदाच्या आशीर्वादाची वृष्टि करीत आहेत, ही मौज त्या मौजेपेक्षां अधिक श्रेष्ठ आणि अधिक श्रेयस्कर दिसत आहे. आणखी हे कायदे असे आहेत कीं, ते योग्य कर्तव्यास आणि मनुष्यपणास कोणत्याही प्रकारें तिळमात्रही धक्का न लावितां, उद्योगाच्या हातांतल्या बिड्या काढून टाकितात, उद्योगास बक्षीस मिळण्याचे मार्ग मोकळे करितात, आणि

आमच्या प्रभूविषयीं, आणि आमच्या राष्ट्राच्या हितवर्धक संस्थांविषयीं, सर्व लोकांच्या अंतःकरणांत कृतज्ञता, प्रेम आणि भरंवसा ह्यांची वृद्धि करितात. कांहीं मंडळीस आमच्या देशाच्या संरक्षणाची मोठी काळजी वाटते. त्यांनाही मी असें सांगतों कीं, ज्याच्या योगानें आपलीं सर्वांचीं अंतःकरणें ऐक्यमय होत आहेत, ज्याच्या योगानें आपला विश्वास आपल्या प्रभूच्या ठायीं दृढ होत आहे, ज्याच्या योगानें आपणास असें वाटत आहे कीं, आपले प्रभु आपणांस बरोबर न्यायानें वागवीत आहेत आणि ज्याच्या योगानें आपले मनांत असें येत आहे कीं, आपण येथें येऊन जो उद्योग करीत आहों, तो सगळ्या राष्ट्रांच्या कल्याणाकरितां होत आहे—इतक्या गोष्टी ज्याच्या योगानें होत आहेत, तेंच स्वतः आपल्या राष्ट्राचें फार मोठें संरक्षणसाधन आहे. आपण निष्पक्षपात आणि शोधक आहां. आपल्या विचारार्थ ह्या सूचना आपल्या कानांवर घातल्या आहेत. ह्या सूचनांबद्दल आपण आह्मांस शाबास ह्मणावें, असें आमचें मागणें नाहीं. त्याप्रमाणें कांहीं विशेष शोध न करितां ह्या सूचना आपण मान्य कराव्या, असेंही आह्मी ह्मणत नाहीं. किंवा, कसें तरी आपलें मन वळवून ह्या पसंत करून घ्याव्या, हेंही आह्मांला नको आहे. आमचें मागणें मिळून एवढेंच आहे कीं, आपण धारवाडी कांट्यानें—अगदीं निष्पक्षपातीपणानें ह्या सूचनांचा विचार करून काय तो निर्णय करा—ह्यांत कमी पडूं देऊं नका. आणखी आमची खातरी आहे कीं, आपण जें न्याय्य आहे, तेंच कराल—अन्यथा कधीं करणार नाहीं. त्याप्रमाणेंच आमचें ह्मणणें सगळ्या पार्लमेंटसभेस आणि आमच्या सगळ्या राष्ट्रास पसंत पडेल, अशी आह्मांस मोठी आशा आहे."

अशीं त्यांच्या वक्तृत्वाचीं पुष्कळ उदाहरणें देण्यासारखीं आहेत. ह्या सगळ्यांचा ठसा त्यांच्या श्रोत्यांच्या मनांवर चांगला उठला होता. ह्यास त्यांचे अनेक गुण कारणभूत होते. त्यांत एक गुण मुख्य होता. तो गुण सत्य होय. त्यांच्या बोलण्यांत असत्याचा किंवा वरकरणीचा लेशही नसे. आणखी सामान्य नियम असा आहे कीं, सत्य जें असतें, तें, बोलणारा

कसा कां असेना, ऐकणाराच्या मनांत भरतें, आणि त्याचा योग्य परिणाम होतो. ह्याच गुणाच्या योगानें ग्लाडस्टनांच्या वक्तृत्वास श्रेष्ठत्व आलें होतें. त्यांचीं भाषणें छापून प्रसिद्ध झालेलीं आहेत. तीं विद्यार्थी जनांस फार पठण करण्यासारखीं आहेत.

ग्लाडस्टनांच्या वक्तृत्वाविषयीं एक गोष्ट फार चमत्कारिक आहे. ती ही कीं, पार्लमेंटांत त्यांचे अनुयायी आणि त्यांचे प्रतिपक्षी पुष्कळ होते, आणि त्यांतल्या पुष्कळांस ग्लाडस्टनांची बोलण्याची शैली फार आवडत होती. परंतु, त्यांतल्या एकाच्यानें देखील त्यांच्यासारखी बोलण्याची कला संपादवली नाहीं. वक्तृत्वकला अनुकरणसाध्य आहे, असें पुष्कळांस वाटतें. परंतु, तें खरें नाहीं. ग्लाडस्टन हे आपल्या भाषणाची योजना आधीं करीत. नंतर, त्यांतला पाल्हाळ काढून टाकीत, आणि अगदीं आवश्यक तेवढें ठेवीत. त्याच्या योगानें त्यांच्या भाषणांत व्यर्थ किंवा विसंगत असें बिलकूल कांहीं नसे. आणि त्याच्या योगानें तें सर्वांस लक्षपूर्वक ऐकावेंसें वाटे. उतार वय झाल्यावर त्यांस आपल्या भाषणांतल्या शेवट शेवटच्या वाक्यांचें टिपण करावें लागे. सर विलियम हार्कोर्ट हे त्यांचे पट्टशिष्यांतले एक पट्टशिष्य आहेत. त्यांना देखील ह्यांच्या भाषणांतलें अभिनवत्व आणि स्वयंभूत्व, तितकें चांगलें साधतां आलें नाहीं. ते आपलीं भाषणें लिहून काढून वाचितात. ग्लाडस्टनांचा कित्ता पुष्कळ वळविलेले असे दोन गृहस्थ आहेत. बालफोर आणि चेंबरलेन. ते भाषण करण्यांत कधीं टिपणें घेत नाहींत. आणि प्रसंगीं स्फूर्ति होते तसें मनापासून मोठ्या आवेशानें बोलतात. परंतु स्वरमाधुर्य, कोटिक्रम, विषय विशद करण्याचें सामर्थ्य, आणि अप्रतिम बुद्धिमत्ता ह्या ईश्वरी देणग्या आहेत. त्या ज्याच्या त्यालाच उपयोगीं पडावयाच्या. त्या दुसऱ्याच्या पाहून यावयाच्या नाहींत. ह्या देणग्या ग्लाडस्टनांस देवानें अप्रतिम दिल्या होत्या.

हें त्यांच्या वक्तृत्वाविषयीं झालें. तसें त्यांच्या ग्रंथकर्तृत्वाविषयीं थोडें सांगितलें पाहिजे. ते जसे वक्ते मोठे होते, तसे मोठे ग्रंथकारही होते. त्यांनीं इटन

आणि आक्सफोर्ड येथें विद्यार्थीस्थितीमध्येंच पुष्कळ निबंध लिहिले होते. ते असोत. पण, पार्लमेंटांत प्रवेश झाल्यावर त्यांनीं अनेक प्रकारच्या विषयांवर अनेक लहानमोठे ग्रंथ लिहिले. त्यांची संख्या कोठें सुमारें तीनशें सांगितली आहे. देशाच्या कारभाराच्या संबंधानें लोकमत वळविण्यास त्यांस पुष्कळ ल्याहावें लागलें, तें वेगळेंच. पण, त्याशिवाय त्यांच्या आवडीचे विषय ह्मटले ह्मणजे प्राचीन इतिहास, होमर कवि आणि धर्म. ह्यांवर त्यांचे फार मोठे मोठे ग्रंथ आहेत. प्राचीन इतिहास आणि धर्म ह्या विषयांवर तर त्यांच्या मतांस मोठमोठ्या पंडितांमध्यें मोठा मान आहे. त्यांनीं धर्मसंबंधाचें शेवटचें पुस्तक इ० स० १८९१ ह्या वर्षी लिहिलें. त्यावरून असें दिसतें कीं, त्यांची इतर विषयांच्या संबंधाचीं मतें, प्रकाश पडत गेला तसतशीं, जरी बदलत गेलीं, तरी, धर्मविषयक मतें, बाळपणापासून होतीं तशींच होतीं. त्यांत फरक पडला नाहीं. ह्यावरून असें ह्मणणें भाग पडतें कीं, मनुष्याच्या इतर मतांचा पाया अनुभवावर आणि शोधावर असतो, आणि धर्ममतांचा पाया श्रद्धेवर असतो. इतर विषयांच्या संबंधाचीं त्यांचीं मतें दिवसेंदिवस बदलत चाललीं, हें लोकांस विलक्षण आश्चर्य वाटलें होतें, आणि कोणी कोणी त्यांवर अस्थिर बुद्धीचा आरोप घालीत असत. त्याचें निवारण करण्याकरितां त्यांनीं आपल्या चरित्राचा एक भाग लिहिला आहे. ह्मणजे, त्यांच्या जवळ आंत बाहेर असें कांहीं नव्हतें. अंतःकरण अगदीं निर्मळ होतें, तसें जनास प्रदर्शित करण्याचा त्यांचा प्रयत्न निरंतर चाललेला असे. आह्मांला वाटतें आंत बाहेर एक रूप असणें, त्यांत कांहीं विपर्यास नसणें, हेंच मुख्य साधुलक्षण आहे.





# भाग अकरावा.

## त्यांच्या कांहीं विशेष गोष्टी.

### निर्लोभता.



त्यांनीं सरकारी काम केलें होतें, त्याबद्दल त्यांस दरसाल दोन हजार पौंड ह्मणजे वीस हजार रुपये पेन्शन अगदीं हक्कानें सहज मिळण्यासारखें होतें. पण तें त्यांनीं घेतलें नाहीं. आणि महाराणी सरकार त्यांस लार्ड करण्यास ह्मणजे उमराव करण्यास तीन वेळ तयार झालें होतें, पण त्यांनीं नको ह्मटलें.

### साधुत्व.

इ० स० १८७८ च्या जून महिन्यांत एके रात्रीं ते आपल्या एका मित्राच्या समागमें घरीं चालले असतां, त्या मित्रास एका वेश्येनें बोलाविलें. त्यानें तिला झिटकारून चटकन् आपली वाट धरिली. नंतर तिनें ग्लाडस्टन ह्यांशीं बोलण्याचा प्रयत्न केला. त्यांनीं तिला झिटकारिलें नाहीं. ते तिजपाशीं कांहीं वेळ बोलले, आणि लवकर लवकर चालून त्यांनीं आपल्या मित्रास गांठिलें. आणि त्यास विचारिलें कीं, "असल्या बायकांना तुह्मी असेच झिटकारीत असतां काय नेहमीं?" त्या मित्रानें होय ह्मटलें. तेव्हां ते ह्मणाले, "अशा बायकांस झिटकारणें हें मला आवडत नाहीं. अशा पुष्कळ बायका मला ठाऊक आहेत. आणि त्यांस चांगल्या मार्गास लावण्याची माझी खटपट बरीच सफल झाली आहे. मला असें वाटतें कीं, त्या तर पाप करतातच, पण, लोक त्यांजकडून आणखी पाप करवून आपण पापांत पडतात, हें फार वाईट आहे."

## भूतदया.

डाक्टर जोजेफ पार्कर ह्यांनीं लिहिलें आहेः—"आमचा फराळ आटोपल्यावर ग्लाडस्टन ह्यांनीं एक पुस्तक काढिलें, आणि इंग्लंड आणि ऐरलंड ह्यांचें नातें काय आहे, आणि ऐरलंडाचें चाललें आहे काय, तें मोठ्यांनीं वाचिलें. तें मोठ्या कळवळ्यानें लिहिलेलें होतें. तें ऐकून त्यांना अतिशयित गहींवर आला, आणि, पुस्तक खालीं ठेवून ते एकाद्या लहान मुलासारखे ओकशांबोकशां रडले!"

## कोणाशीं वांकडें राहायाचें नाहीं.

दुसऱ्यांच्या मतांहून आपलीं मतें वेगळीं असलीं, तर त्यांविषयीं वाद करावयाचा, त्यांना अगदीं खोडून काढायाचें. पण, त्यांशीं वांकडें व्हावयाचें नाहीं, त्यांस, गोड बोलून, आपलेसें करून ठेवायाचें, अशी त्यांची रीति असे. पार्लमेंटांत किंवा दुसऱ्या एकाद्या सभेंत कांहीं बोलणें झाल्यावर, मग जर असें वाटलें कीं, आपला अमका एक शब्द अमक्यास लागला असेल, तर लागलेंच त्याच्या जवळ जाऊन बसावयाचें, त्याविषयीं त्याची समजूत घालावयाची, त्याच्या मनांतला राग घालवायाचा, असा त्यांचा पाठ असे; मग तो माणूस मोठा असो कीं लहान असो. असें सांगतात कीं, एकदा पार्लमेंटामध्यें लार्ड बीकान्सफील्ड ह्यांची आणि त्यांची खूपच वाजली. आणि मग, लार्ड बीकान्सफील्ड हे त्या रागांत बाहेर येऊन, हिरमुसलें तोंड करून, एका बांकावर बसले. त्यांची ती चर्या ओळखून, ग्लाडस्टन हे त्यांच्याजवळ जाऊन बसले, आणि आपण होऊन त्यांच्याशीं, झाडामाडांच्या आणि बागबगिचांच्या गोष्टी सांगूं लागले, ते अशा रीतीनें कीं, त्यांशीं बोलणें लार्ड बीकान्सफील्ड ह्यांस भाग आलें. त्या बोलण्यांत ग्लाडस्टनांनीं त्यांच्या मनांतला किंतु काढून टाकिला.

## सद्गुणांचा गौरव.

२९ दिसेंबर १८९७ ह्या दिवशीं न्याशनल लिबरल क्लब ह्या मंडळीनें, त्यांच्या ८८ व्या वाढदिवसानिमत्त जेवणावळ केली. तिच्या संबंधानें त्यांनीं त्यांस पत्रिका पाठविली होती. तिचें उत्तर त्यांनीं असें पाठविलें

कीं, "तुह्मीं मला पत्रिका पाठविली, हा माझा फार मोठा मान केला आहे. आतां माझी एवढीच इच्छा आहे कीं, ह्यापुढें आपल्या मंडळीनें सत्य, न्याय, सन्मान, शांति आणि भक्ति ह्या सद्गुणांचा असा बहुमान करित असावें."

## लहानपणचें स्मरण.

अगदीं लहान असतां त्यांस त्यांची बाळगती लिव्हरपूल येथें रस्त्यांतून हिंडवी, आणि खेळवी, त्याच्या गोष्टी ते अगदीं बरोबर सांगत. आणखी त्या बाळगतीचा पोषाक कसा असे, तेंही बरोबर सांगत. तें ऐकून लोकांस मोठें नवल वाटे.

## रविवारीं प्रवास करावयाचा नाहीं.

ग्लाडस्टन ह्यांस रविवारीं प्रवास करायास बरें वाटत नसे. परंतु एकादे वेळेस असें होई कीं, महाराणी सरकार त्यांस शनिवारीं रात्रीं भोजनास विंडसर येथें बोलावीत, पण रविवारचें तसें राहाण्याचें आमंत्रण नसे. त्यामुळें त्यांस मोठा संकोच होई, आणि अडचण पडे. तेव्हां ते, तेथें डीन वेलस्ली ह्यांच्या येथें रविवारीं राहात, आणि सोमवारीं निघून घरीं येत. ही त्यांची अडचण कांहीं दिवसांनीं महाराणी सरकारच्या कानावर गेली. तेव्हां त्या त्यांस शनिवारीं रात्रीं भोजनास बोलावीनातशा झाल्या.

## झोंप.

ग्लाडस्टन ह्यांची झोंप अगदीं त्यांच्या हुकुमांत असे. उशीला डोकें लागावयाचा अवकाश कीं, झोंप आलीच, असें त्यांचें असे. होमरूलबिलाचें एवढें खडाजंगीचें प्रकरण झालें. त्यांत त्यांचें डोकें अगदीं फिरून जात असे. तरी त्यांची झोंप कधीं चळली नाहीं. बाहेर केवढी भानगड होवो, बिछान्याच्या खोलींत जातांना दाराशीं सगळे विचार ठेवायाचे आणि आंत जायाचें, हें त्यांना साधलें होतें. फार काय सांगावें, इ० स० १८८६ ह्या वर्षीं ज्या रात्रीं, मोठ्या कडाक्याचा वाद होऊन, शेवटीं त्यांच्या होमरूलाचा फडशा पडला, त्या रात्रीं देखील ते मध्यरात्रीनंतर घरीं आले, आणि आठ तासपर्यंत अगदीं स्वस्थ निजले. ही आपली गोष्ट

त्यांनीं एकदां जान ब्रैट ह्यांस सांगितली. तेव्हां, ब्रैट ह्मणाले, "तें आपलें आपणांसच साधूं जाणे. माझें त्याच्या अगदीं उलट आहे. मी आपल्या भाषणाचा विचार बिछान्यावर पडल्यावर मग करित असतों."

## गुणाची पारख.

ग्लाडस्टन ह्यांच्या कृत्यांविषयीं जबरदस्त टीका करणारे, आणि त्यांची फजीती करण्यास टपलेले असे जे कोणी होते, त्यांत स्पेक्टेटर पत्राचे कर्ते हट्टन हे प्रमुख होते. त्या पत्राविषयीं ग्लाडस्टन ह्मणाले, "ऐरलंडाच्या संबंधानें स्पेक्टेटरचे विचार असे आहेत, ह्याचें मला फार वाईट वाटतें. परंतु, त्याच्या लेखांत खरेपणाचा जो सणसणीतपणा असतो, तो पाहून मला मोठा चमत्कार वाटतो, आणि बरें वाटतें. देवाचें भय धरून आणि देवाची कृपा संपादण्याची इच्छा धरून चालविलेले असे कागद फार थोडे आहेत. त्यांतला एक स्पेक्टेटर हा आहे."

## दीर्घायुष्याचीं कारणें.

ग्लाडस्टन ह्यांच्या दीर्घायुष्याचीं कारणें सांगतात, त्यांत त्यांची पत्नी फारच उत्तम पतिव्रता आणि शाहाणी बायको होती, आणि ती त्यांस फार जपत असे, हें मुख्य कारण सांगतात. शिवाय त्यांचे वैद्यही त्यांस अतिशयित जपत असत. त्यांत सर आंड्र्यू क्लार्क हे एक वैद्य होते. त्यांनीं, एकदा प्रकृतिमान पाहून, ग्लाडस्टन ह्यांस सांगितलें कीं, आज भाषण करतां कामास नये, तें त्यांस पसंत पडलें नाहीं. शेवटीं नाहीं होय ह्मणतां ह्मणतां एक तास बोलावें, अधिक बोलूं नये असें ठरलें. त्याप्रमाणें, एक तास होतांच ग्लाडस्टन ह्यांनीं आपल्या पुढचीं टिपणें एके बाजूस लोटलीं. तरी भाषण पूर्ण होण्यास पुढें बरोबर अर्धा तास लागला !

## त्यांची प्राप्ति.

ग्लाडस्टन ह्यांचे वडील मोठे शेतकरी होते. त्यांनीं १०००००० रुपयांची जिंदगी जमवून ठेवली होती. तिचें उत्पन्न दरसाल सुमारें दोन सवा दोन लाखांचें होतें. शिवाय ग्लाडस्टन ह्यांस त्यांच्या ग्रंथकर्तृत्वावर

चांगली प्राप्ति होत असे. त्यांच्या मनांत भरे त्या विषयावर मात्र ते लिहीत असत. त्यांच्या लेखांवर मासिकपुस्तककारांच्या आणि वर्तमानपत्र-कारांच्या उड्या पडत असत. एकादा लहानसा निबंध असला, तर त्याबद्दल त्यांस ५०० रुपये मिळत आणि एकाद्या पुस्तकाविषयीं किंवा विषयाच्या संबंधानें कोटिक्रमयुक्त लांब लेख असला ह्मणजे त्याबद्दल त्यांस २००० रुपये मिळत. अशा आकारमानानें सरासरीनें, त्यांच्या लेखनकलेपासून त्यांस दरसाल, निदान तीस हजार रुपये मिळत असावे, असा अजमास केला आहे.

## मनाचा मोठेपणा.

स्पेक्टेटरपत्रामध्यें क्यानन माकोल ह्यांनीं लार्ड बीकान्सफील्ड ह्यांजवर चांगला ताशेरा झाडला होता, आणि त्यांच्या मनांत राजकारणावरून खुनस फार राहतो, असा आरोप केला होता. त्याविषयीं त्यांस ग्लाडस्टन ह्मणाले, "तुमचें ह्मणणें अगदीं चुकीचें आहे. माझा समज असा आहे कीं लार्ड बीकान्सफील्ड ह्यांच्या मनांत राजकारणावरून खुनस मुळींच कधीं राहात नाहीं. हें मला इतर लोकांपेक्षां अधिक कळलें पाहिजे; कां कीं, त्या संबंधानें त्यांचें माझें खडाष्टक कितीएक वर्षें चाललें होतें. त्यांत एवढें खरें आहे कीं, मी त्यांशीं झगडत होतों, तेव्हां त्यांनीं माझीं हाडें घुसळण्याचा प्रयत्न करण्यास तिळभरही कधीं कसूर केली नाहीं; पण, तें तितक्यापुरतेंच होतें. आतां त्यांचा आमचा कांहीं वाद नाहीं. आणि वाटतें कीं त्यांच्या मनांत माझ्याविषयीं कांहींएक वैषम्य नाहीं. आणि त्यांच्या विषयीं माझ्या मनांत तर नाहींच नाहीं. त्यांच्या ठायीं असे कांहीं सद्गुण आहेत कीं, त्यांवरून मला ते फार पूज्य वाटतात. त्यांना स्वजातीचा अभिमान केवढा तरी आहे! ते मोठे स्वस्त्रीपरायण आहेत! आणि पार्लमेंट सभा आपलीशी करून चालविण्याचें त्यांचें सामर्थ्य केवढें विलक्षण आहे!" "परगुणपरमाणून् पर्वतीकृत्य नित्यं" ह्मणतात, तें ह्यालाच.

## कोणाला कधीं दुखवायाचें नाहीं हें व्रत.

हें त्यांचें फार मोठें व्रत असे. आणि प्रसंगीं जर आपल्या बोलण्यावरून दुसऱ्यास दुःख झाल्याचा संशय आला, तर, त्याचें निवारण केल्याशिवाय त्यांस चैन पडत नसे. त्यांजवर नेहमीं टीका करणारे आणि त्यांची कुचेष्टा करणारे असे सर जान पोप हेनेसी ह्मणून एक गृहस्थ होते. त्यांस असें वाटत असे कीं रसायनशास्त्रांत माझा हात धरणारा कोणी नाहीं. त्यांनीं पार्लमेंटांत भाषण करून असें दर्शविलें कीं, इंग्लडानें फ्रान्साशीं जो व्यापार-संबंधाचा तह केला आहे, त्यांत रसायनशास्त्राच्या संबंधानें घोड्याएवढाल्या चुक्या झाल्या आहेत. आणि त्या तहाचें बहुतेक कर्तृत्व ग्लाडस्टन ह्यांचें होतें ह्मणून ग्लाडस्टन ह्यांनीं उठून त्यावर जबाब देऊन त्यांचा अगदीं फडशा पाडला. त्याविषयीं स्वतः सर जान हेनेसी ह्यांनीं एका गृहस्थापाशीं ह्मटलें कीं, "ते जसे काय स्वतः मोठे रसायनशास्त्री आहेत, असें उत्तम भाषण करून, त्यांनीं उलटी माझी चूक माझ्या पदरांत घातली, तेणेंकरून मला मोठा संकोच झाला." हें बोलणें संपल्यावर लागलेच ग्लाडस्टन हे त्यांजपाशीं जाऊन बसले, आणि फार नम्रपणानें त्यांस ह्मणाले, "आपल्याला माझें बोलणें लागलें नाहींना! फ्रान्साच्या बादशाहाचें ह्मणणेंही अगदीं आपल्या ह्मणण्यासारखेंच पडलें होतें. ह्याचें तात्पर्य एवढेंच आहे कीं, त्या बादशाहांना आणि आपणांला रसायनशास्त्र पुष्कळ येतें आहे खरें; परंतु त्यांत तुमच्या हातून चूक व्हावयाचीच नाहीं, इतकें कांहीं येत नाहीं." तें ऐकून, ते गृहस्थ आपले ठिकाणीं चकित होऊन बसले.

## शांतिमंदिर.

ग्लाडस्टन हे मोठे ग्रंथभक्त होते. त्यांस विश्रांति काय ती ग्रंथांत सांपडत असे. त्यांनीं आपल्या ग्रंथसंग्रहाकरितां एक वेगळी खोली बांधिली होती. तिला ते "शांतिमंदिर" ह्मणत. इतर कामें करून दमले भागले ह्मणजे स्वस्थपणें विश्रांति घेण्यास ते त्या खोलींत जाऊन बसत. तेथें दुसऱ्या कोणीं जाऊं नये, असा नेम होता. ती खोली अवघी ३० फूट

लांब आणि २० फूट रुंद होती. पण, ती उत्तम ग्रंथांनीं भरली होती, आणि चित्रासारखी व्यवस्थित ठेविली होती. ती सगळी व्यवस्था ग्लाडस्टन हे आपल्या हातानें करीत. दुसऱ्यास हात लावूं देत नसत. येथें निवडक ५००० ग्रंथ ठेविलेले असत. आणि त्यांजवर नजराण्याच्या ग्रंथांची केवळ वृष्टि होत असे, ते ग्रंथ दुसरीकडे ठेवलेले असत. तेथें दोन मेजें असत. एकावर ग्रंथसंबंधीं काम करावयाचें, आणि दुसऱ्यावर पत्रव्यवहाराचें काम करावयाचें, असा त्यांचा पाठ असे.

### काटकसर.

लोकांकडून आलेल्या पत्रांतले फाडून काढलेले अर्धे कोरे ताव नीट पुडकें बांधून एका मेजांत ठेवलेले असत. त्यांचा ते उपयोग प्रसंगवशात् करीत. ह्यावरून त्यांचें लक्ष अल्प गोष्टीकडेही किती होतें, तें दिसतें.

### काठ्या आणि कुऱ्हाडी.

त्या शांतिमंदिरांत ग्लाडस्टन ह्यांच्या हातांत घ्यावयाच्या काठ्या त्या बहुतेक नजर आलेल्या—इतक्या होत्या कीं, रोज नवी काठी घ्यावयाची असें त्यांनीं ह्मटलें असतें, तरी त्यांचें चाललें असतें. त्याप्रमाणेंच त्यांच्या झाडें तोडण्याच्या शौकावरून त्यांस कुऱ्हाडीही तशाच बक्षीस आलेल्या होत्या. त्या एकाएका झाडास एकएक अशा रीतीनें त्यांच्या सगळ्या जंगलास पुरल्या असत्या. ह्या काठ्या आणि कुऱ्हाडी तऱ्हेतऱ्हेच्या नक्षीच्या, सोन्यारुप्याच्या मुलाम्याच्या, आणि सोन्यारुप्याच्या मुठींच्या अशा फार मोलवान् होत्या. त्यांचें मोठें कौतुक त्यांच्या भोंवतालच्या मंडळीस वाटत असे.

### कवि होमर.

हा कवि फार प्राचीन काळीं ग्रीस देशांत होऊन गेला. त्याचा जन्म, त्याचें जन्मस्थान, त्याची कृति ह्याविषयींच केवळ नव्हे, तर, हा कवि मुळीं खरोखर झाला होता कीं नव्हता, ह्याविषयीं देखील सध्याच्या काळच्या मोठमोठ्या विद्वान् लोकांत वाद आहे. ह्याचीं दोन वीररसप्रधान काव्यें

प्रसिद्ध आहेत; "ईलियड" आणि "ओडेसी." ह्या काव्यांतल्या कथानकांवरून तर्क बसवून, अनेकांनीं अनेक मतें, प्रगट केलीं आहेत. हा विषय ग्लाडस्टन ह्यांचा फार आवडीचा होता. त्यांस ग्रीक भाषा चांगली येत असे, आणि त्यांस प्राचीन विषयांचा शोध करण्याचा मोठा शौक होता. त्याच्या योगानें ह्या विषयावर त्यांचे पुष्कळ परिश्रम झाले आहेत. ह्याविषयीं त्यांनीं कितीएक ग्रंथ लिहिले आहेत. ते विद्वान् लोकांस फार मान्य आहेत. आणि ह्या प्रकरणीं वाद निघाला असतां, ग्लाडस्टन ह्यांच्या ग्रंथांचा उल्लेख मोठ्या मान्यतेनें झाल्याशिवाय राहात नाहीं. ग्लाडस्टन ह्यांचें मत असें होतें कीं, ह्या काव्यांतील कथांचा संबंध ख्रिस्तीधर्मशास्त्रांतल्या कथांशीं पुष्कळ आहे. ह्यास्तव, ह्या काव्यांचा विचार केवळ वाङ्मयात्मक समजूं नये; तर, त्याशीं ख्रिस्तीधर्मशास्त्राचा मेळ घालून त्याचा विचार करावा. ह्या विषयाकडे ग्लाडस्टन ह्यांचा ओढा अगदीं लहानपणापासून जो होता, तो शेवटपर्यंत तसा कायम राहिला होता. ह्या विषयाचा अभ्यास आणि शोध कितीएक वर्षें करून, त्याचें तात्पर्य त्यांनीं शेवटीं लिहिलें आहेः— "असा अभ्यास आणि शोध कितीही केला, आणि त्याच्या योगानें कितीही बुद्धिसामर्थ्य वाढलें, तरी त्यावरून असें कळतें कीं, ह्या ज्ञानाच्या योगानें आपलें मनुष्यजातीचें शेवटीं काय होणार आहे, ह्या महाप्रश्नाचा निर्णय ह्यानें होणार नाहीं; चिंता, दुःख आणि मृत्यु ह्यांच्या नांगीचा जोर कमी होणार नाहीं; आणि जें ईश्वरी ज्ञान प्राप्त झालेलें आहे, तें देखील जशाचें तसें अचल राहण्यास साधन होणार नाहीं."

ग्लाडस्टन आणि डिझरायली हे राजकारणांत, एकमेकांचे प्रतिस्पर्धी होते. त्यांच्यांत भेद पुष्कळ प्रकारचे होते.

१ ग्लाडस्टन हे इंग्लिश गृहस्थ होते; डिझरायली हे यहुदी गृहस्थ होते.

२ ग्लाडस्टन हे ल्याटिन, ग्रीक, फ्रेंच इत्यादि भाषांत आणि इतर गहन विषयांत प्रवीण होते; डिझरायली बरेच शिकलेले होते, पण हे महाविषय त्यांस ज्ञात नव्हते.

३ ग्लाडस्टन हे, कोणताही विषय ह्मटला तरी, हातीं घेतला कीं त्यावर परिश्रम जीवापाड करीत असत. डिझरायली मनापासून असे कधीं कोणत्याच विषयावर परिश्रम करीत नसत.

४ ग्लाडस्टन हे आरंभीं पक्के कान्सर्व्हेटिवपक्षाचे होते, ते, जसजसा ज्ञानाचा प्रकाश त्यांच्या अंतःकरणांत अधिकाधिक पडत गेला, तसतसे ते लिबरलपक्षाचे होत होत, शेवटीं त्या पक्षाचे ते अत्युत्तम पुढारी झाले. डिझरायली हे तरुणपणीं लिबरलपक्षाचे होते, ते होत होत, कशानें कोण जाणे, शेवटीं कान्सर्व्हेटिव पक्षाचे मोठे जबरदस्त पक्षपाती झाले.

५ ग्लाडस्टन ह्यांची खात्री अधिकाधिक होत गेली, तसतशीं त्यांनीं आपलीं राजकारणप्रकरणीं मतें बदललीं. त्यांविषयीं कधीं संकोच केला नाहीं. डिझरायलींचीं खरीं मतें काय होतीं, हेंच मुळीं आधीं कोणास कधीं कळलें नाहीं.

६ हे दोन्ही गृहस्थ निःपक्षपातीपणाविषयीं एकसारखेच प्रसिद्ध होते. पक्षपात केल्याचा कधीं एकावरही आरोप आला नाहीं. आणि वादविवादांतल्या कोट्यांविषयीं डिझरायली हे जरी ग्लाडस्टनांपेक्षां पुष्कळ कमी होते, तरी ते लार्ड होऊन लार्डांच्या सभेंत गेल्यावर, ग्लाडस्टन ह्यांस वारंवार चुकल्या चुकल्यासारखें वाटे. कां कीं, वाद करावयास तरी प्रतिपक्षी असल्यावांचून खऱ्या वक्तयाचें समाधान होत नाहीं.

## मनाचा मोकळेपणा.

गुलामांच्या व्यापाराविषयीं मतभेद होऊन अमेरिकेंतल्या स्वतंत्र संस्थानांमध्यें आपसांत लढाई चालू झाली. त्यांत उत्तरेकडचीं संस्थानें गुलामगिरीच्या विरुद्ध होतीं. आणि दक्षिणेकडचीं संस्थानें गुलामगिरीस अनुकूल होतीं. ह्या संबंधानें इंग्लंडांतही मतभेद पडला होता. त्यांत चमत्कार असा झाला कीं, ग्लाडस्टन हे पटकन् दक्षिणेकडच्या संस्थानांच्या वतीचे आपण आहोंत असें बोलून चुकले. तें ऐकून त्यांच्या सगळ्या मित्रांस आणि अनुयायांस पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें, आणि अतिशयित वाईट वाटलें. पण ती

चूक ग्लाडस्टन ह्यांनीं पुढें दुरुस्त केली. ते ह्मणाले, "मी बोलतांना चूक केली, हें मला कबूल करणें भाग आहे. पण माझा हेतु कांहीं वाईट नव्हता. मला अमेरिकेंतले सगळेच लोक माझेसे वाटतात. कदाचित् दुसऱ्या पुष्कळ इंग्लिश गृहस्थांप्रमाणें, त्या संस्थांचे संबंध माझ्या लक्षांत बरोबर आले नाहींत, त्यामुळें तोंडांतून तसें निघून गेलें."

## काडी मोडून देणें.

नवऱ्यानें बायकोस काडी मोडून देणें हें ग्लाडस्टन ह्यांस अगदीं असंभवनीय वाटत असे. कां कीं, लग्न ही परमेश्वरी सूत्राची गांठ आहे, अशी त्यांची समजूत होती. आणि ह्मणूनच इ० स० १८५९ ह्या वर्षी ते काडी मोडून देण्याच्या कायद्यास विरुद्ध होते.

## पार्लमेंटांत शेवटचें भाषण.

पार्लमेंटांत शेवटचें भाषण ग्लाडस्टन ह्यांनीं इ० स० १८९४ च्या मार्च महिन्याच्या पहिल्या तारखेस तें अगदीं नेहमींच्या रीतीप्रमाणें मोठ्या आस्थेनें, साधेपणानें, आणि कळकळीनें केलें. तें शेवटचें होतें, असें त्यांचें स्वतःचें ठरलेलें होतें, आणि त्याप्रमाणें तें शेवटचें होतें हें लार्ड मोर्ले, जस्टिन मकार्थी इत्यादि त्यांच्या निकटपरिचित मंडळीस ठाऊकही होतें. परंतु तसें, त्यांनीं आपल्या बोलण्यांत कोणत्याही प्रकारें दाखविलें नाहीं. एकसष्ट वर्षे ज्या सभेंत घालविलीं, त्या सभेचा निरोप घेण्याच्या संबंधानें त्यांच्या तोंडांतून एक अक्षर देखील निघालें नाहीं. हें अंतःकरणाच्या साधेपणाचें लक्षण होय.

## न्याय व्हावा अशी उत्कट इच्छा.

ही ग्लाडस्टनांच्या ठायीं मनस्वी होती. अंमळ कोठें अन्याय झाल्याचें त्यांच्या नजरेस आलें ह्मणजे, त्याचें निवारण करण्याचा प्रयत्न केल्याशिवाय त्यांना चैन पडत नसे. त्याविषयीं त्यांना जसा चळ भरे. ऐरलंडांतले कांहीं विद्वान् लोक देखील, दंग्यास सामील किंवा उत्तेजक—झाल्याच्या संशयावरून, प्रतिबंधांत घातले होते. त्यांत एक नामांकित वैद्य होता. त्यास अडकवून टाकून शिवाय, जीं काय सार्वजनिक कामें दिलेलीं होतीं,

तींही त्यापासून काढून घेतलीं होतीं. हें पार्लमेंटांतल्या वादांत ग्लाडस्टनांस कळलें आणि त्यांना असें वाटलें कीं, ही दुप्पट शिक्षा अन्यायाची आहे. ह्मणून त्यांनीं लगेच फार्स्टर, ह्यांस सांगून, त्यांजकडून त्या वैद्याचीं सगळीं सार्वजनिक कामें त्यांस परत देवविलीं.

## प्रतिपक्षाच्या गुणांचें कौतुक.

ऐरलंडाच्या होमरूलाच्या कायद्याच्या वादावरून ग्लाडस्टन ह्यांचे पुष्कळ मित्र—पुष्कळ भक्त—त्यांचा पक्ष सोडून गेले होते. त्यांत चेंबर्लेन ह्मणून एक गृहस्थ होते. त्यांस ग्लाडस्टन ह्यांनींच पदवीस चढविलें होतें. परंतु, तेही ह्या प्रसंगीं त्यांस सोडून गेले होते. त्यांत कांहीं नवल नव्हतें. कां कीं, ती गोष्ट मतस्वातंत्र्याची होती. परंतु, चमत्कार असा झाला कीं, ह्या चेंबर्लेनांचे चिरंजीव आस्टिन चेंबर्लेन हेही पार्लमेंटांत होते. ते अगदीं तरुण होते. आणि ते आपल्या पित्याप्रमाणेंच होमरूलबिलास अगदीं प्रतिकूल होते. ते सभेमध्यें उभे राहिले, आणि त्यांनीं, ग्लाडस्टनांवर ताशेरा झाडिला. तो इतका कीं, तो ऐकून त्यांच्या वडिलांस फार वाईट वाटलें आणि त्यांच्या मनांत असें आलें कीं, ह्याचा जबाब देण्यास ग्लाडस्टन उठतील तेव्हां ह्याचा किती फडशा पाडतील कोण जाणे. पुढें ग्लाडस्टनांनीं भाषणास आरंभ केला तेव्हां वडील चेंबर्लेन मोठ्या उत्सुकतेनें त्यांजकडे लक्ष लावून बसले होते. पण, ह्या थोर गृहस्थांनीं त्या तरुण चेंबर्लेनांच्या भाषणाच्या चांगुलपणाचें अभिनंदन करून ह्मटलें कीं, ह्या भाषणाच्या श्रवणानें ह्यांच्या पित्यास कितीतरी समाधान वाटलें असेल! तें ऐकून, वडील चेंबर्लेनांच्या अंतःकरणांत ग्लाडस्टनांच्या औदार्याविषयीं काय आलें असेल, ह्याची कल्पनाच करावी. त्याचें वर्णन करणें अशक्य आहे.

## पत्नीसुख.

ग्लाडस्टन डे पत्नीच्या संबंधानें मोठे भाग्यवान् होते. त्यांच्या पत्नी-सारखी पत्नी पुरुषास मिळणें हें खरोखर मोठें सुदैव होय. ती पत्नी सगळा प्रपंच पाही. ग्लाडस्टनांस त्याकडे लक्ष देण्यास कधीं कारण पडत नसे; आणि सगळा वेळ विद्याभ्यास आणि देशसेवा ह्यांत घालवायास

सांपडत असे. त्याच्या योगानेंच त्यांचे हातून एवढालीं मोठीं आणि इतकीं सार्वजनिक कामें झालीं. लोकांत त्या बाईचा मान फार मोठा आहे. सुमारें अठ्ठावीस वर्षांमागें ग्रीनिच येथें, त्यांवर खवळलेल्या हजारों लोकांत भाषण करण्याचा प्रसंग ग्लाडस्टन यांस आला होता तेव्हां, ही बाई, त्यांवर छत्री धरून उभी राहिलेली पाहून, लोकांच्या मनांतला द्वेषभाव नाहींसा झाला. आणि त्यांच्याकडून दांडगाई होईल असें वाटत होतें, ती दांडगाई न होतां उलटा ह्या स्त्रीपुरुषांचा जयजयकार कानीं झाला.

## कुटुंबांत शांति आणि ऐक्य.

ग्लाडस्टन ह्यांस मुलगे आणि मुली झाल्या. त्यांचा परिवार मोठा होता. परंतु, त्यांत शांति कांहीं विलक्षण असे. सगळ्या माणसांचा एकच जीव होता. सगळीं माणसें एकमेकांशीं अत्यंत प्रेमानें वागत. त्यांत कधीं फूट पडलीं नाहीं. आणखी, तीं ग्लाडस्टन ह्यांस भजण्याविषयीं निरंतर तत्पर असत—एकमेक पुढें उड्या घेत असत. हेंच खरें कुटुंबसुख.

## राग येई पण विचार होई.

आपण सरकारचें आणि राष्ट्राचें काम इतक्या आस्थेनें करितों आणि त्यापासून इतके लाभ होण्याची आशा दिसत आहे, त्या पक्षीं आपलें मत प्रधानमंडळीनें मानावें, कधीं त्याच्या विरुद्ध जाऊं नये, असें ग्लाडस्टन ह्यांस वाटत होतें. तें साहाजिक होतें. आणि तसें कांहीं झालें नाहीं, ह्मणजे त्यांस राग येत असे आणि आतां मी राजीनामा देतों असें ते त्या तिरमिरीसरसें वारंवार ह्मणत. इ० स० १८६७ चा जमाखर्चाचा खरडा लार्डांची सभा मान्य करीत नाहीं, असा रंग दिसल्यावर, ते ह्मणाले कीं, त्या सभेनें मामुल वहिवाटीप्रमाणें रीति धरिली नाहीं, तर मी काम सोडून देईन. तेव्हां लार्ड पामरस्टन ह्यांनीं त्यांस समजून सांगितलें कीं, "तुमच्या खरड्याच्या योगानें कागदावरचा कर कमी होऊन ते सस्ते होणार आहेत खरे, आणि तें चांगलें आहे खरें, पण ह्या तुमच्या काम सोडण्यानें दोन सभांत वैमनस्य येईल, हें कांहीं ठीक नाहीं. त्यानें तुमचें मात्र नुकसान होईल." तें त्यांनीं गुपचूप ऐकून घेतलें. आणि ते तसेंच काम करीत राहिले.

## मध्यमप्रतीचे गृहस्थ ह्मणून घेणें.

त्यांचें घराणें मध्यमप्रतीच्या सभ्य गृहस्थांतलें होतें. सरदारघराणें नव्हतें. त्याविषयीं त्यांस कांहीं कमीपणा वाटत नसे. ते एकदा ह्मणाले, "व्यापारानें संपत्ति संपादल्यावर आपली पूर्वस्थिति माणसांस लज्जास्पद वाटते, किंवा ते ती विसरतात, ही गोष्ट फार खेदकारक आहे."

## "त्यांना इतकें काम कसें करतां आलें?"

इतका अभ्यास, इतकें दरबारी काम, आणि इतके ग्रंथ लिहिणें हें त्यांना कसें करतां आलें, असा प्रश्न पुष्कळ लोक करितात. त्याचें उत्तर एका चौकस ग्रंथकारानें लिहिलें आहे, तें असें:—"कोणतेंही काम झालें तरी तें ते कांहीं नियमित पद्धतीनें करित असत. ते पाठशाळेंत होते तेव्हां काय आणि इतर कोठें असत तेव्हां काय, तरुणपणीं, दाहा वाजल्यापासून दोन वाजतपर्यंत ते कधीं कोणास भेटले नाहींत. कां कीं तो वेळ आपल्या लेखनवाचनादि अभ्यासांत ते घालवीत असत. हा त्यांचा क्रम अठरावे वर्षापासून चोविसावे वर्षापर्यंत एकसारखा चालला होता."

## त्यांची वाक्यरचना.

बोलतांना काय आणि लिहितांना काय, त्यांचीं वाक्यें लांबलचक असत. एका भाषणांत त्यांनीं एक प्रश्न काढिला होता, त्यांत एकशें वीस शब्द होते! आणि दुसऱ्या एका भाषणांत, एक वाक्य बोलायास त्यांस सुमारें पांच मिनिटें लागलीं! त्यांस शब्द एकामागून एक इतके जलद कसे आठवतात, ह्याचा मोठा अचंबा लोकांस वाटे. त्यांनीं सहसा एक शब्द एका वाक्यांत दोनदां देखील येऊं दिला नाहीं.

## ग्लाडस्टनांच्या मागें त्यांच्या जागीं कोण?

हा प्रश्न स्टेड ह्या ग्रंथकारांस रशियाच्या झार महाराजांनीं केला होता, तेव्हां त्यांनीं त्यांस उत्तर दिलें, "ग्लाडस्टनांच्या जागीं ग्लाडस्टनांसारखा तर माणूस मिळावयाचा नाहीं. आतां, ते गेल्यावर आह्मी कोणाला तरी त्यांच्या जागीं बसवूं हें खचीत आहे, पण ते त्यांच्या बरोबरीचे मिळणार नाहींत —ग्लाडस्टन एकच आहेत."

## डांटी कवि.

होमर कवीच्या खालोखाल ग्लाडस्टन ह्यांस डांटी हा इटालियन कवि आवडत असे. त्याविषयीं त्यांनीं एकदा ह्मटलें, "डांटी हे माझे गुरु आहेत. त्यांच्या ग्रंथाचें अध्ययन हें मनास आणि अंतःकरणास—ह्मणजे सगळ्या मनुष्यपणास—उत्तम शिक्षण आहे. ह्या डांटी गुरुजींच्या शाळेंत मला मानसिक अन्न इतकें प्राप्त झालें आहे कीं, तें मला सगळा जन्मभर पुरत आहे. जो कोणी डांटीच्या बोधानुरूप वागतो, तो इटलीची सेवा करितो, धर्माची सेवा करितो, आणि सगळ्या जगाची सेवा करितो."

## मान आणि निस्पृहता.

सर राबर्ट पील ह्यांच्या मुख्य प्रधानकीच्या कारकीर्दीत इ० स० १८४६ ह्या वर्षीं पार्लमेंटाच्या सभासदांची निवड झाली. त्या वेळीं ते, आपल्या जुन्या न्यूआर्काच्या वतीचे प्रतिनिधि होण्यास मुळींच गेले नाहींत. कां कीं, त्याचें स्वामित्व ड्यूक आफ् न्यूक्यासल ह्यांजकडे होतें. ते संरक्षणमतवादी होते, आणि ग्लाडस्टन हे आतां पूर्णपणें अप्रतिबंधव्यापारवादी झाले होते. रिकामा मान नको, निस्पृहता पाहिजे, हें ह्या वर्तनाचें तात्पर्य होतें.

## मतभेद हें वैरास कारण नसावें.

असें ग्लाडस्टन ह्यांस नेहमीं वाटे आणि त्याप्रमाणें ते वागत. लार्ड बीकान्सफील्ड ह्मटले ह्मणजे त्यांचे पक्के प्रतिपक्षी—ते राजकारणांत; परंतु, एरव्हीं त्यांविषयीं त्यांच्या मनांत फार प्रेम असे. त्यांचे फार गुण घेत असत, आणि ते मृत झाल्याचें कानीं पडल्यावर त्यांचा प्रेतविधि सरकारी खर्चानें व्हावा ह्मणून प्रथम सूचना त्यांनीं केली. त्याप्रमाणेंच लार्ड साल्सबरींविषयीं असे. ते त्यांविषयीं एकदा ह्मणाले, " लार्ड साल्सबरी हे कांहीं आपल्या नुसत्या राजकारणमतांच्या ओंजळीनें पाणी पीत नाहींत, ते मोठे प्रामाणिक आहेत. त्यांना मी लहानपणीं तांबडें आंगडें घालून आपल्या आईशीं खेळतांना पाहिलें आहे, तेव्हांपासून आजपर्यंत त्यांच्याविषयीं माझ्या मनांत कधीं दुजाभाव आला नाहीं."

## झाडें तोडण्याचाच व्यायाम कां करीत?

ह्याचें उत्तर असें होतें कीं, ह्या व्यायामांत देह आणि मन हीं एकसारखीं गुंतलेलीं राहतात. त्यांस दुसरा विषय घेण्यास सवडच होत नाहीं. ह्या एकाग्रतेच्या योगानें देह आणि मन ह्या दोहोंसही आरोग्य प्राप्त होतें. घाव नीट चांगला भक्कम बसावा ह्मणून देहास जपावें लागत असतें, आणि तो पहिल्या नेमलेल्या ठिकाणीं पडावा, दुसरीकडे पडूं नये, ह्याविषयीं मनास आणि डोळ्यांस जपावें लागतें. असा एकाग्र व्यायाम उभयतांस आरोग्यदायक होतो, असें मत होतें. ह्मणून ते हें काम पुष्कळ करीत.

## जार्ज वाशिंग्टन ह्यांविषयीं पूज्यबुद्धि.

"सार्वजनिक कामांतलें वर्तन आणि साधारण आचरण हीं काबडेन ह्यांचीं जितकीं पवित्र आणि वर्णनीय होतीं, तितकीं, जार्ज वाशिंग्टन खेरीज करून, दुसऱ्या कोणाही माणसाचीं मला कधीं आढळलीं नाहींत. मला तर असें वाटतें कीं, सगळ्या इतिहासांत जार्ज वाशिंग्टन हे अत्यंत पवित्र पुरुष होते. माझ्या स्वतःच्या शिक्षणांत त्यांचा कित्ता जो माझ्या उपयोगीं पडला आहे, तो कांहीं लहान नाहीं. फार मोठा आहे." असें ते एकदा ह्मणाले.

## जबरदस्त चालणारे.

ग्लाडस्टन हे पहिल्यापासून जबरदस्त चालणारे होते. ते आक्सफोर्ड येथें असतां बरोबर एकदोन सोबती घेऊन दररोज सायंकाळीं फिरायास बाहेर पडत. तेव्हांच त्यांचा असा निश्चय झालेला असे कीं आज अमुक मैल चालायाचें. आणि तितकें चालल्याशिवाय ते कधीं राहात नसत. मग पावसाची मुसळधार असो का कांहीं असो, आणि बरोबर कोणी असो कीं नसो. त्यांची प्रकृति चांगली राहिली होती, त्यास जीं अनेक कारणें होतीं, त्यांत मुख्य कारण हें होतें.

## साधेपणा.

पुष्कळ वर्षें झालीं. तेव्हां कांहीं लोक ब्रायांबो येथून क्कीनफेरी येथें

लोखंड गाड्यांतून वाहून नेण्यास लाविले होते. त्यांतल्या एकाची आणि ग्लाडस्टनांची वाटेंत गांठ पडली. त्यांनीं त्या मजुरास गाडीभाड्याच्या वगैरे इकडच्या तिकडच्या कितीएक गोष्टी विचारिल्या. त्यांचें बोलणें संपतां संपतां ते टेंकडीच्या पायथ्याशीं आले, तेव्हां जनावरांस गाडी ओढण्याचें फार कठिण पडूं लागलें. तेव्हां ग्लाडस्टन ह्यांनीं गाडीवाल्यास ह्मटलें, आतां पुढें कसें करणार?

**गाडीवाला**—कसें काय करायाचें? खांदा दिला पाहिजे.

**ग्लाडस्टन**—चला, मी थोडासा खांदा देतों.

असें ह्मणून त्यांनीं लागलाच खांदा दिला, आणि ते सगळे टेंकडी चढून वर गेले. तेथें—

**गाडीवाला**—कायहो, तुह्मी अगदीं घोड्यासारखें ओढलें.

**ग्लाडस्टन**—कोण जाणे? जनावरांचे पाय कसे दुखत नाहींत न कळे, माझे तर दुखून आले बुआ! पण आतां तुह्मी जाल ना?

**गाडीवाला**—होय, आतां सहज जाईन. सलाम.

ह्याप्रमाणें ग्लाडस्टन तेथून निघून गेल्यावर एक व्यापारी तेथें येऊन गाडीवाल्यास ह्मणाला, "तुझ्या गाडीला खांदा दिला ते कोण होते तुला ठाऊक आहेत का?"

**गाडीवाला**—नाहीं बुआ. त्यांची माझी कांहीं ओळख नाहीं.

**व्यापारी**—अरे, ते ग्लाडस्टन होते.

**गाडीवाला**—कोण! ग्लाडस्टन! तर मग त्यांनीं मला काय ह्मटलें असेल कोण जाणे! मीं त्यांना नुसतें महाराज देखील ह्मटलें नाहीं! आतां काय करावें! होऊन गेलें!

## मीपण मुळींच नाहीं.

एके दिवशीं ग्लाडस्टन हे रस्त्याच्या बाजूस एक झाड तोडीत होते. तेथें एक ह्मातारा माणूस येऊन त्यांस न्याहाळून पाहून ह्मणाला, "ह्मातारे बुआ, ती कुऱ्हाड इकडे द्या पाहूं." तें ऐकून ग्लाडस्टनांनीं त्यास आपल्या हातांतली कुऱ्हाड दिली. तिनें त्या ह्माताऱ्या माणसानें कांहीं घाव मारले

आणि त्यांकडे बोट करून ग्लाडस्टनांस ह्मटलें, "असें तोडावें. माझा तर सगळा जन्म ह्यांत गेला आहे." पुढें कांहीं दिवसांनीं त्या ह्यातान्या माणसास समजलें कीं आपण ज्यांपाशीं असें बोललों, ते ग्लाडस्टन होते. तेव्हां त्याला मोठा संकोच झाला, आणि तो ग्लाडस्टनाकडे जाऊन त्यांपाशीं क्षमा मागूं लागला. त्यास त्यांनीं उत्तर दिलें, "क्षमा मागण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं."

## बायकांविषयीं.

टोलेमाचे ह्या नांवाच्या त्यांच्या एका मित्रापाशीं ह्याविषयीं त्यांचें बोलणें झालें. तेव्हां ते ह्मणाले, "बायकांस कामधंदे करण्याची मोकळीक देण्यास आमची कांहीं आडकाठी नाहीं. परंतु, त्यांस पार्लमेंटाचे सभासद निवडण्याचा अधिकार मात्र देऊं नये. तो दिला, कीं, त्यांला मग सर्व कांहीं अधिकार दिले पाहिजेत. अमका एक नको असें ह्मणतां यावयाचें नाहीं."

**टोलेमाचे**—सर्व कांहीं अधिकार ह्मणजे काय ? त्यांस न्यायाधीश किंवा सेनापति होण्याची इच्छा होईल, असें तुह्मांस वाटतें काय ?

**ग्लाडस्टन**—हो. त्यांना न्यायाधीश आणि सेनापति होण्याची इच्छा होईल.

**टोलेमाचे**—बरें, पण त्या जर सेनापति व्हावयास पाहतील, तर त्या कामास त्या शरीरबळानें कमी आहेत असें सांगावें ह्मणजे झालें.

**ग्लाडस्टन**—पण त्यावर त्या असें ह्मणतील कीं, आह्मी जर त्या कामास अयोग्य असलों— आमच्या शरीरीं तें जर सामर्थ्य नसलें—तर आह्मी सेनापति होणार नाहीं—आह्मांला कोणी सेनापति करणार नाहीं. पण, कायद्यानें बंदी कां ?

**टोलेमाचे**—होय. जान स्टुअर्ट मिल्ल ह्यांचा कोटिक्रम ह्या विषयावर, असाच आहे. त्यांनीं असें ह्मटलें आहे कीं, ज्यांचे हात अशक्त असतात, त्यांनीं लोहाराचें काम करूं नये, असा कधीं कोणीं कायदा केलेला नाहीं.

**ग्लाडस्टन**—तरी त्यांना एक सवलत द्यावी असें मला वाटतें.

आमच्या विश्वविद्यालयांच्या एवढाल्या मोठ्या उत्पन्नांतून त्यांस कांहींच मिळत नाहीं.

**टोलेमाचे**—तर मग काय त्यांस पाठशाळांमध्यें गुरूंच्या जागा द्यावयाच्या?

**ग्लाडस्टन**—तसेंच केवळ नव्हे. परंतु, व्यवहारांत त्यांचे हातपाय पुरुषांपेक्षां फारच अधिक बांधलेले आहेत. त्यांत कांहीं होईल तेवढी सवलत करावयाची.

## गोस्तनदेवींविषयीं विरुद्ध मत.

**टोलेमाचे**—मला वाटतें कीं, बहुतेक सगळ्या डाक्टरांस गोस्तन देवींची कृति पसंत आहे.

**ग्लाडस्टन**—होय. शेंकडा नव्याण्णवांस पसंत आहे. परंतु, कांहीं कालापूर्वी देवींवरून देवी काढणें—तोडगा करणें—हें पुष्कळांस मान्य होतें. तो आतां अपराध झाला आहे.

**टोलेमाचे**—पण गोस्तनदेवी काढल्यानें आंगाच्या देवींचें निवारण खरोखर होतें काय?

**ग्लाडस्टन**—होय. होतें. पण, त्यानें पटकीसारख्या सांतीच्या रोगांची उचल अधिक होते. मुलांचीं आंगें चांगलीं साफ गुलगुलीत असतात, तीं टोंचणें—त्यांस फोड आणणें—हें मला बरें वाटत नाहीं. पण त्याविषयीं मी आमच्या डाक्टरांपाशीं बोलत नाहीं.

**टोलेमाचे**—पण, तुह्मी गोस्तनदेवींस विरुद्ध आहां काय?

**ग्लाडस्टन**—मी विरुद्ध नाहीं. परंतु, त्याविषयीं लोकांवर कायद्याची सक्ती असणें मला आवडत नाहीं. तितकी आवश्यकता नसतां, मुलें आणि आईबापें ह्यांच्यामध्यें सरकारानें पडावें, ही गोष्ट मला अगदीं आवडत नाहीं. सरकाराच्या हातून आईचें काम—मुलांची जोपासना करण्याचें काम—चांगलें व्हावयाचेंच नाहीं.

## पुढें काय होईल ?

**टोलेमाचे**—ह्या सुधारणाकालाचा परिणाम पुढें फार चांगला होईल असें तुह्मांला वाटत नाहीं काय ?

**ग्लाडस्टन**—चांगलाच होईल अशी माझी खातरी नाहीं. पुढें काय होणार आहे, हें मला कांहींएक कळत नाहीं.—त्याविषयीं कागद अगदीं कोरा चक्क आहे—त्यावर कांहींएक लिहिलेलें दिसत नाहीं. पुढच्या कोणत्याही गोष्टीविषयीं तर्क करितां येत नाहीं.

**टोलेमाचे**—साधारण लोकमत प्रबल होऊन बाकी सगळ्यांचा फडशा पाडील, अथवा शास्त्रीय विषयांचें परिज्ञान हें दिवसेंदिवस धर्मनिष्ठेच्या मर्यादा उल्लंघीत जात आहे तें फार वाढेल, असें तुह्मांला वाटतें कीं काय ?

**ग्लाडस्टन**—मला साधारण लोकमतप्राबल्याचें भय वाटत नाहीं, तसें शास्त्रीय परिज्ञानाचेंही भय वाटत नाहीं. परंतु, मला द्रव्यलोभाचें भय मनस्वी वाटत आहे. हा दुर्गुण दिवसानुदिवस वाढत चालला आहे. त्याप्रमाणेंच, लोकांत लढाई करण्याची इच्छा वाढत चालल्यासारखी दिसत आहे हें देखील एक मोठें अरिष्ट आहे.

## ग्लाडस्टन आणि कार्लाईल.

कार्लाईल हे एक फार मोठे तत्त्ववेत्ते होते. ते आमच्या प्राचीन ऋषींसारखे कांहींसे राहात असत. लोकांत त्यांना फार मोठा मान असे. त्यांचे ग्रंथ लोकमान्य आहेत. पण, ग्लाडस्टनांविषयीं त्यांचें मत विलक्षण होतें. त्यांचा चमत्कार स्टेड ह्या नांवाच्या ग्रंथकारानें समक्ष पाहिलेला लिहिला आहे. तो असाः—एके वेळीं मोठ्यांनीं गुरगुरून—

**कार्लाईल**—हे ग्लाडस्टन पाहा. सगळ्या देशभर धांवाधांव करीत आहेत, बडबड बडबडत आहेत, त्यांनीं कागदांचे कोसांचे कोस भरत आहेत, पण, त्यांत शाहाणपणाचा एक शब्द असेल तर शपथ.

**मी**.—अहो महाराज, खरोखर आपण जर ग्लाडस्टनांच्या अलीकडच्या भाषणांपैकीं एकादें भाषण वाचून पाहातेत, तर आपणांस मोठा संतोष

झाला असता. आपण जें काय मला पढवीत आहां, तेंच त्या भाषणांत आहे. दुसरें कांहीं नाहीं. एक भाषण नुकतें परवां आठ दिवसांपूर्वीं झालें. आपल्या लक्षांत नाहीं काय?

**कार्लाईल**—(तिरस्कारमुद्रेनें) माझ्या लक्षांत! छिः मीं त्यांचीं भाषणें वाचतों, असें तुमच्या मनांत तरी कसें येतें? मीं त्यांतला एक शब्द देखील कधीं वाचला नाहीं!

## हे ह्मणत त्यांना भ्रमिष्ट आणि ते ह्मणत ह्यांना भ्रमिष्ट.

होल ह्या नांवाचे एक चित्रकार आहेत. त्यांनीं प्रथम जान ब्रैट ह्यांचें चित्र काढिलें. तें काढून घेण्याकरितां जान ब्रैट हे बसले असतां, त्यांस सहजवृत्ति होल हे ह्मणाले, "ग्लाडस्टनांशीं आपला इतक्या वर्षांचा एवढा मोठा परिचय होता, त्यामुळें त्यांचा संबंध तोडण्यास आपल्या अगदीं जीवावर आलें असेल, नाहीं बरें! खरोखर फार जड गेलें असेल." तें ऐकून, उष्ण श्वास टाकून,

**ब्रैट**—खरेंच! इतकीं वर्षें खांद्याशीं खांदा लावून आणि हातांत हात घालून काम केल्यावर आणि आनंदानें दिवस घालविल्यावर, ह्या उतार-वयामध्यें एकमेकांस सोडून देण्याचा प्रसंग आला, हें मनांत आलें ह्मणजे फारच वाईट वाटतें. आणखी तें सोडून द्यावें लागलें कशाकरितां? त्यांच्या डोक्यांत भलतेंच कांहीं वेड शिरलें आहे, आणि त्या वेडामुळें ते आपलें कर्तव्य सोडून देऊन भलभलतेंच करिताहेत ह्मणून. मी तुह्मांला खरेंच सांगतों कीं, ते आतां कांहीं शुद्धीवर नाहींत. काय करावें?

पुढें एकदा ग्लाडस्टनांचें चित्र काढीत असतां होल हे ह्मणाले, "आह्मी परवां ब्रैट ह्यांचें चित्र काढिलें, तेव्हां देखील बोलतां बोलतां ही गोष्ट निघाली होती."

**ग्लाडस्टन**—बरें मग! ते काय ह्मणाले? तुह्मांला काय वाटलें!

**होल**—ह्मणायाचें काय? ते आपणाविषयीं फार कळवळ्यानें आणि प्रेमानें बोलले. त्यांना फार दुःख वाटल्यासारखें दिसलें!

**ग्लाडस्टन**—खरेंच काय? खरेंच का पण? अरेरे! काय करावें! बहुतेक जन्मभर चांगलें काम एकत्रपणें केल्यावर, अशा अगदीं सरळ आणि साधारण विषयाच्या संबंधानें मतभेद पडून दोघांची तुटातुट व्हावी, हा खरोखर फार मोठा धक्का आहे! (इतक्यांत अमळ थांबून आणि ओंठ चावल्यासारखें करून) पण, इकडे पाहा, तुह्मीच सांगा, त्यांचें मन कांहीं थाऱ्यावर नाहीं, त्यांना भ्रम झाला आहे, त्यांचें डोकें फिरलें आहे, असें तुह्मांला त्यांच्या एकंदर वागण्यावरून नाहीं का दिसून आलें?

## राजेरजवाड्यांच्या बरोबरीचा मान.

इ० स० १८८३ ह्या वर्षीं ग्लाडस्टन आपल्या पत्नीसहवर्तमान विश्रांत्यर्थ, थोडे जलप्रवासास निघाले. त्या आगबोटीचें नांव प्रेमब्रोक क्यासल असें होतें. त्यांच्याबरोबर त्या वेळीं राजकवि लार्ड टेनिसन होते. ही स्वारी सप्तंबरांत बाहेर पडली. तीं सगळीं माणसें प्रथम नार्वे देशांत गेलीं, आणि मग डेन्मार्ककडे वळलीं. त्याची राजधानी कोपेनहेगेन, येथें तेथल्या राजाराणींनीं त्यांस राजवाड्यांत टोलेजंग मेजवानी दिली. त्या मेजवानीस रशियाचे झार महाराज, त्यांच्या राणीसाहेब, ग्रीसचे महाराज, त्यांच्या राणीसाहेब, आणि आपल्या बादशहांच्या मातुश्री राणी अलेक्झांड्रा हीं नामांकित माणसें आलीं होतीं.

## ऐरलंडांतल्या लोकांविषयीं.

"ऐरलंडाची गोष्ट इतर राष्ट्रांसारखी नाहीं. इंग्लड त्यावर जुलूम करीत आहे. तो जुलूम, पूर्वीं देश काबीज करीत असलेल्या किंवा भयप्रद असलेल्या राष्ट्राच्या जुलुमासारखा नाहीं. ह्मणजे रशियन लोक पोल लोकांवर करतात तसा किंवा स्पानियर्ड लोकांनीं मूर लोकांवर केला तसा नाहीं. असा जुलूम ऐरिश लोकांवर व्हावा, असा कांहींएक अन्याय त्यांनीं केलेला नाहीं. त्यांचें जें होतें, तें उगाच्या उगाच त्यांजपासून बुचाडून घेतलें आहे, तें ते परत मागत आहेत. त्यांच्यापासून आह्मीं जें घेतलें तें त्यांस परत द्यावयाचें आहे. एवढेंच कायतें." असें ग्लाडस्टन ह्मणत असत.

## संदरलंडकर चपापला.

ग्लाडस्टन हे इंग्लंडच्या दरबारचे खजीनदार असतां, एके दिवशीं मिस्तर लिंडसे ह्यांच्या कारखान्यांत गेले. हे लिंडसे मोठे व्यापारी, गलबतांचे मालक आणि पार्लमेंटाचे सभासद होते. ग्लाडस्टन कचेरीच्या जागीं गेले, तेव्हां लिंडसे हे कोठें बाहेर गेले होते. ह्मणून ग्लाडस्टन हे त्यांची वाट पाहात तेथें एका मेजावर कांहीं लिहीत बसले. इतक्यांत तेथें संदरलंडचा कोणी व्यापारी लिंडसे ह्यांस भेटायास आला. तो तेथें इकडे तिकडे हिंडत असतां, सहज त्याची नजर ग्लाडस्टनांच्या अक्षराकडे गेली, आणि तो त्यांस ह्मणाला, "तुह्मी फार चांगलें लिहितां हो!"

**ग्लाडस्टन**—होय बरें आहे. माझें लिहिणें आपणांस आवडलें ह्याचा मला संतोष वाटतो.

**संदरलंडकर**—होय, खरोखरच तुमचें अक्षर चांगलें आहे. मला मनुष्य पाहिजे आहे तो असा पाहिजे आहे.

**ग्लाडस्टन**—खरेंच काय?

**संदरलंडकर**—होय. मला फार बोलायाला आवडत नाहीं. तुह्मी जर माझेकडे राहाल तर मी तुह्मांला दरसाल एकशेंवीस पौंड पगार देईन. हा कांहीं थोडा नाहीं तुह्मांला, मला वाटतें.

**ग्लाडस्टन**—बरें आहे. आतां लिंडसे येतात आहेत. त्यांना विचारून काय तें ठरवूं.

इतक्यांत लिंडसे आले, आणि त्यांस झालेला सगळा प्रकार ग्लाडस्टन ह्यांनीं सांगितला. तेव्हां—

**लिंडसे**—बरें आहे. आपल्याला एवढी मोठी सोय आली आहे. हिच्या आड मी कशाला येऊं! पण, इकडे पहा, तुमची एकमेकांची ओळख मला करून दिली पाहिजे. नाहीं बरें!

(इतकें ह्मणून त्या संदरलंडकराकडे वळून) अहो महाराज, हे गृहस्थ नामदार ग्लाडस्टन, सरकारचे खजीनदार आहेत बरें. तें कानीं पडतांच

संदरलंडवाला चपापला, आणि थिजल्यासारखा उभा राहिला. ह्या सगळ्या गोष्टीनें ग्लाडस्टन ह्यांस मोठी करमणूक वाटली.

## आपल्या सोबत्याची शिक्षा आपण सोसावयाची.

इटन शाळेंत असतां, ग्लाडस्टन हे आपल्या एका सोबत्याच्या संगतीनें कांहीं पोरकट अपराधांत सांपडले. त्या सोबत्याचें नांव त्यांनीं सांगण्याचें नाकारलें, त्यामुळें त्याबद्दलची शिक्षा त्यांचे शिक्षक डाक्टर कीटी ह्यांनीं ग्लाडस्टनांस केली. ती त्यांनीं निमूटपणीं सोशिली.

## पर्यायेंकरून स्वतःविषयीं भविष्य.

इटन शाळेंत असतां ग्लाडस्टन ह्यांनीं वक्तृत्व ह्या विषयावर एक निबंध लिहिला. त्यांत असें होतें:—"वक्तृत्व चांगलें असलें ह्मणजे सरकारांत जागा पतकरण्याचें बोलावणें यावयाचें, चिटणिशीची जागा मिळावयाची, कदाचित् मुख्य प्रधानाची जागा मिळावयाची, अशा कल्पना तरुण वक्तयांच्या स्वप्नांत यावयाच्या." तें त्यांच्याविषयीं खरें झालें.

## प्रतिपक्षी तरी पूज्य.

लार्ड सालसबरी हे ग्लाडस्टनांचे कट्टे प्रतिपक्षी होते. तरी त्यांचे ठायीं ग्लाडस्टनांच्या योग्यतेविषयीं मोठी पूज्यबुद्धि होती. एके वेळीं लार्ड सालसबरी ह्यांनीं ग्लाडस्टनांस टोलेजंग मेजवानी दिली. तेव्हां त्या दोघां थोर गृहस्थांस बागेंत हिंडतांना आणि भोंवतालच्या झाडांविषयीं आणि इतर विषयांविषयीं प्रेमानें आणि मोकळ्या मनानें गोष्टी सांगतांना पुष्कळांनीं पाहिलें आहे. लार्ड सालसबरी ह्यांच्या मेजावर ग्लाडस्टनांचा एक लहानसा कोरींव पुतळा ठेवलेला असे.

## ग्लाडस्टनांविषयीं राजकवीचें मत.

इ० स० १८६५ ह्या वर्षीं लार्ड टेनिसन, राजकवि, ह्यांनीं आपल्या रोजनिशींत लिहिलें आहे:—"थोर पुरुष ग्लाडस्टन हे येत्या शुक्रवारीं आमच्या येथें भोजनास यावयाचे आहेत. हा आमचा मोठा मान होत आहे. पण, कामांच्या एवढ्या रगाड्यांत त्यांस इकडे येण्यास कसें बनेल हीच मला

मोठी पंचाईत वाटत आहे." त्याप्रमाणेंच त्यांनीं इ० स० १८७४ ह्या वर्षी स्वतः ग्लाडस्टनांस लिहिलें—"कांहीं काळजी करूं नका. आपण फार मोठें काम केलें आहे. आतां जरी आपण स्वस्थ बसून विसांवा घेतला, तरी इंग्लंडाच्या इतिहासांत आपलें नांव गाजेल, ह्यांत संशय नाहीं."

## दुसरे ग्लाडस्टन इंग्लंडांत नाहींत.

स्टेड ह्या नामांकित ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांत लिहिलें आहेः— "सिडार वृक्षाच्या अफाट छायेंत बसून आपणांस फार संतोष वाटतो. तो ठीकच आहे, परंतु, त्या सावलीमध्यें तसला दुसरा मोठा सिडार वृक्ष कधींही सिद्ध व्हावयाचा नाहीं. त्याप्रमाणें ग्लाडस्टनांसारखा मोठा पुढारी आपणास असल्याचें फल हेंच आहे कीं, त्यांचे मागें त्यांची जागा भरण्यास त्यांच्यासारखा दुसरा पुरुष नाहीं. ह्याविषयीं झार महाराजांनीं मला विचारिलें कीं, ग्लाडस्टनांच्या मागें त्यांच्या जाग्यावर कोण यावयाचा? त्यांस मीं साफ सांगितलें कीं, त्यांच्या पश्चात् त्यांची जागा भरण्यास योग्य असा त्यांच्यासारखा माणूस आमच्यांत नाहीं. आतां, त्यांच्या जागीं आह्मी कोणाला तरी बसवूं हें खरें आहे; पण, त्यांच्या बरोबरीचा कोणी नाहीं. इंग्लंडांत ग्लाडस्टन काय ते एकच."

## ग्लाडस्टनांचें मोठेपण.

त्यांनींच आणखी असें लिहिलें आहेः—"शरीर खेरीजकरून, ग्लाडस्टन हे, मनानें, अंतःकरणानें, आत्म्यानें आणि सद्गुणांनीं केवळ राक्षस होते. एके दिवशीं कानन लिडन आणि मी असे गाडींत बसून बेनव्होयर्लिक डोंगराच्या पायथ्यावर जात असतां त्या डोंगराचें शिखर, आह्मी त्याच्या फार जवळ आल्यामुळें आह्मांस दिसेनासें झालें होतें. त्याजकडे पाहून, मला कानन लिडन ह्मणाले कीं, ह्या डोंगराकडे पाहून मला ग्लाडस्टनांची आठवण होते; आपण जोंपर्यंत त्यांच्या सन्निध आहों, तोंपर्यंत, ते खरोखर किती थोर आहेत, तें आपणांस कळावयाचें नाहीं. ते गेले

ह्मणजे मग, ते ह्या पिढीच्या सगळ्या इतर लोकांपेक्षां किती उंच होते, तें आपणांस चांगलें दिसूं लागेल."

## मनोदेवता.

थामस कार्लाईल ह्या तत्त्ववेत्त्यानें डिझरायली आणि ग्लाडस्टन ह्यांची तुलना मनोदेवतेच्या संबंधानें केली आहे. ती अशी—"ह्या दोन पुरुषांची तुलना करूं लागलों ह्मणजे मला मोठी करमणूक होते. हे बीकान्सफील्ड पाहा. त्यांस मनोदेवता मुळींच नाहीं. आणि आपणांस मनोदेवता नाहीं हें त्यांस ठाऊक असून, त्याविषयीं त्यांच्या मनाला फार बरें वाटतें. पण आतां हे ग्लाडस्टन पाहा. अबबबब! त्यांची मनोदेवता केवढी ह्मणून सांगावी! त्यांच्या एवढी मनोदेवता आपण तर कधीं कोठें पाहिली नाहीं. ते तिच्या पायां पडत असतात, आणि देवाच्या आज्ञेंत वागावें त्याप्रमाणें तिच्या अर्ध्या वचनांत वागतात. परंतु त्यांच्या ठायीं असें कांहीं विलक्षण सामर्थ्य आहे कीं, त्यांस जें काय पाहिजे असतें, तेंच ते तिच्याकडून वदवितात."

## त्यांचा दानधर्म.

ग्लाडस्टन आणि त्यांची पत्नी ह्यांचें लक्ष दानधर्माकडे पहिल्यापासूनच होतें. लंडनांत एकदा पटकीचा उपद्रव झाला होता तेव्हां ग्लाडस्टनांच्या पत्नीनें दुःखितांस जो दानधर्म केला, आणि जें साह्य केलें, त्याचा लौकिक अद्याप कानीं येत आहे. तिनें लंडनांतल्या गरीब लोकांच्या साह्यार्थ एक पत्र टैम्समध्यें लिहिलें होतें. त्यानें पन्नास हजार रुपये जमले. ह्या बाईनें वुडवर्ड येथें बरे होत आलेल्या गरीब आजारी लोकांकरितां एक गृह स्थापलें आहे, तें अद्याप चाललें आहे. तेथलीं माणसें बरीं झालीं, ह्मणजे त्यांस कांहींना कांहीं उद्योग लावून देण्यांत येतो. हार्डनच्या त्यांच्या वाड्यापाशीं एक अनाथबालकगृह आहे. तेथें लहान मुलांचा सांभाळ होतो. त्या संस्थेचा खर्च ग्लाडस्टनकुटुंबाकडून चालतो.



## ग्लाडस्टनांचीं कांहीं निवडक वचनें.

ईश्वरी सूत्र हेंच सत्य होय.

***

कामाचा बदल ह्यासारखी दुसरी उत्तम करमणूक नाहीं.

***

मनोदेवता पोसण्यास माणसास फार खर्चीं पडावें लागतें.

***

मनाचा रोग बरा करील असा वैद्य जगांत सांपडावयाचा नाहीं.

***

पापभीति कमी होत चालली आहे, ही सध्याच्या मन्वंतरांत मोठी उणीव आहे.

***

मी सगळा जन्मभर विद्यार्थी होतों, आणि अजूनही मी विद्यार्थीच आहें. (१८९०.)

***

आपलें राष्ट्र आपणांस अन्यायानें वागवील, असें भय कधीं कोणीं मनांत आणूं नये.

***

आकाश जसें ह्या पृथ्वीस दशदिशांनीं व्यापितें, तसें धर्मशास्त्र हें मनुष्याच्या गतीस सर्वत्र व्यापितें.

***

आपल्या मनाचा जोर हा आपल्या कोटिक्रमाचा जोर आहे, असें माणसाला वाटण्याचा संभव आहे.

***

सहवास, आवड, सवयी, लोकांतल्या नवनव्या गोष्टी—नवनव्या तऱ्हा ह्यांशीं धर्मास फार झगडावें लागतें.

***

धर्मस्वातंत्र्याच्या कलाचें बळ फार मोठें आणि दुर्निवार आहे. त्याच्या आड कोणाच्यानें येववायाचें नाहीं.

***

सध्याच्या काळच्या अप्रतिबंध आणि गंभीर धर्मस्वातंत्र्याच्या ओघास कोणाच्यानेंही हात लाववणार नाहीं.

***

मनुष्यास संपत्तीच्या योगानें सुख संपादितां येईल असें जर आपण घेऊन चाललों, तर आपण फार चुकूं.

***

पाण्यावर किंवा वाळूवर हजार शब्द लिहिण्यापेक्षां खडकावर एक शब्द लिहिणें हें अधिक श्रेयस्कर आहे.

***

स्वतःच्या सुधारणेकरितां मनुष्य खरोखर मनापासून जो प्रयत्न करतो, तोच त्याच्या नम्रतेचा मोठा द्योतक गुण आहे.

***

पुस्तकें मृत मनुष्याचे शब्द आहेत. परलोकस्थ मनुष्यांच्या आत्म्याशीं मनोवाद करण्याचीं तीं उत्तम साधनें आहेत.

***

संपत्ति आणि सुखसाधनें जसजशीं वृद्धि पावत जातात, तसतसा सामाजिक व्यवहारनियमांतही फरक पडत जातो.

***

ज्ञान हें सौख्यभांडार वाटतें, अशीं माणसें थोडीं असतात. आणि आपल्या सध्याच्या स्थितींत तीं अशींच थोडीं राहावयाचीं.

***

इंग्लंडाच्या अनुभवास येईल कीं, राष्ट्रीय अन्यायानें राष्ट्रीय पतन खचीत खचीत व्हावयाचें आहे, तें कधीं चुकावयाचें नाहीं.

***

अनुभवानें मला असें कळलें आहे कीं, भाव धरण्यांत मोठें शाहाणपण आहे, आणि भाव न धरण्यांत मोठें मूर्खपण आहे.

***

स्वोन्नतीचे खरे खरे आणि मनांत ठसणारे जितके प्रयत्न आहेत, तितके सगळे इतरांस नम्रतेच्या संबंधानें अत्यंत बोधप्रद होतात.

***

धर्म ही एक महाशक्ति आहे. तिच्यापुढें राजांनीं आणि राजकारस्थानी पुरुषांनीं आपल्या कामांची झडती केव्हां तरी दिली पाहिजे.

***

ज्या राष्ट्राच्या सगळ्या प्रकारच्या संस्थांमध्यें आणि कृत्यांमध्यें अभिवृद्धि दृश्यमान असते, त्या राष्ट्राची उन्नति होत आहे, असें समजावें.

***

आपण आपलें कर्तव्य करण्यास कधीं मागें सरूं नये. त्याप्रमाणेंच त्यांतल्या अडचणी कानांमागें टाकण्याचाही प्रयत्न कधीं करूं नये.

***

पापाच्या संबंधानें देवाला भिऊन वागलें ह्मणजे त्यांत सगळें येतें. मनुष्याच्या संबंधाचें पाप हें देवाच्या संबंधाच्या पापापुढें कांहींच नाहीं.

***

परमार्थाच्या गोष्टी मोठ्या डौलानें सांगायाच्या आणि जें काय सांगायाचें त्याच्या उलट रीतीनें राहावयाचें—ह्यासारखें सोपें दुसरें कांहीं नाहीं.

***

एकाद्या दुष्ट गोष्टीवरून मनोदेवतेची वाणी खोटी मानण्यास मनुष्यास मोह पडतो, असा जो प्रसंग येतो, तो अत्यंत भयंकर आणि फार संकटाचा होय.

***

एकाद्या मोठ्या माणसाचें मत स्वतः विचार न करितां कबूल करणें हें जितकें वाईट आहे, तितकेंच, मोठ्याच्या मतांस यथायोग्य मान न देणें हें वाईट आहे.

***

मनुष्य हा सृष्टींतल्या चांगल्या वस्तूंचा कळस आहे. मनुष्यजाति, मनुष्यस्वभाव, मनुष्यकृति, मनुष्यकर्तव्य आणि मनुष्याचें भवितव्य, हे अभ्यासाचे अत्युत्तम विषय होत.

***

चिरकालच्या कीर्तीची इच्छा ही सत्कार्यें करण्यास उत्तम प्रकारची उचल आहे. ती आपल्या अंतःकरणांत मनोदेवतेच्या आणि देवाच्या आज्ञांच्या खालोखाल ठेवावी.

***

माझा अंतकाल जसजसा जवळ येत चालला आहे, तसतसा मतभेद मला कमी कमी दिसूं लागला आहे, आणि त्या मानानें ऐक्य किती तरी मोठें वाटूं लागलें आहे.

***

कोणत्याही राष्ट्रांत आणि कोणत्याही युगांत ह्मटलें तर, त्यांतला उद्योग आणि त्यांतल्या लोकांचें परस्परांविषयीं प्रेम, हीं, त्यांच्या ईश्वरभक्तीच्या प्रमाणावर अवलंबून असतात.

***

ह्या पापमय जगामध्यें सत्याच्या अगदीं शेजारीं-त्याला लागूनच असत्य असतें; त्याप्रमाणेंच, भक्तिभावाच्या अगदीं जवळच त्याला लागून, अविश्वास आणि अभक्ति हीं असतात.

***

असत्य आणि दंभ ह्यांचा प्रकाश कांहीं वेळ चालेल तर चालो; परंतु त्यांच्या योगानें शेवटीं कीर्तिनाश आणि विश्वासभंग हे होऊन, विपत्ति यावयाचीच, चुकावयाची नाहीं.

***

परमेश्वराविषयीं आपलीं जीं कर्तव्यें आहेत, त्यांजकडे आपलें लक्ष पुष्कळ असावें. आणि तें लक्ष ज्या मानानें असेल, त्या मानानें आमच्या भवितव्यावर त्याचे परिणाम घडतील.

***

क्षणिक पश्चात्ताप हें कांहीं निरपराधित्व नव्हे. पश्चात्तापाचा क्रम एकसारखा चालला पाहिजे, आणि तो क्रम परिपूर्ण झाला पाहिजे, तो पूर्ण झाल्याविना चित्तशुद्धि व्हावयाची नाहीं.

***

ग्रंथसंग्रह करणाऱ्यास ग्रंथावलोकनाची आवड, वेळ, पैसा, ज्ञान, सारासारविचार आणि दृढनिश्चय, इतके गुण आवश्यक आहेत. ह्यांतले आवड आणि निश्चय हे माझे ठायीं आहेत.

***

अनुभव येण्याच्या आधीं पुष्कळ गोष्टींवर विश्वास ठेवणें—त्या चांगल्या आहेत असें मानून चालणें, हें शहाणपण आहे. त्या गोष्टी खरोखर कशा आहेत, हें समजेपर्यंत तो विश्वास ठेवावा.

***

शिक्षणाच्या हेतूंमध्यें हा एक हेतु आहे कीं, तूं त्याच्या योगानें पुढें कांहीं तरी व्यवसाय साधावा. पण हा हेतु गौण होय; उच्च नव्हे. अंतःकरण पवित्र विषयांनीं उन्नत होणें हा त्याचा उच्च हेतु होय.

***

कोणत्याही कारणानें—किंवा कोणत्याही एकाद्या पवित्र हेतूनें—माणसें ज्या दिवशीं आपल्या मनोदेवतेची आज्ञा अवमानूं लागतील तो दिवस फार वाईट आणि मोठ्या अनर्थाचा आहे असें मी समजेन.

***

शारीरश्रम करणें हें लज्जास्पद आहे, असा जो समज आहे तो घालविला पाहिजे, एवढेंच केवळ नव्हे, तर त्याच्या योगानें, त्याच्या उलट, आपल्या आंगचें थोरपण वाढतें असें दाखविलें पाहिजे.

***

ज्ञान मिळवेल तितकें मिळवा. आणि जों जों अधिक ज्ञान तुम्ही मिळवाल, तों तों तुम्हांला असें वाटत जाईल कीं, आपण जें काय संपादिलें आहे तें अत्यल्प आहे, आणि जें काय राहिलें आहे तें अगाध आहे.

***

आपणांस जें माहीत होतें, त्याला आपण ज्ञान म्हणतों, हें आपली जीभ आपल्या स्वाधीन आहे, म्हणून म्हणतों. दुसरें कांहीं नाहीं. बाकी, ज्ञान म्हटलें कीं त्यांत अज्ञानाचा लेशहि नसावा. पण तसें कोठें होतें ?

***

गुरूचें ऋण हें मातुश्रीच्या ऋणासारखें आहे. गुरूनें जर आपलें काम मनापासून केलें आहे, तर, त्यास तुह्मीं कांहीं दिलें तरी तुमच्यानें त्याचें उतराई होतां यावयाचें नाहीं, त्याच्या ऋणांतून मुक्त होववणार नाहीं.

***

देवाच्या मनांतली गोष्ट तेंच सत्य होय. तें जाणण्याचीं साधनें जीं आपल्या हातीं आहेत, त्यांचा यथायोग्य उपयोग आपण करावा, आणि त्यांचा चांगला परिणाम होणें हें देवावर सोपावें. एवढेंच काय तें आपणांकडे आहे.

***

कर्तव्यकर्माविषयीं अगाध श्रद्धा, आणि त्या श्रद्धेपासून अत्यंत लीनता आणि दृढनिश्चय ह्यांचें जें मिश्रण उत्पन्न होतें, तें, हीं, मनुष्याच्या वर्तनांत परमेश्वरी कृपा उत्पन्न होण्याचीं आणि ती कृपा तशीच कायम राखण्याचीं उत्कृष्ट साधनें आहेत.

***

दुकानांत माल पुष्कळ भरला आहे, पण त्यास गिऱ्हाईक नाहीं असें दुकान कांहीं उपयोगाचें नाहीं. त्याप्रमाणेंच, मनांत पुष्कळ चांगल्या गोष्टी सांठवल्या आहेत, पण त्याप्रमाणें क्रिया होत नाहीं असें मन ह्मणजे असें शिक्षण कांहीं उपयोगी नाहीं.

***

आमच्या मनोवृत्तींवर जर आमची अधिकाधिक सत्ता चालत नाहीं आहे–ती कमी होत आहे—तर सृष्टीवर ह्मणजे सृष्ट पदार्थांवर आमची सत्ता वाढत चालली आहे––आह्मी अधिकाधिक ज्ञानी होत चाललों आहों–असा गर्व करणें हें व्यर्थ आहे.

***

ह्या आपल्या पापमय जगामध्यें, साधारणपणें, सत्याच्या शेजारीं असत्य भिडलेलें असायाचेंच आहे. त्याप्रमाणेंच धर्मश्रद्धेच्या शेजारीं किंवा प्रत्यक्ष धर्मश्रद्धेमध्यें, अश्रद्धेचीं, अधार्मिकपणाचीं मतें असावयाचींच आहेत. त्यांविषयीं सावध राहावें.

***

मनुष्याच्या मनावर सत्ता चालविण्याविषयीं दृष्ट आणि अदृष्ट ह्यांची एकमेकांशीं लढाई चाललेली असते. आणि ज्या मानानें दृष्टांची सत्ता वाढत जाते, त्या मानानें अदृष्टांची सत्ता कमीकमी होत जाते. सध्याच्या युगांत दृष्टांचें माहात्म्य फार वाढलें आहे.

***

मनुष्याचीं मतें हीं अंशतः त्याच्या स्वतःच्या अनुभवावरून आणि अंशतः त्याच्या भोंवतालच्या साहचर्यावरून बनत असतात. त्यांत विचारशील माणसाच्या मतांवर त्याच्या स्वतःच्या अनुभवांचें मोठें वजन असतें, आणि इतरांच्यावर साहचर्याचें वजन अधिक असतें.

***

एकुणिसाव्या शतकाच्या प्रथमार्धामध्यें दोन गोष्टी फार मोठ्या झाल्या आहेत. संपत्तीची वृद्धि फार झाली आहे; आणि संपत्तीचा उपभोग घेण्याचे मार्ग पुष्कळ वाढले आहेत. ह्या अभिवृद्धीइतकी अभिवृद्धि, एकंदर सगळ्या इतिहासांत कधीं झाल्याचें आढळत नाहीं.

***

धर्माचा सन्मान करा परंतु धर्मशास्त्राचें देव्हारें माजवूं नका, असें जे कोणी ह्मणतात, त्यांचें ह्मणणें असें दिसतें कीं, वृक्ष, वनस्पति, पुष्पें, सूर्य, चंद्र, अथवा तारे ह्यांचा सन्मान करा, ह्यांचा गौरव करा, परंतु, वनस्पति-शास्त्र आणि ज्योतिषशास्त्र ह्यांचें दंभ माजवूं नका.

***

ह्या विश्वामध्यें शक्ति ह्मणून कोठेंही असो, ती शक्ति ह्या विश्वाचा धनी जो परमेश्वर त्याची आहे. आणि त्यानें आह्मां माणसांचे ठायीं दया, न्याय, सत्य आणि भाव हे जे गुण ठेविले आहेत, त्यांच्या कार्यास त्या शक्तीचा उपयोग केला, ह्मणजे तो त्याच्या इच्छेप्रमाणें होतो.

***

एकमेकांस विरुद्ध अशीं कर्तव्यें करण्याची वेळ येणें हें मोठें संकट आहे, असें वाटतें खरें. परंतु, एकमेकांस विरुद्ध अशीं कर्तव्यें मुळीं संभवतच

नाहींत. कां कीं, सगळीं कर्तव्यें एका अगाध ब्रह्मांतून निघालेलीं आहेत. त्यांत स्थितिपरत्वें थोडें कमजास्त असलें, तर त्यांत कांहीं विशेष नाहीं.

***

जगाच्या इतिहासामध्यें दृष्ट आणि अदृष्ट हीं दोन मोठीं प्रकरणें आहेत. तीं नेहमीं एकमेकांशीं झगडत असतात. ह्यांतल्या दृष्टाचा अधिकार माणसांवर अधिक चालतो. आणि तो ज्या मानानें अधिकाधिक चालतो, त्या मानानें अदृष्टाचा त्यावरचा अधिकार कमी कमी होत जातो.

***

धर्माचीं तत्त्वें तेथून सगळीं एक आहेत. तीं सर्वांस एकसारखीं मान्य आहेत. त्यांच्या योगानें सर्वांचें ऐक्य होणें हें अगदीं साहाजिक आहे. हें ऐक्य सुजाणांत आणि अजाणांतही एकसारखें व्हावें. पण, त्यांत जें अंतर पडतें, त्यास कारण ज्ञानाचा गर्व होय. ज्ञानगर्वानें पंथपरंपरा वाढली आहे.

***

ज्या ज्ञानाचा सत्परिणाम अंतःकरणांतल्या सद्वृत्तींच्या अभिवृद्धीस कारणीभूत झाला नाहीं, त्या ज्ञानाचें देव्हारें करणें हें व्यर्थ आहे. जर आपणांस आपल्या अंतःकरणवृत्ति जिंकितां येत नाहींत, तर, आह्मी आपल्या ज्ञानानें सृष्टपदार्थजग जिंकित चाललों आहों, असा गर्व वाहणें हें बाष्कळपण आहे.

***

आपण जें अन्न खातों त्याचें मुख्य काम हें आहे कीं, त्यानें शरीरास बळकट आणि चपल करावें. त्याप्रमाणें आपण जें शिक्षण संपादितों, त्याचें मुख्य काम असावें कीं, त्यानें मन खंबीर करावें, मनाची धारणाशक्ति वाढवावी, आणि त्याला जीं संकटें येतील तीं शांतपणें सोसण्याचें सामर्थ्य आणावें.

***

ज्ञानसंपादनाच्या व्यापारामध्यें असा एक देखील व्यापार नाहीं कीं ज्यांत अज्ञान किंवा भ्रम ह्यांचा प्रवेश व्हावयाचा नाहीं. ह्मणून, आपण ज्यास ज्ञान असें ह्मणतों, तें अगदीं सगळें सत्यमय असतें, अगदीं खरें असतें, असें नाहीं. ह्मणून ज्ञान ह्याचा अर्थ, त्या त्या विषयाच्या अनुभवाच्या मानानें मर्यादित घ्यावा, हें बरें.

***

ग्रंथसहवास अत्यंत आनंदकारक आहे. ग्रंथ ठेवले आहेत, अशा खोलींत जा. आणि त्यांस जरी तुह्मीं हात लाविला नाहीं, तरी ते ग्रंथ मानसवाणीनें तुह्मांस ह्मणत असतात कीं, आमच्यामध्यें पुष्कळ ज्ञान भरलें आहे तें घ्या आणि त्याचा उपयोग करा, ह्मणजे त्यानें तुमचें कल्याण होईल. हें ह्मणणें काय कमी मोलाचें आहे ?

***

ब्रिटनाचें स्वातंत्र्य ज्या कल्पनांच्या संयोगानें सिद्ध झालें आहे, त्या कल्पना लोकांच्या मनांत येऊं लागल्यास आज एक हजार वर्षें झालीं आहेत. ह्मणून हें लक्षांत ठेवावें कीं, इंग्लंडाच्या इतिहासाचा अभ्यास केल्यानें तुह्मांस जें कोणी काय मोठें कार्य करायास सांगेल, तें कार्य करण्यास योग्य आणि समर्थ असे तयार व्हा.

***

पापाची रुखरूख किंवा मन खात असतें, तो एक जबरदस्त रोग आहे. त्यावर औषध सगळ्या पृथ्वींत कोठें मिळावयाचें नाहीं. जगाच्या धर्मशास्त्रांत लिहिलें आहे कीं, पापाच्या मागून खचीत दुःख यावयाचेंच. तें चुकावयाचें नाहीं. अन्यायाची लढाई हें एक भयंकर पातक आहे. त्याच्या मागून भयंकर दुःख यावयाचें खचीत.

***

आपल्या आयुष्याचा खर्च फार जपून करा, ह्मणजे पुढें केव्हां तरी तें तुह्मांस सव्याज उपयोगीं पडेल—तें इतकें कीं, त्याचा अजमास देखील तुह्मांला करितां यावयाचा नाहीं. आणि त्याचा उपयोग न करितां तें जर

तुह्मीं व्यर्थ घालविलें, तर, तुह्मांस वाटत असेल त्यापेक्षां पुष्कळपटीनें तें तुमच्या हानीस कारण होईल—तुमच्या अजमासाबाहेर तुह्मांस बुडवील.

***

देशांत शांति असणें हें मोठें सुख आहे. पण त्या सुखाबरोबर नीच-वृत्ति मनुष्यांस मोह व्यापितात. ही गोष्ट ईश्वरापासून प्राप्त होणाऱ्या सर्व प्रकारच्या सुखांस लागू आहे. त्याप्रमाणें हेंही कांहीं खोटें नव्हे कीं, लढायांच्या आणि संकटांच्या प्रसंगीं मनुष्यांच्या ठायीं अमोलिक सद्गुण उत्पन्न होऊन वाढतात, आणि माणसांच्या हातून मोठमोठीं कामें घडतात.

***

हें नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आपणांस ज्या काय संवयी पूर्वी लागलेल्या असतात, त्यांच्या अनुरोधानें आपल्या अंतःकरणांतल्या बुद्धिवृत्ति आणि नीतिवृत्ति फिरत असतात. आपणांस ठाऊक आहे कीं, एकाच विषयाच्या संबंधानें, राजकारणी पुरुष, धर्मप्रचारक आणि वकील हे जरी आपापल्या वेगळ्या वेगळ्या पद्धतींनीं विचार करितात, तरी, त्यांचे निर्णय एकच होतात.

***

इतर राष्ट्रांनीं इंग्लंडास मोठें मानावें, असें करण्यास काय तो एक मार्ग आहे. तो हा कीं, त्या राष्ट्रांस असें समजावें कीं, इंग्लंड हें त्यांशीं नेहमीं सत्यन्यायानें वागण्यास सिद्ध आहे, आणि जे कायदे किंवा नियम स्वतः इंग्लंड मानितें, त्या कायद्यांशिवाय आणि त्या नियमांशिवाय दुसरे कायदे किंवा नियम मानण्याविषयीं इंग्लंड दुसऱ्या राष्ट्रांस कदापि सांगणार नाहीं.

***

पदव्या, मानपान, आणि बक्षिसें हीं आपणां माणसांच्या अंतःकरणाच्या व्यंगांवरचीं औषधें आहेत, तशीं तीं आपल्या आरोग्याचीं भूषणें आहेत. त्यांच्या योगानें, बाह्यात्कारीं, ज्ञानसंपादनाची उत्कट इच्छा उत्पन्न होते. ही इच्छा ह्यावरून किंवा ह्यांसाठीं होऊं नये; तर, ती इच्छा स्वतः ज्ञानाच्या गोडीनें–ज्ञान हें सुखदायक आहे अशा श्रद्धेनें उत्पन्न व्हावी, हें आवश्यक आहे.

***

हें कधीं विसरतां कामास नये कीं, मनुष्यास ह्या जगामध्यें जीं कामें करावीं लागतात, त्यांत योग्य प्रकारें शिकविणें ह्याच्या इतकें त्रासदायक आणि मनुष्याच्या शक्ति क्षीण करणारें काम दुसरें एक देखील नाहीं. ही कला कितीएकांस इतकी उत्तम साधते कीं, त्यांच्या मागें त्यांचे विद्यार्थी, सेनापतीच्या मागें लढाईत शिपाई जातात, त्यांप्रमाणें जातात. पण अशीं माणसें फार थोडीं असतात.

***

आजपर्यंत मोठ्या उदयास आलेल्या कोणत्याही राष्ट्रांतल्या लोकांनीं–सर्वांनीं मिळून असा—आपला राज्यकारभार चालविला नाहीं. त्यांस जें काय आजपर्यंत करितां आलें, तें एवढेंच कीं आपणांतले श्रेष्ठ लोक निवडावे, आणि, प्रसंगोपात्त त्यांच्या कृतींवर आपला दाब ठेवून, त्यांच्या हातून राष्ट्राचा कारभार चालवावा. हें देखील त्यांस करायास किती कठिण पडतें, तें इतिहासावरून स्पष्ट दिसून येतें.

***

सगळ्या ऐहिक वस्तूंचा त्याग करणें किंवा त्यांविषयीं पराङ्मुख होणें हें सगळ्या नीतीचें मूळ तत्त्व आहे, असें जें वारंवार ऐकूं येतें, तें खरें मानूं नये. त्याप्रमाणेंच, हा मृत्युलोक ही सगळी माया आहे, ह्यांत खरें असें कांहीं नाहीं, असें सांगतात, तेंही खरें नाहीं. एवढेंच केवळ नव्हे, तर मनुष्याचें मनुष्यपण पूर्ण होण्यास ह्या जगाचा अनुभव आणि ह्या जगांतलें जिणें एके प्रकारें अवश्यक आहे.

***

हें जग नाशिवंत आहे, ह्यांत गुंतूं नये, असें जें मत आहे त्याविषयीं फार सावध रहावें. हें जग आणि आपलें अस्तित्व हा जो योग आहे, तो कसा तरी आपोआप घडून आलेला नाहीं. ही सगळी देवाची कृति आहे. मनुष्यत्व पूर्णतेस येण्यास हें जग हें मोठें उत्तम स्थान आहे. तें पूर्ण झाल्याशिवाय त्यास देवलोकीं जातां यावयाचें नाहीं. ह्मणजे इहलोकचें जिणें हें परलोकच्या जिण्याच्या तयारीसारखें आहे.

***

अमकी एक गोष्ट करणें किंवा न करणें हें आपलें कर्तव्य आहे, असें मनुष्याच्या मनांत ठसलें असतां, त्या कर्तव्याच्या विरुद्ध त्याच्या हातून एकादी क्रिया बुद्ध्या घडणें हें पाप होय. हें पाप माणसाच्या मनाला खात असतें. ह्मणजे, त्याच्या योगानें त्याच्या मूळ स्वभावांत एक प्रकारचें बंड होतें. त्याचा परिणाम असा होतो कीं, त्याच्या अंतःकरणांत कुवासनांचें प्राबल्य वाढून सद्वासना क्षय पावतात. हाच त्याच्या आत्म्याचा नाश होय.

***

सगळीं राष्ट्रें सारखीं मानणें—त्यांत कोणास कमजास्त न मानणें हें ख्रिस्ती सुधारणेचें मूळ बीज आहे. हें तत्त्व जर सोडिलें, तर त्याच्या बरोबर सर्वत्र शांतता आणि जगाच्या उन्नतीची आशा ह्या गत झाल्याच पाहिजेत. माझें मत असें आहे कीं, जो कोणी हें समतेचें तत्त्व सोडून देतो किंवा बिघडवितो, त्याचा हेतु किती कां चांगला असेना, तो आपल्या राष्ट्रावर मोठें संकट आणितो, शांतीचा विध्वंस करितो, आणि ख्रिस्ती धर्माच्या मूळ सिद्धांतावर शस्त्रप्रहार करितो.

***

माझ्यांत बदल झाला आहे. कां कीं मी जेव्हां प्रथमतः सार्वजनिक कामांत पडलों, तेव्हां स्वातंत्र्याचें खरें मोल आणि त्याची अत्यंत आवश्यकता हीं मला कळलीं नव्हतीं. स्वातंत्र्य हें इतर गुणांप्रमाणें जसें सत्कार्याकडे लावितां येतें, तसें असत्कार्याकडेही लावितां येतें, हें मला ठाऊक नव्हतें. त्याप्रमाणेंच प्रत्येक सार्वजनिक संस्थेचें चांगुलपण त्यावर अवलंबून असतें, हेंही माझ्या लक्षांत आलें नव्हतें. तें सगळें आतां मला कळलें आहे, आणि त्याच्या अनुरोधानें मी नेहमीं वागत असतों.

***

कामन्स लोकांची सभा ही एक उत्तम शाळा आहे. ह्या शाळेची शक्ति कांहीं विलक्षण आहे. येथें बुद्धीचें सामर्थ्य आणि मनाचें उदात्तत्व हीं चांगलीं वाढतात. शिवाय नीति शिकण्यास ही शाळा चांगली आहे. शांति शिकण्यास हें उत्तम स्थान आहे. येथें दुर्दैवानें जर कोणाच्या हातून कांहीं

चूक झाली, तर ती कळण्यास पांच मिनिटें देखील अवकाश लागत नाहीं. सोशिकपणा तर येथें मूर्तिमंत आहे. तो माणसास आपोआप येतो. तसेंच हें एक मोठें न्यायस्थान आहे.

***

अमेरिकेंतल्या स्वतंत्र संस्थानांनीं जी आपली उन्नति अल्प कालांत करून घेतली आहे, ती इतकी जलदीनें झाली आहे कीं, इतिहासांत तिला दुसरी उपमा नाहीं. एका शतकामध्यें पृथ्वीवरच्या कितीएक राष्ट्रांची लोकसंख्या दुप्पट झाली आहे, कितीएकांची तिप्पट झाली आहे, पण ह्या संस्थानांची लोकसंख्या वीस दशलक्षांची नव्वद दशलक्ष झाली आहे! सध्या इंग्लंड आणि हीं संस्थानें हीं पृथ्वीच्या पाठीवर अत्यंत प्रबल राष्ट्रें आहेत. परंतु, आतां पुढें, मुलगी ही आपल्या आईपेक्षां बळकट होणार, ह्याविषयीं कांहीं संशय नाहीं.

***

आपल्या मनाची क्रिया अशी एकही नाहीं कीं जींत भ्रम नाहीं किंवा चूक होत नाहीं. चूक न होणें हें अशक्य आहे. हें जर अशक्य आहे, तर ज्ञानाच्या सत्यतेंत–खऱ्या ज्ञानांत–कांहीं तरी व्यंग राहिलेंच पाहिजे; आणि असें जर व्यंग राहिलें पाहिजे—आणि ज्ञान अव्यंग असल्यावांचून त्यावर विश्वास बसत नाहीं असें आहे–तर, एवढें मोठें विश्व असून, तें अगदीं कोऱ्या कागदासारखें आहे–धर्मसंबंधानें, नीतिसंबंधानें, सामाजिक विषयांच्या संबंधानें, अथवा सृष्ट पदार्थांच्या संबंधानें, पूर्ण विश्वासाला मुळींच कोठें थारा नाहीं असें होतें.

***

मनांत पुष्कळ गोष्टी सांठवणें हें माणसाचें शिक्षण नव्हे. कांहीं लोक समजतात कीं, मन हें कोठीसारखें आहे. त्यांत ज्ञानाच्या पुड्या सांठवून ठेवाव्या. आणि ज्या वेळेस जी पुडी लागेल ती काढून तिचा उपयोग करावा ह्मणजे झालें. परंतु तें सगळें बरोबर नाहीं. ह्या संबंधानें हें लक्षांत ठेवावें कीं, मनुष्याच्या जीविताचा हेतु, मनुष्याची सुधारणा, मनुष्याची

उन्नति हा आहे. ह्मणून, ज्ञान संपादून त्याच्या योगानें आपल्याच्यानें होईल तितकें माणसाचें चांगलें करावें—तें चांगलें करणें ह्मणजे ह्या जगांतलें पाप आणि दुःख कमी करण्याचा प्रयत्न करणें होय.

***

टेनिसन ह्यांची कारकीर्द बहुतेक माझ्या कारकीर्दीबरोबरचीच आहे. परंतु, त्यांच्या ज्या कृति आहेत त्या माझ्या कृतींपेक्षां पुष्कळ श्रेष्ठ प्रतीच्या आहेत, त्यांचा उद्योग माझ्या उद्योगापेक्षां पुष्कळ श्रेष्ठ प्रतीचा झालेला आहे, आणि तो माझ्या उद्योगापेक्षां अधिक चिरस्थायी आहे. आमच्यासारखीं माणसें सार्वजनिक हिताच्या विषयांवर बोलतात तेव्हां लोक कृपा करून त्यांस वाजवीपेक्षां मोठा मान देतात, त्यांचा गौरव वाजवीपेक्षां अधिक करितात, आणि त्याच्या योगानें तीं फुगतात, हें खरें आहे. पण, बोलणें हें आमचें कामच आहे. तेथें उपाय नाहीं. परंतु, शब्दांस पंख असतात. त्यांनीं ते भराभर उडून जातात, आणि दिसेनातसे होतात. टेनिसनांची कृति याहून उच्च योग्यतेची आहे. तिच्या पुढें कालाचें कांहीं चालत नाहीं. त्यांनीं आपलें चरित्र आपल्या देशबांधवांच्या हृत्पटलावर लिहिलें आहे, तें कधींही नाहींसें व्हावयाचें नाहीं.



# ग्लाडस्टनांच्या चरित्रांतल्या मुख्य गोष्टी.



१८०९ जन्म.

१८२०–२७ इटन शाळेंत अभ्यास.

१८२८ आक्सफर्ड विश्वविद्यालयांत प्रवेश.

१८३१ अत्युच्च पदवीची परीक्षा उतरली.

१८३३ पार्लमेंटांत न्यूआर्काच्या वतीनें प्रवेश झाला.

१८३४ लार्ड आफ् ट्रेझरी झाले.

१८३५ परकीय वसाहतींचे अंडर सेक्रेटरी झाले.

१८३७ न्यूआर्कवतीनें पुनः निवड होऊन पार्लमेंटांत आले.

१८३८ अगदी पहिला ग्रंथ "राजा आणि धर्म" हा छापला.

१८३९ विवाह झाला.

१८४१ बोर्ड आफ् ट्रेडचे व्हाइस प्रेसिडेंट झाले.

१८४५ कालोनियल सेक्रेटरी झाले.

१८४६ धान्याच्या कायद्यास अनुकूल म्हणून न्यूआर्कनें निवडण्याचें नाकारिलें.

१८४७ आक्सफर्डच्या विश्वविद्यालयाच्या वतीनें पार्लमेंटाचे सभासद झाले.

१८५० डान पासिफिको ह्यासंबंधीं भाषण केलें.

१८५१ नेपल्सच्या अव्यवस्थेचें आविष्करण.

१८५२ चान्सलर आफ् एक्सचेकर झाले.

१८५५ काडी मोडून देण्याच्या कायद्यास विरुद्ध झाले.

१८५८ आयोनियन बेटांत हाय कमिशनर झाले.

१८६० एडिनबरो विश्वविद्यालयाचे रेक्टर झाले.

१८६१ कागदावरची जकात माफ केली.

१८६५ लांकाशायरच्या वतीनें पार्लमेंटाचे सभासद झाले.

१८६८ ऐरलंडांतल्या धर्मखात्याच्या संबंधाचा कायद्याचा मसुदा आणिला.

१८६८ प्रथमतः महाराणी सरकारचे मुख्य प्रधान झाले.

१८७० ऐरलंडांतल्या जमिनीच्या संबंधाच्या कायद्याचा मसुदा.

१८८० दुसऱ्यानें महाराणी सरकारचे मुख्य प्रधान झाले.

१८८४ गार्डन ह्यांस खार्टूम येथें पाठविलें.

१८८६ तिसऱ्यानें महाराणी सरकारचे मुख्य प्रधान झाले.

१८८६ पहिल्या होमरूलबिलाचा मसुदा आणिला.

१८९२ चौथ्यानें महाराणी सरकारचे मुख्य प्रधान झाले.

१८९२ दुसऱ्या होमरूलबिलाचा मसुदा आणिला.

१८९४ आरमार वाढविण्याच्या विचारास प्रतिबंध होईना ह्या मुख्य कारणावरून मुख्य दिवाणगिरी सोडून सगळ्या सार्वजनिक कामांतून मोकळे झाले.

१८९८ मृत्यु.

